# संघर्ष

मराठवाड्यातील झुंजार पत्रकार,
राजकीय नेते आणि सामाजिक कार्यकर्ते

**कै. आनंद कृष्ण वाघमारे**

यांच्या लेखांचा संग्रह

## खंड पहिला

(१९३८ ते १९४७)

संपादक :

**स. मा. गर्गे**

प्रकाशक :
**प्रभाकर भालचंद्र भालेराव**
चिटणीस
आ कृ वाघमारे स्मृति-समिती
c/o जयहिंद प्रिंटिंग प्रेस,
सन्मित्र कॉलनी, औरंगाबाद

मुद्रक :
**ज. रा. बर्दापूरकर,**
व्यवस्थापक, जयहिंद प्रिंटिंग प्रेस,
सन्मित्र कॉलनी, औरंगाबाद

प्रथम प्रकाशन :
**१४ ऑगस्ट १९७४**

मूल्य : १५ रुपये

**आ. कृ. वाघमारे स्मृति-समिती**

गोविंददास श्रॉफ, अध्यक्ष
स. कृ. वैशंपायन
बाबासाहेब परांजपे
मुकुंदराव पेडगांवकर
शामराव बोधनकर
राघवेंद्रराव दिवाण
अनंत भालेराव
भी. कृ. वाघमारे
स. मा. गर्गे
ज. रा. बर्दापूरकर
प्र. भा. भालेराव, चिटणीस

हैद्राबाद संस्थानच्या स्वातंत्र्य-संग्रामात
आपले बलिदान करणाऱ्या ज्ञात-अज्ञात

**हुतात्म्यांच्या स्मृतीला**

सा द र स म र्प ण



**आनंद कृष्ण वाघमारे**

जन्म : १६ मार्च १९०१

मृत्यु : १४ ऑगस्ट १९६८

# आ. कृ. वाघमारे स्मृति–समिती

## आवाहन

'मराठवाडा' पत्राचे सस्थापक–सपादक आणि माजी हैद्राबाद सस्थानातील स्वातत्र्य चळवळीचे एक अध्वर्यू कै. आनद कृष्ण वाघमारे याच्या लेखमग्रहाचा प्रस्तुत पहिला खड वाचकाना सादर करताना आम्हाला आनद होत आहे. वस्तुतः हे काम यापूर्वीच व्हावयास हवे होते. पण या ना त्या कारणाने ते लाबणीवर पडत गेले थोडे उशिरा का होईना आता ते प्रकाशित करण्याचा योग आला आहे.

श्री. वाघमारे १४ ऑगस्ट १९६८ रोजी निधन पावले. त्यानतर थोड्याच दिवसात त्याच्या साहित्य प्रकाशनासबधी विचारविनिमय करण्याकरिता त्याच्या चाहत्याची आणि जुन्या सहकाऱ्याची बैठक बोलावण्यात आली त्याच्या विचाराचा आणि जीवितकार्याचा चालू पिढीला परिचय करून द्यावा म्हणून त्याच्या निवडक लेखाचे दोन खड व त्यात समाविष्ट असलेले त्याचे चरित्र प्रकाशित करण्याचा निर्णय या बैठकीत घेण्यात आला. या कामाची पूर्वतयारी करण्यासाठी एक समितीही नेमण्यात आली. समितीच्या सभासदानी श्री. वाघमारे याचे दुर्मिळ साहित्य एकत्र करावे, त्याच्या चरित्रासबंधी माहिती मिळवावी आणि साहित्य प्रकाशनासाठी लागणाऱ्या खर्चाची तरतूद करावी असेही या बैठकीत ठरले

अशा प्रकारे पूर्व तयारी झाल्यानतर लेखाच्या सपादनाचे काम योग्य त्या व्यक्तीकडे सोपविण्यात यावे असाही निर्णय सर्वानुमते घेतला गेला

श्री. वाघमारे याचे लेख मुख्यतः त्यानी संपादन केलेल्या 'मराठवाडा' व त्या साप्ताहिकास बदी झाल्यानंतर प्रसिद्ध झालेल्या नागरिक, सग्राम,

रणदुदुभी, समरभूमी, सत्याग्रह, संजीवनी इत्यादी साप्ताहिकातून प्रसिद्ध झाले होते. त्याशिवाय निजाम विजय, तरुण भारत (नागपूर) या पत्रांतही काही लेख प्रकाशित झालेले होते. हे सर्व साहित्य मिळविणे बरेच कठीण काम होते. एक तर, चळवळीच्या काळात श्री. वाघमारे याचे लेख असलेली वर्तमानपत्रे जवळ बाळगायची देखील सरकारची भीती वाटावी असा तो काळ होता लोक 'मराठवाडा' चे अक उघडपणे ठेवायचे टाळीत असत ते अक वाचीत आणि लपवून ठेवीत वा टाकून देत असत. त्याशिवाय 'मराठवाडा' साप्ताहिकाची कचेरी प्रथम पुण्यास, नतर हैद्राबादेस व शेवटी औरगाबादेला हलविण्यात आली. या त्रिस्थळी हलवाहलवीतही काही अक गहाळ झाले. अशा विविध कारणानी श्री. वाघमारे याचे समग्र साहित्य उपलब्ध होणे अशक्य होऊ लागले. तरी पण काळाच्या आणि निजामाच्या तडाख्यातून जेवढे वाचले व मिळवता आले ते जमविले व त्यातूनच लेखाची निवड करून लेखसग्रह प्रकाशित करण्यात आला आहे

या लेखाच्या सपादनाची जबाबदारी प्रसिद्ध पत्रकार आणि लेखक श्री स. मा. गर्गे याच्याकडे सहा महिन्यापूर्वी सर्वानुमते सोपविण्यात आली. त्यानीही ती आपुलकीने मान्य करून प्रस्तुत पहिल्या खडाचे सपादन केले. या लेखावरून १९३६ ते १९४७ या दहा वर्षातील हैद्राबाद सस्थानातील राजकीय परिस्थितीचा आणि चळवळीचा जणू इतिहासच वाचकापुढे सादर झाला आहे हा कालखड सस्थानी घडामोडीच्या दृष्टीने अत्यत आणिबाणीचा होता अशा बिकट काळात श्री वाघमारे याच्या वृत्तपत्रानी जी कामगिरी केली ती किती बहुमोल होती याची कल्पना या लेखावरून येऊ शकेल अशी अपेक्षा आहे

लेखसग्रहाचा दुसरा खडही लौकरच प्रकाशित करण्यात येईल त्यात १९४८ ते १९५७ या दशकात श्री वाघमारे यानी लिहिलेल्या लेखाचा समावेश असेल. निजामाच्या शरणागतीपासून हैद्राबाद सस्थानची भाषिक विभागणी होईपर्यतचा हा काळही मराठवाड्याच्या राजकीय व सामाजिक जीवनात महत्त्वाचा होता

दोन लेखसग्रह प्रकाशित केल्याने श्री. वाघमारे याचे मराठवाड्यावरील ऋण फेडल्यासारखे होईल असे वाटत नाही त्याची राजकीय आणि वृत्तपत्रीय कामगीरी निश्चितच फार मोठी होती. म्हणून त्या कामगिरीला साजेसी त्याची अधिक व्यापक स्मृती कायम राहावी असा विचार अनेकांच्या मनात घोळू

लागला. त्यातूनच 'आ. कृ. वाघमारे स्मृती–समिती' नेमण्याचा विचार पुढे आला. ही स्मृती कशा स्वरूपाची असावी वगैरे तपशील समिती वेळोवेळी सल्ला-मसलत करून ठरवीलच अर्थात अशा व्यापक कार्याला पुरेसा निधीही जम-विण्याची गरज सहजच पटण्यासारखी आहे. मराठवाड्यातील जनता अशा नीधीसाठी हातभार लावील असा आम्हाला विश्वास वाटतो.

श्री. वाघमारे याचे सपूर्ण जीवन सर्मपित होते. लौकिक मोहासाठी अगर व्यक्तिगत महत्त्वाकाक्षेसाठी त्यानी कधीही तडजोड केली नाही. आपल्या विचाराशी ते सपूर्ण एकनिष्ठ राहिले. यामुळेच एक पत्रकार म्हणून ते टिळक, आगरकर याच्यासारख्या ध्येयवादी पत्रकाराच्या परपरेत शोभून दिसले. राजकारण आणि पत्रकारिता या दोन्ही क्षेत्रात त्यानी मराठवाड्याच्या कार्यकर्त्यांपुढे आदर्श निर्माण करून ठेवला आहे त्यानी सपादित केलेले 'मराठवाडा' साप्ताहिक चळवळीच्या काळात नसते तर स्वातत्र्य–सग्रामाच्या चळवळीला मार्गदर्शन कसे मिळाले असते ते सागणे कठीण आहे. त्याच्या साऱ्या लेखनातून केवळ त्यावेळची परिस्थितीच नव्हे तर अस्वस्थ लोकमानसही व्यक्त होत होते त्यातूनच चळवळ फोफावत गेली व तिने निजामाच्या अमानुष कृत्यावर प्रचड आघात केला अशा प्रकारे निजामी सत्तेच्या जोखडातून जनतेची मुक्तता करण्यासाठी जे प्रयत्न झाले त्याची मुहूर्तमेढ श्री. वाघमारे यानीच रोवली असे म्हटले पाहिजे

मराठवाड्याच्या स्वातत्र्यासाठी आणि भवितव्यासाठी ज्या थोर पुरुषाने हाडाची काडे केली, त्याची स्फूर्तिदायक स्मृती कायम ठेवणे आपले कर्तव्य आहे त्यासाठी मराठवाड्यातील जनतेने कृतज्ञतेच्या भावनेने सहकार्य करावे ही विनंती.

या कार्यासाठी आतापर्यंत ज्यानी साहाय्य केले त्याचे आम्ही आभारी आहोत.

कै. आ. कृ वाघमारे याचे निकटचे मित्र श्री. भा. ल. भालेराव यानी लेखसंग्रह प्रसिद्ध व्हावा यासाठी फार परिश्रम घेतले, या कामासाठी स्वतत्र प्रकाशन समिती स्थापन करण्यात पुढाकार घेतला. पण दुर्दैवाने तेही दिनाक १८ फेब्रुवारी १९७१ रोजी निधन पावल्यामुळे प्रकाशनाच्या प्रयत्नात काहीसा खड पडला. प्रस्तुत लेखसग्रह प्रकाशित होत असताना आम्हाला त्याची तीव्रतेने आठवण होत आहे

लेखसंग्रह संपादन करण्याचे काम दीर्घकाळ पडून राहिले होते, ती कामगिरी स्वीकारून थोड्या अवधीत श्री. स. मा. गर्गे यानी लेखाचे सपादन केले. त्यामुळे समितीच्या कार्याला गती मिळाली आहे.

कै. वाघमारे याचे विखुरलेले व त्यामुळे दुर्मिळ झालेले साहित्य जमविण्याचे काम श्री. र्भा. कृ. वाघमारे, श्रीमती आशाताई वाघमारे व श्री. प्रभाकर भालचद्र भालेराव यानी केले. या सर्वांच्या सहकार्याबद्दल समिती आभारी आहे.

गोविंददास श्रॉफ

औरंगाबाद

अध्यक्ष,

१ ऑगस्ट १९७४

आ कृ. वाघमारे स्मृति–समिती

---

## अकरा साप्ताहिकांचे संपादक

कै आ कृ. वाघमारे यानी पुढील अकरा साप्ताहिकाचे सपादन केले.

मराठवाडा, नागरिक, सग्राम, रणदुदुभी,
समरभूमी, हैद्राबाद–स्वराज्य, मोगलाई,
कायदेभग, सत्याग्रह, कायाकल्प, सजीवनी

'मराठवाड्याचा' पहिला अक : १० फेब्रुवारी १९३८
'संजीवनी' चा पहिला अक : २२ नोव्हेबर १९३८

वरील पैकी काही साप्ताहिकावर सपादक म्हणून इतरांची नांवे असली तरी त्याचे वास्तविक सपादक श्री. वाघमारेच होते हे सर्वांना माहीत होते.

# ‘संघर्षा’ची पार्श्वभूमी

## आ. कृ. वाघमारे : काळ आणि कामगिरी

मराठवाड्यातील झुजार पत्रकार, स्वातत्र्यसग्रामाचे सेनानी, सामाजिक कार्यकर्ते कै. आनद कृष्ण वाघमारे याच्या लेखाचा हा सग्रह वाचकाना दोन दृष्टीनी स्वागतार्ह वाटावा अशी अपेक्षा आहे. एक तर, या लेखावरून चाळीस वर्षांपूर्वी अधारात चाचपडणाऱ्या भयग्रस्त जनतेला निजामाच्या धर्मवेड्या मरजामी राजवटीविरुद्ध कशी झुज द्यावी लागली याचे ऐतिहासिक स्वरूप समजावे आणि दुसरे, स्वत: श्री वाघमारे याच्या प्रखर विचाराचे आणि ध्येयनिष्ठ कार्याचे महत्त्वही नव्या पिढीच्या लक्षात यावे.

सहा वर्षांपूर्वी श्री. आ. कृ. वाघमारे निधन पावले. हैद्राबाद संस्थान, प्रामुख्याने मराठवाडा हे त्याचे कार्यक्षेत्र होते या क्षेत्रात आयुष्यभर समाज-सेवेचे असिधाराव्रत त्यानी स्वत: तर चालविलेच पण अनेकाना सार्वजनिक कार्याची प्रेरणाही दिली. ते ध्येयवादी पत्रकार होते, तसेच सघटनाकुशल कार्यकर्तेही होते. स्वत. प्रसिद्धी पराङ्मुख राहून त्यानी विविध क्षेत्रात कार्यकर्ते तयार केले आणि सार्वजनिक सस्था उभारल्या.

सामाजिक कार्याबरोबर सभोवतालच्या राजकीय घटनाचा अभ्यास आणि त्याच्या अनुषगाने लेखन, चिंतन यात त्याना विशेष रस होता. त्यानी अनेक वृत्तपत्रात लेखन केले व सस्थानी प्रजेच्या दुःखाला वाचा फोडली सस्थानात स्वतःचे वृत्तपत्र काढण्याचा प्रयत्न केला. पण ते अशक्य झाल्यावर अत्यत प्रतिकूल परिस्थितीत १९३८ च्या आरंभी त्यानी पुण्याहून ‘मराठवाडा’ साप्ताहिक सुरू केले. त्याच्या साप्ताहिकाने मराठवाड्याच्या वैचारिक जीवनात एक नवा कालखंड सुरू केला.

हैद्राबाद संस्थानात १९३८ च्या सुमारास जेमतेम जीव धरून असलेले एखादे मराठी साप्ताहिक वगळले तर दुसरे नियतकालिक नव्हते. साप्ताहिक

छापता यावे असा छापखाना नव्हता. राजकीय संघटना नव्हती. चाळीस लाख मराठी भाषिकाना आपले सुखदु ख व्यक्त करण्यासाठी साधनच नव्हते त्या काळी सस्थानात मराठी, तेलगू, कन्नड भाषेतील वर्तमानपत्रे प्रसिद्ध करण्याची परवानगी मिळत नसे आणि सस्थानाबाहेरून येणाऱ्या वर्तमानपत्राना तत्परतेने बदी करण्यात येत असे श्री वाघमारे याना कोणत्या परिस्थितीत 'मराठवाडा' साप्ताहिक सुरू करावे लागले याचा अदाज वरील विवेचनावरून करता येईल

पण एवढचा जिद्दीने पुण्याहून त्यानी साप्ताहिक सुरू केले तरी त्यावेळच्या संस्थानी सरकारला त्याचे सारे प्रयत्न निकामी करण्याचे डावपेच चागले माहीत होते. 'मराठवाडचा' ने सस्थानात प्रवेश केला आणि लगोलग सरकारने त्यावर बदी घालण्याचा हुकूम काढला. निजामाच्या अशा दडपशाही धोरणावर मात करण्यासाठी श्री वाघमारे यानी साप्ताहिकाला नवे नाव देऊन आपले विचार-प्रसाराचे कार्य चालू ठेवले पण तेही सस्थानी हद्दीत गेले की त्यापाठोपाठ प्रवेश बदीचा हुकूमही जाहीर झाला. असे एकदा दोनदा नव्हे दहा महिन्याच्या अल्पावधीत श्री. वाघमारे यानी अकरा निरनिराळचा नावानी साप्ताहिकाचे सपादन–प्रकाशन केले आणि मराठी जनतेला सस्थानी राजवटीविरुद्ध स्वातत्र्य सग्रामाला उद्युक्त केले. वृत्तपत्रे चालविण्यासाठी त्याना करावा लागलेला असा सघर्ष वृत्तपत्रीय क्षेत्रात अद्वितीय मानावा लागेल केवळ दहा महिन्याच्या छोटचाशा कालखडात अकरा साप्ताहिके बंद पाडण्याचा निजामाचा 'विक्रम' आणि तेवढचाच हिरिरीने नावे बदलून पुन.पुन्हा त्याचे सपादन–प्रकाशन करणे हाही विक्रमच. वृत्तपत्र स्वातत्र्यासाठी आणि जनतेत विचारजागृती करण्या-साठी एवढा निकराचा सघर्ष, एवढचा चिकाटीने केल्याचे क्वचितच उदाहरण सापडेल. या संघर्षात ते मागे हटले नाहीत, थाबले नाहीत आणि हताशही झाले नाहीत. टिळक–आगरकरासारख्या थोर पत्रकाराच्या ध्येयवादी परपरेला शोभेल अशीच त्याची ती बहुमोल कामगिरी होती. खडतर परिस्थितीत त्यानी मराठवाडचात राजकीय विचाराच्या पायाभरणीचे भक्कम कार्य केले आणि मराठवाडचातील जनतेची अस्मिता जागृत केली

मराठवाडचाच्या स्वातत्र्य–सग्रामाशी श्री वाघमारे याचे नाव अविभाज्यपणे निगडीत झाले आहे. त्याना ज्या शक्तीविरुद्ध लढा द्यावयाचा होता ती संस्थानी शक्ती अत्यत प्रतिगामी, धर्मपिसाट आणि अतिरेकी होती. वस्तुत. तीस वर्षापूर्वी सस्थानी राजवट म्हणजे भारतीय राजकारणातील एक विकृत चमत्कारच होता. ब्रिटिश साम्राज्यसत्तेच्या आधाराने तो 'चमत्कार' शभर वर्षे टिकून राहिला. पण परकीय आधार निसटताच त्यावर पोसलेली संस्थानी बांडगुळेही कोलमडून पडली. अर्थात हे सहजगत्या घडले नाही.

सस्थानी सत्तेचे दु:सह राजकारण नष्ट करण्यासाठी प्रजेला सघर्ष करावा लागला. हैद्राबाद सस्थानात तर या सघर्षाचे स्वरूप अधिकच भीषण होते. निजामी राजवट नव्या विचाराचा वाराही लागू नये अशा अनैर्सगिक पद्धतीने जगत होती. तिने आपल्या सस्थानी जीवनाभोवती एक अभेद्य आवरण पसरून ठेवले होते. प्रजेला बाहेरचा प्रकाश दिसू नये आणि बाहेरच्या लोकाना आतील परिस्थितीचा सुगावा लागू नये असा त्या राजवटीचा वर्षानुवर्षे खटाटोप चालू होता वृत्तपत्रे नाहीत, सभा परिषदा नाहीत, सघटना नाहीत, थोडक्यात, सार्वजनिक जीवन जगण्याची शक्यताच नसल्यामुळे सस्थानातील जीवन मागासले, परावलबी आणि भयभीत बनले होते.

कोणतेही नागरिक स्वातत्र्य नसलेली वाचाहीन आणि दिशाहीन प्रजा वर्षानुवर्षे ' मुकी बिचारी कुणी हाका ' अशा अगतिक अवस्थेत जगत होती. सर्वच सस्थाने सरजामी अवस्थेत होती, पण हैद्राबाद सस्थानची सरजामी सत्ता मुस्लिम वेडामुळे अधिकच अमानुष बनली होती आधुनिकतेपासून अनेक योजने दूर असलेल्या अशा राजवटीला हलवणे केवढे महत्प्रयासाचे काम होते याची आज कल्पनाही येऊ शकणार नाही श्री. वाघमारे यानी आपल्या धारदार लेखणीने आणि राष्ट्रीय विचाराने त्या राजवटीला केवळ अस्वस्थच केले नाही तर, तिला प्रचड हादरे दिले.

श्री वाघमारे याना आपल्या वृत्तपत्राच्या प्रचारातून दोन हेतू साध्य करावयाचे होते. एकीकडे अरेराव, एकतत्री, जुलमी आणि धर्माध सरकारला त्याच्या जबाबदारीची जाणीव देणे आवश्यक होते, तर दुसऱ्या बाजूला दैववादी, दरिद्री आणि असघटित जनतेला कार्यप्रवण करावयाचे होते. जुनाट वृत्तीच्या सस्थानी यत्रणेवर प्रहार करणे आणि त्याबरोबरच त्या राजवटीच्या दीर्घकाल पकडीने बधीर बनलेल्या जनतेला चैतन्य देणे अशी दुहेरी कामगिरी पार पाडताना त्याच्या प्रचाराचा भर प्रामुख्याने नागरिक स्वातत्र्य, मातृभाषेतून शिक्षण आणि मराठी भाषेची सुरक्षितता या तीन प्रश्नावर असे.

' हैद्राबाद सस्थान हा एक प्रचड तुरुग बनला आहे ' असे त्याचे त्यावेळच्या राजकीय परिस्थितीचे यथार्थ निदान होते सामाजिक जीवन हे सार्थ नाव ज्याला देता येईल अशा जीवनाचा आरभच त्यावेळी सस्थानात झालेला नव्हता 'बहुसख्य लोकाना तोड असून बोलता येत नाही, कान असून ऐकता येत नाही, शिक्षित असून शिकविता येत नाही ' अशी अवस्था होती. प्रजेला आपली दु:खे बोलून दाखविण्याचे, लिहून सागण्याचे किवा अन्य प्रकारचे नागरिक स्वातत्र्यच नसल्यामुळे 'सस्थानातील प्रजेला प्रथम मनुष्य म्हणून, नागरिक म्हणून जगण्यास शिकविण्याची गरज ' होती जातीय चळवळी करून ही

गरज पूर्ण होणार नाही याविषयी त्याची खात्री होती. ते राष्ट्रीय विचाराचे होते आणि त्याच विचाराने नागरिकत्वाच्या मूलभूत हक्काचा प्रश्न त्यानी हिरिरीने माडला. ' लोकमताला जबाबदार असलेले सरकार स्थापन झाल्या–शिवाय समाजाची दु:खे कमी होऊ शकत नाहीत, मग ती दु:खे राजकीय असोत, सामाजिक असोत वा आणखी कसलीही असोत ' अशी त्याची ठाम भूमिका होती. याच भूमिकेवरून त्यानी स्वातत्र्य–सग्रामाला उद्युक्त होतील अशी मने चेतविण्याचे प्रचारकार्थ केले. या सदर्भात ते किती पोटतिडकीने लिहीत असत याची अनेक उदाहरणे सापडतील ' शाळा काढायची घ्या परवानगी, वृत्तपत्रे काढायची घ्या परवानगी, व्यायामासाठी आखडा तयार करायचा घ्या परवानगी, मिरवणूक काढायची घ्या परवानगी, उत्सव करावयाचा घ्या परवानगी, अशा एक ना दोन अनेक बाबीना परवानगीच्या शृखला घालून हैद्राबाद सरकारने आपल्या प्रजेला पशू करून ठेवले आहे ही बधने तोडण्याचा, झुगारण्याचा प्रयत्न न करणे म्हणजे स्वतः पशू असल्याचे मान्य करणेच आहे. आपले शेजारी असलेले आपलेच बाधव स्वपराक्रमाने प्रातिक स्वायत्तता मिळवून ती उपभोगत असलेले पाहूनही हैद्राबादेतील जनतेला या पशुजीवनाचा तिरस्कार न वाटावा व तिने, आम्ही माणसे आहोत व माणसाप्रमाणेच जगू इच्छितो, अशी घोषणा व मागणी न करावी तरच आश्चर्य होते. ' अशा विचारानी तरुणाची मने पेटल्यानतर ' सत्तेच्या मदाने मस्त झालेले अरेरावी सरकार प्रजेच्या असतोषाच्या खडकावर आपले डोके आपटल्याखेरीज राहाणार नाही ' याविषयी त्याची खात्री होती.

राजकारणाप्रमाणेच शिक्षण आणि मराठी भाषा या दोन विषयाचा त्यानी आपल्या साप्ताहिकातून मोठ्या आवेषाने परामर्श घेतला. वस्तुत हे सारेच प्रश्न निजामाच्या धर्मवेड्या राजकारणाशी सबद्ध होते. अशा राजकीय हेतूच्या अनुषंगाने त्याचे भाषिक आणि सास्कृतिक धोरण आखलेले होते आणि त्यात कडव्या धर्मप्रचाराचा धागाही अनुस्यूत होता उर्दू भाषा हे त्याच्या सत्तेचे प्रमुख माध्यम होते. त्याचा उपयोग करून त्याने बहुजन समाजाची भाषा, साहित्य आणि सस्कृती याचा कोडमारा केला. ' दहा टक्के लोकाची सस्कृती आणि भाषा नव्वद टक्के लोकावर सत्तेच्या दडुक्याने लादण्याच्या निजामाच्या रानटी खटाटोपावर ' श्री. वाघमारे यानी कडाडून हल्ले चढविले. ' सस्थानातील सरकारी शाळा म्हणजे उर्दू भाषा आणि तिच्या मागोमाग येणारी इस्लामी संस्कृती याचा प्रचार करणाऱ्या सस्था बनविण्याचे निजामाचे खोडसाळ धोरण ', श्री. वाघमारे यांनी अत्यंत विदारकपणे जनतेपुढे माडले.

उर्दूचे स्वतत्र विद्यापीठ स्थापन करण्याच्या निजामाच्या खटाटोपाची भलावण करणारा तथाकथित ' राष्ट्रीय विचार ' त्यावेळी माडण्यात येत असे. पण उर्दू भाषा सस्थानातील जेमतेम दहा टक्के लोकाची मातृभाषा होती आणि ती सक्तीने नव्वद टक्के लोकाच्या माथी लादण्यात आली होती. तिच्या प्रसारासाठी बहुसख्य प्रजेच्या कोटयवधी रुपयाची उधळपट्टी करण्यात येत होती. पण एवढे सारे अन्याय्य आणि विपरीत असूनही ते विद्यापीठ 'देशी माध्यमाचा पुरस्कार करणारे ' म्हणून प्रशसिले जाणे यामागे श्री. वाघमारे यानी म्हटल्याप्रमाणे एकतर अज्ञान असावे किवा मतलबी स्वार्थ तरी असावा. या सदर्भात त्यानी आकडेवार माहिती आणि सरकारी हुकमाचे उतारे सादर करून उर्दूचा मराठीला कसा सासुरवास होत असे हे सप्रमाण सिद्ध केले.

मराठी भाषा आणि साहित्य सुरक्षित राहिले पाहिजे या विषयी श्री. वाघमारे यानी अनेक लेखातून उत्कट तळमळ व्यक्त केली आणि त्याबरोबच त्यानी मराठवाड्याबाहेरील साहित्यिकाना मोठ्या अभिमानाने असेही सागितले की, ' हिमालयासारख्या प्रचड अडचणीखाली आमचे प्राण गुदमरत असतानाही आम्ही महाराष्ट्रीय सस्कृतीची तेजस्विता मराठी साहित्याच्या साहाय्याने कायम ठेवली आणि तीही प्रसिद्धी व प्रसाराची साधने नसताना.' त्याचा हा अभिमान सार्थ होता असेच कोणालाही मान्य करावे लागेल

श्री. वाघमारे राष्ट्रवादी विचाराचे पुरकर्ते होते. ' राष्ट्रवादी लोक–सघटनेवर विश्वास असलेले लोकशाहीवादी ' असे त्याच्या राजकीय भूमिकेचे वर्णन करता येईल. लोकमान्य टिळकाचे जीवन, कार्य आणि पत्रकारिता याचा प्रभाव त्याच्या ध्येयदृष्टीवर झालेला स्पष्ट जाणवतो. निजाम सरकारच्या धर्मवेडचा धोरणावर, तसेच आणखी दुसरे धर्मवेड काही उत्तर होऊ शकत नाही अशी त्याची धारणा होती. स्वातत्र्य–सग्रामाच्या प्रयत्नात ते धर्माचा ठिसूळ मार्ग स्वीकारायला तयार नव्हते. त्याच्या मते, ' हैद्राबादेत झालेले सत्ता व मुसलमान याचे ऐक्य फोडण्यास धर्माचा किवा सस्कृतीचा जुना पुराणा व ठिसूळ घण आज उपयोगी पडू शकत नाही. यासाठी पोलादी राजकीय घणच पाहिजे'. याच व्यापक दृष्टिकोणातून त्यानी हैद्राबादच्या स्वातत्र्यसग्रामात समाजातील सर्व जाती–जमाती, धर्म आणि वर्ग यानी एकोप्याने सहभागी व्हावे असे पोटतिडकीने आवाहन केले. शेतकऱ्याची दु.खे जाणून घेण्यासाठी तरुण कार्यकर्त्यानी खेडोपाडी जाण्याची गरज त्यांनी प्रतिपादन केली.

श्री. वाघमारे याची प्रतिपादनशैली अत्यत स्पष्ट आणि रोखठोक होती. अलकार किवा सजावट यांच्या ते भरीस पडत नसत. तर्कशुद्ध माडणी आणि पुराव्यासह केलेला युक्तिवाद हे त्याच्या विवेचन पद्धतीचे प्रमुख गुण

होते. लोकांच्या मनात प्रस्थापित अन्याय्य सत्तेविरुद्ध तीव्र प्रक्षोभ वाढविणे हे त्याच्या प्रचाराचे उद्दिष्ट असले तरी, त्यासाठी त्यानी असत्याचा किवा अतिशयोक्तीचा आश्रय घेतला नाही. आपला युक्तिवाद ठामपणे माडून परिस्थितीचे अचूक दर्शन घडविण्यासाठी सरकारचीच आकडेवार माहिती त्यानी अनेक ठिकाणी उपयोगात आणली आहे. एवढी पक्की भूमिका असल्यामुळेच ते सरकारची पोरकट व हास्यास्पद विधाने सहजगत्या परतवू शकत. निजामाच्या राजवटीत शिक्षणाचा प्रसार अत्यत कूर्मगतीने चालत होता. पण सरकार मात्र पोकळ प्रचाराने वस्तुस्थिती लपवू पाहात होते. या गोष्टीचा उपहास करताना त्यानी सरकारी आकडचाचाच उपयोग केला व सस्थानात शिक्षकापेक्षा किती तरी पटीनी दारुविके अधिक आहेत हे सप्रमाण दाखवून दिले (पृ २९). त्याच्या अशा प्रतिपादन पद्धतीचे अनेक नमुने या लेखसग्रहात पाहावयास मिळतील. वानगीदाखल, 'मोराची पिसे लावलेला डोबकावळा', 'हैद्राबाद सरकार व मराठी', 'कायदेभगाला आव्हान, सग्राम सुरू झाला', 'कारागृहाचे दरवाजे उघडा', 'सत्याग्रह सुरू झाला', 'तरुण वर्ग काय करणार?' इत्यादी लेखाचा येथे उल्लेख केला तरी पुरे आहे.

केवळ सरकारच्या पक्षपाती आणि मूर्खपणाच्या धोरणाचा परामर्श घेऊनच श्री. वाघमारे थाबत नसत निजामाचा अन्याय आणि लोकाचे अज्ञान अशा दोन्ही आघाडचावर त्याना लढावे लागत होते. लोकाच्या मनात आत्मविश्वास निर्माण करणे व त्याना सघटितपणे सरकारच्या अन्यायाविरुद्ध झगडण्यासाठी उभे करणे हेही त्याच्या प्रचाराचे तितकेच महत्त्वाचे अग होते. 'लोकपक्ष सत्यावर उभा आहे आणि त्याला विजयश्री लाभणारच' अशी विश्वासाची जाणीव त्यानी लोकमानसात रुजविण्याचा सातत्याने प्रयत्न केला. म्हणूनच तत्त्वनिष्ठा आणि प्रचार, सखोल कार्यनिष्ठा आणि प्रखर भावना याचा उत्कृष्ट सगम याच्या लेखनात दिसून येतो.

या लेखसंग्रहासाठी एकूण ४४ लेख व दोन भाषणे निवडली आहेत. त्यातील पहिला लेख ३१ मे १९३६ चा असून शेवटचा लेख २६ ऑक्टोबर १९४७ रोजी प्रसिद्ध झालेला आहे. या दशकात दुसरे महायुद्ध सुरू झाले आणि सपले. भारतीय राजकारणातून ब्रिटिश साम्राज्य सत्तेचा शेवट झाला आणि हैद्राबाद संस्थानात निजामाची राजवट मृत्यूच्या काठावर उभी राहिली. पुढच्या काही महिन्यातच ती स्वतत्र भारताच्या छोटचाशा धक्क्याने काळाच्या खोल दरीत कोसळून कायमची नष्ट झाली व त्याबरोबरच एका काळया कालखडाचीही समाप्ती झाली.

पण ही समाप्ती घडवून आणण्यात त्यावेळच्या पिढीला फार मोठा सघर्ष करावा लागला. त्यात अनेकानी देहदंड सोसला, कारावास, अमानुष छळ सहन केला, प्रसगी काही जणाना आपल्या प्राणाचे बलिदानही करावे लागले. श्री. वाघमारे यानाही खडतर अग्निदिव्यातून जावे लागले. पण वैयक्तिक सुखदुःखाचा विचार न करता त्यानी समाजासाठी उभे आयुष्य वेचले. सत्ता, सपत्ती किवा अधिकार याची अभिलाषा मनात येऊ न देता ते तापसी जीवन जगले. शेवटपर्यत समाजोन्नतीचे व स्वातत्र्य सपादनाचे कार्य ते उत्कट भावनेने करीत होते.

महाराष्ट्रातील, विशेषत मराठवाड्यातील जनतेला श्री. वाघमारे यानी स्वातत्र्य–सग्रामात मार्गदर्शन करून कायमचे ऋणी करून ठेवले आहे. अशा निष्ठावत समाजसेवकाविषयी कृतज्ञता व्यक्त करणे जनतेचे कर्तव्य आहे.

या थोर पुरुषाच्या स्फूर्तिदायी लेखाचे सपादन करण्याची सधी लाभली, याबद्दल मला आनद आणि अभिमान वाटतो. 'आ. कृ. वाघमारे स्मृति–समितीने' या कामाची जबाबदारी माझ्यावर सोपवून एकप्रकारे माझा गौरवच केला आहे असे मी मानतो. त्यासाठी या समितीचे अध्यक्ष श्री. गोविद-दासजी श्रॉफ याचा मी अत्यत आभारी आहे माझे मित्र श्री. ज. रा. बर्दापूरकर यानी अगत्य आणि आत्मीयता दाखवून हे कार्य पूर्ण करण्यास मला मदत केली. श्री. अनत भालेराव व श्री. स. कृ. उर्फ भाऊसाहेब वैशपायन याच्या सूचनाचा व सहकार्याचा मला फार उपयोग झाला. समितीचे सयोजक श्री. प्रभाकरराव भालेराव यानी चिकाटी दाखवून काम जलदगतीने पूर्ण करून घेतले. या सर्व मित्राचे मी मन.पूर्वक आभार मानतो.

जयहिद प्रेसचे सहव्यवस्थापक श्री रामकृष्णपत जोशी यानी आकर्षक छपाई करून दिली. त्याच्या व श्री. स. रा. मडलिक याच्या सहकार्याबद्दल मी आभारी आहे. तसेच जयहिद प्रेसच्या कामगार बधूच्या सहकार्याचा मी साभार उल्लेख करतो.

१ ऑगस्ट १९७४ **स. मा. गर्गे**

'ज्ञानेश' १२०५/४ शिवाजीनगर,

पुणे–४

# अनुक्रमणिका

खेळावे, खावे, प्यावे काय मनात आहे. कवि-
-त्वाशीला भरपूर वाव आहे. निसर्ग दृश्यांत
[illegible] पाहू [illegible] की ते [illegible]
[illegible] असलेले [illegible]
[illegible] जीवनातली दुःखं enjoy
करतां आली पाहिजेत. संकटांमुळे सावधानता
वाटली पाहिजे. अडचणींच्या उपयोगाने त्यांचे
दूर करण्याकडे [illegible] पाहिजे
असो [illegible] लिहीत
आहे. कळावे

[illegible]

आ. कृ. वाघमारे

**कै. आ. कृ. वाघमारे यांचे हस्ताक्षर**

त्यानी आपल्या मित्राच्या मुलाला
लिहिलेल्या पत्रातील उतारा.

# हैद्राबाद संस्थानातील लोकस्थिति : १

## महाराष्ट्रीय लोकसंख्येतील घट

हैद्राबाद संस्थान हिंदुस्थानातील देशी संस्थानांत पहिल्या प्रतीचे आहे. भाडेपट्टयाने दिलेल्या १८,००० चौरस मैलांच्या वऱ्हाडचा हिशेब विचारात न घेतला, तरी या संस्थानचे क्षेत्रफळ ८२,६९८ चौरस मैल आहे. केवळ क्षेत्रफळाच्या दृष्टीने देशी संस्थानांच्या यादीत हैद्राबादचा क्रमांक दुसरा आहे. ब्रिटिश हिंदुस्थानातील प्रांतांची तुलना करावयाची झाल्यास हैद्राबाद बंगाल एवढे विस्तीर्ण आहे. इंग्लंड आणि आयर्लंड यांच्या जोड-क्षेत्रफळाचे साम्य हैद्राबादशी असून, स्वित्झर्लंड हैद्राबादच्या एकपंचमांश-देखील नाही. अशा या विस्तीर्ण संस्थानातील लोकस्थितीची साधारण जाणीव संस्थानाबाहेरच्या अनेक लोकनायकांनाहि असत नाही. हैद्राबाद संस्थानात मुसलमानी सत्तेचा अंमल असल्यामुळे त्यांच्यात रूढ असलेल्या गोषा पद्धतीचा परिणाम संस्थानच्या कारभारावरही झालेला आहे व त्या-मुळेच लोकस्थितीची जाणीव करून घ्यावयाची एकाद्याला इच्छा झाली, तरी ती सहज पूर्ण होऊ शकत नाही. ही अडचण अंशत: दूर व्हावी म्हणून १९३१ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टाच्या आधारे हैद्राबादच्या लोकस्थितीसंबंधी या लेखात माहिती देत आहे.

## क्षेत्रफळ व लोकसंख्या

हैद्राबाद संस्थानचे क्षेत्रफळ ८२,६९८ चौरस मैल असल्याचे वर सांगितलेच आहे. हैद्राबाद संस्थानच्या नकाशावर मांजरा-गोदावरीला छेदून जाईल अशी दक्षिणोत्तर रेषा काढल्यास भौगोलिक दृष्टया महाराष्ट्र व आंध्र

(तेलंगण) असे समसमान दोन भाग पडतात. भाषेच्या दृष्टीने ही विभागणी बिनचूक नाही. महाराष्ट्रातील दक्षिणेकडील रायचूर जिल्ह्यात मराठीपेक्षा कानडी व तेलंगी भाषांचे अधिक वर्चस्व आहे. कर्नाटकचा भाग अत्यंत अल्प असल्यामुळे खानेसुमारीच्या सोयीसाठी त्यांचा समावेश महाराष्ट्रात–मराठवाड्यात केला आहे. महाराष्ट्र विभाग (१) औरंगाबाद, (२) बीड, (३) परभणी, (४) नांदेड, (५) उस्मानाबाद, (६) बीदर, (७) गुलबर्गा व (८) रायचूर याप्रमाणे आठ जिल्ह्यात आणि आंध्र विभाग (१) करीमनगर, (२) नलगोंडा, (३) वरंगल; (४) महबूबनगर, (५) आदलाबाद, (६) मेदक, (७) निजामाबाद व (८) अत्राफबल्दा, याप्रमाणे आठ जिल्ह्यात विभागला आहे.

क्षेत्रफळाच्या दृष्टीने हैद्राबादचे बंगाल प्रांताशी साम्य असले तरी लोकसंख्येच्या दृष्टीने हैद्राबाद बंगालच्या एक तृतीयांशाहि नाही. बंगालची लोकसंख्या पाच कोटीवर आहे, तर हैद्राबादची १,४४,३६,१४८ म्हणजे दीड कोटीलाहि कमी आहे. हैद्राबादच्या लोकसंख्येचे मध्यप्रांत व वऱ्हाडच्या लोकसंख्येशी बरेचसे साम्य आहे. मध्यप्रांत व वऱ्हाडची लोकसंख्या १,५५,०७,७२३ आहे. जिल्हानिहाय लोकसंख्येचे सरासरी प्रमाण ८,७३,०७८ असून बंगालचे १७,९०,०९१ तर मध्यप्रांत वऱ्हाडचे ७,०३,३०१ असे आहे. हैद्राबादच्या सेन्सस कमिशनरच्या मते संस्थानांत लोकसंख्येच्या वाढीला भरपूर वाव आहे.

## मराठी लोकसंख्येची कासवी वाढ

इ. स. १८८१ मध्ये असलेली हैद्राबादची ९८,४५,५९४ ही लोकसंख्या १८९१ मध्ये १,१५,३७,०४०. इ. स. १९०१ मध्ये १,११,४१,१४२, इ. स. १९११ मध्ये १,३३,७४,६७६, इ. स. १९२१ मध्ये १,२४,७१,७७० व इ. स. १९३१ मध्ये १,४४,३६,१४८ याप्रमाणे कमी आधिक झालेली आहे. पन्नासचा गोल आकडा म्हणून १८८१ मधील लोकसंख्येशी १९३१ च्या लोकसंख्येची तुलना करून तीत वाढ झाल्याचे दाखवण्यात आले आहे. तथापि सेन्सस कमिशनरनेहि दुष्काळ व रोगाची कारणे प्रथम सांगून लोकसंख्येची वाढ समाधानकारक झाली नसल्याचे

कबूल केले आहे. गेल्या पन्नास वर्षांत आंध्र प्रांताची लोकसंख्या शेकडा ७१.१ याप्रमाणे वाढली असून, महाराष्ट्राची मात्र शेकडा २६.७ प्र ाणेच वाढली आहे. लोकसंख्येच्या घटवाढीची कारणे, सेन्सस कमिशनरने बरीच चर्चिली आहेत. पण महाराष्ट्र व आंध्र यांच्या वाढीत इतके जवळ जवळ तिपटीचे अंतर का पडावे, याचा नीटसा बोध होत नाही. महाराष्ट्रीय तज्ज्ञांनी या गोष्टीचा बारकाईने शोध करणे अत्यंत अवश्य आहे. मराठी जिल्ह्यांतील लागवडीच्या जमिनीचे सरासरी प्रमाण ३५३५ चौ. मैल असे असून, लोकसंख्येचे प्रत्येक मैलाचे प्रमाण महाराष्ट्रात फक्त २४४ व आंध्र प्रांतात ४९३ म्हणजे जवळ जवळ दुप्पट आहे. तेलंगण प्रांतात महाराष्ट्रापेक्षा जंगल व डोंगर अधिक असून पावसाच्या व विहिरीच्या पाण्यावर त्याला अवलंबून राहावे लागते. याच्या उलट महाराष्ट्रात जंगल व डोंगरे कमी असून गोदावरीसारख्या नद्याहि आहेत. कापसासारखे अधिक पैसे देणारे पीक बव्हंशाने महाराष्ट्रातच निघते. असे असून महाराष्ट्राची लोकसंख्या आंध्रच्या प्रमाणात इतकी हळू का वाढावी हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

## आरोग्याची हेळसांड व तिचा परिणाम

लोकसंख्येच्या वाढीशी जन्ममृत्यूच्या परिणामांचा बराच निकट संबंध असू शकतो. १९२१ ते १९३० या दहा वर्षांतील जन्म-मृत्यूंची महाराष्ट्रातील जिल्ह्यांची सरासरी अनुक्रमे ६७४६६ व ८०३७३ व आंध्र जिल्ह्यांची ७५४८८ व ७९५८७ याप्रमाणे आहे. यावरून महाराष्ट्रातील जन्माची संख्या आंध्र प्रांतापेक्षा कमी असून मृत्यूंची संख्या मात्र अधिक आहे असे दिसते. जन्म-मृत्यूचे आंकडे विश्वसनीय नसल्याबद्दल वैद्यकीय खात्याची तक्रार आहे. पण महाराष्ट्रीय लोकसंख्येची कमी वाढ लक्षात घेता महाराष्ट्रीय लोकांच्या भोवती जीवनन्नाशक अशी काही परिस्थिती असावी असा दाट संशय येतो. स्वतःला स्वतःच प्रागतिक म्हणवून घेणाऱ्या हैद्राबाद सरकारने जन्म मृत्यूंच्या नोंदणीचे काम हडेलहप्पी व ज्यांत शेकडा ५० लोक निरक्षर आहेत अशा पोलिस खात्याकडून काढून त्याची नीट व्यवस्था करणे अत्यंत जरूरीचे आहे. असो.

## हिवतापाचा सर्वत्र प्रसार

लोकसंख्येच्या वाढीशी आरोग्याचा फार निकट संबंध आहे. या दृष्टीने पाहता वैद्यक व आरोग्य खात्याच्या डायरेक्टरांचा "जिल्ह्यांतील सर्वसाधारण आरोग्य अतिशय वाईट आहे" (It is still far from satisfactory)" हा शेरा विचारणीय आहे. जमिनीबरोबर असलेल्या विहिरी व तळी ही पिण्याचे पाणी मिळण्याची साधने असून कोणत्याही शहरात घाण बाहेर घालवण्याची चांगली सोय नाही. ही त्याची महत्वाची कारणे दाखविली जातात. पाऊस कमी अथवा उशिरा पडला म्हणजे खेड्यांतील लोकांना नदीच्या पात्रात झरे खणून मिळेल त्या पाण्यावर दिवस कंठावा लागतो. यामुळे कॉलरा, मलेरियादि रोगांचा उद्भव होतो. गेल्या दहा वर्षांत एकट्या कॉलऱ्याने ४२०४८ लोकांचा बळी घेतला आहे. प्लेग वगैरे सारख्या रोगांप्रमाणे मलेरियाने तडकाफडकी मरण येत नाही ही गोष्ट खरी पण त्याचे परिणाम अधिक भयंकर असतात. प्लेग येतो आणि जातो. कमावता माणूस गमावल्यामुळे मागे राहणारांना आर्थिक अडचणी ज्या येतील त्याखेरीज इतर शारीरिक अडचणी काही उरत नाहीत. याच्या उलट मलेरिया माणसाच्या जीवनशक्तीचे सतत शोषण करीत त्याला वर्षेच्या वर्षे आंथरुणावर लोळवीत असतो. मलेरिया व जीवनशक्तीचा ऱ्हास यामुळे क्षयादि रोगांचा जन्म होतो. ना मरण ना जीवन अशा विपरीत परिस्थितीत मलेरियामुळे दिवस काढावे लागतात आणि या रोगाचाच संस्थानात सर्वत्र संचार चालू आहे असे निझाम सरकारच्या वैद्यक खात्याचे डायरेक्टर म्हणतात.

## अपुरी वैद्यकीय मदत

खास हैद्राबाद शहरात या रोगाच्या निर्मूलनासाठी बरीच खटपट चालू आहे. आरोग्यावाबतीची जिल्ह्यांतील कामे 'लोकलफंड बोर्ड' च्या स्वाधीन असून वैद्यक खात्याचे डायरेक्टर म्हणतात, "त्याला आपल्या जबाबदारीची जाणीव होऊ लागली आहे, पण प्रगति मंद आहे." स्पेशल वॉटर बोर्डची नेमणूक सरकारने केलेली असून महत्त्वाच्या शहरांतून पाणी पुरवठ्याच्या व घाण बाहेर नेण्याच्या योजना तयार झाल्या आहेत. व कोठे कोठे कामही सुरू झाले आहे. पाण्याचे दुर्भिक्ष असलेल्या भागांत विहिरी खणण्यासाठी इ. स. १९२८ मध्ये १० लक्ष रुपये मंजूर करण्यात आले

असून, शिरगणतीच्या वेळी अशा खणलेल्या विहीरींची संख्या ४३३ होती. खेड्यापाड्यांतून रोगप्रतिबंधक उपाय करण्यासाठी १५ प्रवासी डॉक्टर्स काम करीत आहेत. संस्थानात एकंदर सरकारी दवाखान्यांची संख्या १४५ असून त्यांतून १५३४ रुग्णशय्यांची सोय केलेखी आहे. संस्थानात वैद्यकीय व्यवसाय करणाऱ्या सर्व प्रकारच्या लोकांची संख्या एकूण ६०३८ आहे. म्हणजे दर २४०० माणसांना एक वैद्य किंवा डॉक्टर असे प्रमाण पडते!

हैद्राबाद संस्थानात एकूण १३३ शहरे असून २१,१६७ खेडी आहेत. शहरांतील घरांची व लोकांची संख्या अनुक्रमे ३,९५,४८२ व १६,१६,९८१ असून खेड्यांतील अनुक्रमे २९,१६,७४० व १,२८,१९,२६७ आहे. एकूण लोकसंख्येपैकी साधारणपणे शेकडा ११ लोक शहरांतून राहतात व बाकीचे ८९ टक्के खेड्यांतून. शहरांतील लोकसंख्येत मुसलमानांचे प्रमाणच अधिक आहे. शेकडा ३३ वर मुसलमान शहरांत असून हिंदू शेंकडा ८.७ व हरिजन शेकडा ८.३ आहेत. या प्रकरणी सेन्सस कमिशनरने हिंदू समाजावर घरकोंबडेपणाचा (Stay at Home Population) आरोप केलेला आहे. सरकारी नोकरीच्या निमित्ताने संस्थानच्या तिजोरीवर व इतरत्र हात मारण्याची खास सवलत मुसलमानांना देण्यात येत असल्यामुळे त्यांची लोकसंख्या शहरांत अधिक आहे. मुसलमानांप्रमाणे हिंदूंना सवलत नसल्यामुळे नाइलाज म्हणून खेड्यांत राहून शेतावर राबून जीवन कंठावे लागते. उद्योगधंदे या बाबींची पुढे दिलेली माहिती सविस्तर अवलोकन केल्यानंतर सेन्सस कमिशनरचा हा आरोप, एक पाप झाकण्यासाठी, दुसरे पाप करण्याइतकाच कसा लबाडीचा आहे हे कळून येईल.

## हिंदूंचे संख्याबल घटत चालले

हैद्राबादच्या १,४४,३६,१४८ या लोकसंख्येत मुसलमान १५,३४,३६६, ख्रिश्चन १,५१,३८२, पारशी १,७८४, ॲनिमिस्टस ५,४४,७८९ व हिंदू १,२२,०३,५०० व ज्यू २७ आहेत. हिंदूच्या लोकसंख्येत ब्राह्मण ३,७६,४६८ व हरिजन २४,७३,२३० याप्रमाणे

आहेत. एकूण लोकसंख्येत हिंदूंचे शेंकडा प्रमाण ८८, मुसलमानांचे १० व ख्रिश्चनांचे घअ १॥ आहे. संस्थानातील लोकसंख्येत हिंदूंचे प्रमाण प्रचंड आहे खरे, पण ते गेल्या पन्नास वर्षांपासून कसे सारखे घसरत आहे व इतर समाजांचे संख्याबल कसे वाढत आहे हे खालील कोष्टकावरून स्पष्ट होईल.

प्रत्येक दहा हजारात जातींची संख्या.

| इ. स. | हिंदू | ख्रिस्ती | मुसलमान |
|---|---|---|---|
| १८८१ | ९,०३३ | १४ | ९,४० |
| १८९,१ | ८९,४१ | १८ | ९,८७ |
| १९०१ | ८८६० | २१ | १०३७ |
| १९,११ | ८६९,३ | ४० | १०३२ |
| १९,३१ | ८४३५ | १०५ | १०६३ |

## पुरुषांपेक्षा स्त्रिया कमी

हैद्राबाद संस्थानच्या लोकसंख्येत पुरुष ७३,७०,०१० व स्त्रिया ७०,६६,१३८ आहेत. त्यांचे प्रमाण दर १०० पुरुषास ९,५ स्त्रिया असे पडते; स्त्रियांचे हे प्रमाण मुंबईत ९,०, बंगालात ९,२, मध्यप्रांतात ९,९, मद्रासेत १०२, बिहार व ओरिसात १०५ असे आहे. संस्थानातील पुरुषांची सरासरी आयुर्मर्यादा २६ असून, स्त्रियांची २५.८ आहे. एकूण लोकसंख्येत स्त्रियांचे प्रमाण कमी आहे. पण पाच वर्षाच्या आतील लोकसंख्येत मुली शेंकडा ५२ व मुले शेंकडा ४८ आहेत. पाच वर्षावरील वयात मुलींचे प्रमाण घसरू लागते. यासंबंधी सेन्सस कमिशनरने "The natural law becomes operative, namely that the cause of death during the earlier age groups is selective eliminating the weak and the worthy and leaving the strong." असा शेरा मारला आहे. यात सत्यांश किती असेल, ते देवच जाणे! अलबत मुलींच्या वाढीकडे सर्वसाधारणपणे होणारे दुर्लक्ष, बालविवाह वगैरे कारणात काही तथ्यांश असू शकतो. स्त्रियांच्या मृत्यूला बाळंतपण, अज्ञान व दारिद्र्य ही कारणे अधिक लागू पडतात.

## सामाजिक बाबतीत प्रतिकूल धोरण

हैद्राबाद संस्थानात लग्न-नोंदणीचा कायदा अद्याप अस्तित्वात आलेला नाही. संस्थानी सरकारने नेमलेले काजी लोक मुसलमानांच्या लग्नाची नोंद करीत असतात. ख्रिस्ती समाजात हा लग्न-नोंदणीचा प्रघात आहेच. बहु-पत्निकत्वाची चाल बहुतेक जातींत रूढ आहे. मुसलमानात ही रूढी दिवसेंदिवस कमी होत चालल्याचा सेन्सस कमिशनरने निर्वाळा दिला असून, त्यांना आर्थिक परिस्थिती जाणवू लागली, हे कारण त्याच्या समर्थ-नार्थ त्याने दिले आहे. आज आर्थिक परिस्थितीचा दाब सर्वांनाच जाणवू लागलेला असल्यामुळे या रूढीचे आपोआपच उच्चाटन होऊ लागले आहे. ब्राह्मण व इतर काही अपवादात्मक जातींत पुनर्विवाह मान्य नाही. कै. ना. केशवराव साहेबांनी पुनर्विवाह कायदेशीर मानला जावा म्हणून आणलेले बिल, त्यांना कैलासवासी होऊन दोन तीन वर्षे झाली तरी, अद्याप बाहेर येत नाही! जहागीदारांच्या विधवांना पुनर्विवाह केल्यानंतरहि पूर्ववत अलौसेस मिळण्याची तरतूद करणाऱ्या फर्मानाचा मात्र कमिशनर साहेबांनी बिनचूक उल्लेख केला असून, नामदारांच्या बिलासंबंधी मूग गिळले आहेत. बालविवाहाला प्रतिबंध करणारा कायदा संस्थानात नाही. मुसल-मानांच्यासाठी उर्दूचे स्वतंत्र विद्यापीठ आपण होऊन स्थापन करणारे हैद्राबाद सरकार पुनर्विवाहाच्या बिलाला मात्र कायद्याचे स्वरूप द्यावयास तयार नाही! संस्थानातील हिंदूंची आर्थिक परिस्थिती दिवसेंदिवस अधिक बिकट होत चालल्यामुळे त्यांच्यात अविवाहित स्त्री पुरुषांची संख्या सारखी वाढू लागली आहे. विस्तारभयास्तव सर्व जातींची वयोमानानुसार माहिती देणे या ठिकाणी शक्य नाही. शास्त्र व कायदा ज्यांच्या पुनर्विवाहाला मान्यता देत नाही त्या ब्राह्मण वर्गापुरताच खाली विचार केला आहे.

## अविवाहितांची वाढती संख्या

ब्राह्मण वर्गात ६ वर्षाखालील विधवांची व विधुरांची संख्या अनुक्रमे ९० व २३, ७ ते १३ वर्षातील ४३९ व ८२, १४ ते १६ वर्षातील ६२३ व २२३, १७ ते २३ वर्षातील १९०८ व ११६४, २४ ते ४३ वर्षातील ७५३६ व ५५०९ आणि ४४ वर्षातील ९९२५ व ११९१२

याप्रमाणे एकूण १९५६१ विधवा व १८९१३ विधुर अशी आहे. एकूण ब्राह्मणांच्या लोकसंख्येत विधवांचे प्रमाण शेकडा ११ व विधुरांचे शेकडा १० असे पडते. अविवाहित ब्राह्मण पुरुषांची एकूण संख्या संस्थानात ७७२५९ व अविवाहित स्त्रियांची ६०७२७ एवढी प्रचंड आहे. १७ वर्षा-खालील वय विवाहास अयोग्य म्हणून सोडले तर १७ ते २३ वयाचे अविवाहित पुरुष ७४८३ व स्त्रिया ३१२०; २४ ते ४३ वयाचे अविवाहित पुरुष ५२७६ व स्त्रिया १८०७ आणि ४४ वयावरील पुरुष अविवाहित २३८१ व स्त्रिया १२३१ या प्रमाणे आहेत. एकूण ब्राह्मण लोकसंख्येत अविवाहित ब्राह्मण पुरुषांचे प्रमाण शेकडा ३० तर स्त्रियांचे शेकडा ३३ आहे. ब्राह्मण समाज इतरांच्या प्रमाणांत प्रागतिक समजला जातो. पण अद्याप त्यांच्यात ६ वर्षाखालील १४४ मुलांची व ३६८ मुलींची तसेच ७ ते १३ वर्षातील ३७४ मुलांची व ४३३७ मुलींची लग्ने झालेली आढळ-तात. संस्थानातील समाजसुधारकांनी या ब्राह्मणांच्या परिस्थितीच्या शिता-वरून भाताची परीक्षा करावी. असो.

पाश्चिमात्य सुधारणांचे वारे समाजात अधिक जोराने वाहू लागले आहे. या सुधारणा चांगल्या की वाईट हा प्रश्न येथे विचारात घ्यावयाचा नाही. बहुजनसमाजावर त्याचा परिणाम कसा काय होत आहे व या नवसुधार-णांचा स्वीकार किती प्रमाणात होत आहे एवढेच आपल्याला या ठिकाणी पाहावयाचे आहे. या दृष्टीने हिंदू जातीची संकलित स्थिती विचारात घेण्या-सारखी आहे. पाच वर्षाखालील दर एक हजार मुलांत इ. स. १८९१ मध्ये फक्त ७ जणांची लग्ने झालेली होती ती संख्या १९२१ मध्ये १३ व १९३१ मध्ये ४३ या प्रमाणे वाढत गेलेली आढळते. त्याचप्रमाणे पाच वर्षाखालील विवाहित मुलींची संख्या १८९१ मध्ये २३ व सन १९११ मध्ये ३१ व १९३१ मध्ये ७९ अशी वाढलेली आहे.

## मिळवत्यापेक्षा न मिळवतेच अधिक

हैद्राबाद संस्थानातील १,४४,३६,१४८ या लोकसंख्येत फक्त शेकडा ४७ लोक म्हणजे ६८,०२,६३१ मिळवते असून शेंकडा ५३ म्हणजे ७६,३३,७८७ लोक न मिळवते किंवा परावलंबी आहेत. मिळवत्यांच्या

संख्येपैकी ३९,०४,२०६ कच्चा माल उत्पन्न करणारे, १८,१४,१३४ खनिज पदार्थ विषयक धंदे करणारे, १,३८,२१६ सरकारी नोकरी करणारे, १,२८,९११ खाजगी बौद्धिक व्यवसाय करणारे व ८,१६,८९४ किरकोळ धंदे करणारे आहेत. एकंदर लोकसंख्येपैकी शेकडा २७ लोक अन्न उत्पन्न करतात, शेकडा १२ लोक खनिज पदार्थ विषयक उद्योग करतात; शेकडा १ सरकारी नोकरी; शेकडा १ स्वतंत्र बौद्धिक व्यवसाय व शेकडा ६ किरकोळ उद्योग करीत असतात. स्थूल मानाने शेंकडा ४५ लोक श्रमजीवी असून बुद्धिजीवी फक्त शेकडा २ आहेत. न मिळवत्यांची संख्या शेकडा ५३ आहे. त्यात लहान मुले व वृद्ध माणसे यांचाहि अंर्तभाव झालेला आहे. बेकार लोक संस्थानात किती आहेत व त्यांत पुन्हा सुशिक्षित किती आहेत या संबंधी खानेसुमारीच्या प्रतिवृत्तात काहीच माहिती मिळत नाही. सुशिक्षित बेकारांची वाढ होऊ नये या काल्पनिक भीतीने सुशिक्षितांची निपजच कमी करण्याचा प्रयत्न करणाऱ्या सरकारने बेकारांची नुसती मोजदादही केलेली नाही.

महाराष्ट्र : दि. ३१ मे १९३६

# हैद्राबाद संस्थानातील लोकस्थिति : २

## शिक्षणात व नोकऱ्यात कुचंबणा

हैद्राबाद सरकार घरगुती धंद्यांना उत्तेजन देत असल्याचा एकीकडे डौल मिरवते; पण दुसरीकडे लोकांना साध्यासुध्या गोष्टीतही परावलंबी करून त्यांची मीठमिरची हिसकून घेणाऱ्या यंत्राच्या वाढीबद्दल आनंद प्रगट करीत आहे. "Food Industries" या शीर्षकाखाली सेन्सस कमीशनरसाहेब म्हणतात :–

"For Social and economic reasons no one will regret the change that has come about in regard to that laborious method of pounding and grinding of grain in town. The work is now being done very largely by power driven mills and the women have thus been freed from these house-hold drudgeries."

तांदूळ सडण्याच्या व पीठ दळण्याच्या उद्योगातील लोकांची संख्या ३६४५ वरून १७६३ वर घसरली आहे. म्हणजे १८८२ किंवा शेकडा ५० पेक्षा अधिक लोकांना गिरण्यांच्या वाढीमुळे बेकार व्हावे लागले आहे. गरिबीच्या प्रपंचात, स्त्रियांना श्रमाचा कंटाळा उत्पन्न करण्यासारखी दुसरी कोणती भयंकर आपत्ती असू शकते? सर्व दिवसभर काबाडकष्ट करून मिळवलेल्या दोनचार आण्यातून धान्य दळणासाठी दोनचार पैसे गमावण्याची संवय जीवन कष्टमय करणारीच नाही काय?

## सावकारांची मोठी संख्या

सावकारीचा व्यवसाय करणारांची संस्थानात १९,८४५ संख्या आहे. यांपैकी शेकडा १० सावकार हैद्राबाद शहरात आहेत. सावकारीचा धंदा करणारांत शेकडा १४ स्त्रिया आहेत. महाराष्ट्रीय जिल्ह्यांतून शेकडा ७१ सावकार आहेत. महाराष्ट्र विभागात कापसाचा व्यापार मोठा असल्यामुळे पैशाची देवघेव मोठ्या प्रमाणात होते व त्यामुळे तेथे सावकारांची संख्या अधिक आहे म्हणतात. आधुनिक अर्थशास्त्राच्या प्रमेयाप्रमाणे कर्ज काढण्याची शक्ती जितकी अधिक तितकी सांपत्तिक परिस्थिती चांगली समजली जाते. पण हे शास्त्रीय प्रमेय व्यवहारात तितकेसे लागू होत नाही. पुष्कळसे कर्ज असणाऱ्याला श्रीमंत किंवा सुस्थित म्हणणे कितपत योग्य आहे? या तत्त्वाप्रमाणे विचार करायचा झाल्यास कर्जाच्या ओझ्याखाली दडपलेल्या शेतकऱ्याला श्रीमंत म्हणण्याचा अनवस्था प्रसंग उत्पन्न होईल. सावकारांची संख्या अधिक असणे हे वस्तुतः दारिद्र्याचे लक्षण आहे.

सावकारीचा व्यवसाय विशेषतः मारवाडी व कोमटी लोक अधिक करतात. परंतु हैद्राबाद संस्थानात मारवाडी सावकारापेक्षा मुसलमान सावकार अधिक आहेत. एकूण असलेल्या ३१०६ मुसलमान सावकारांपैकी शेकडा ८३ मुसलमान सावकार महाराष्ट्र विभागात आहेत. पठाणांच्या सावकारीची ख्याती सर्वत्र पसरली आहे. परवा नांदेड जिल्ह्यातील एका खेडेगावी काही हरिजनांनी दोन पठाण सावकारांचा खून केला म्हणतात! यावरून सावकारांच्या जाचाची कल्पना सहज येते. मारवाडी सावकार कुळाला लुबाडीत असेल; पण पठाण व मुसलमान सावकाराप्रमाणे तो त्याच्यावर अत्याचार किंवा जुलूम करीत नाही. अर्थात् वाटेल तशा कुळाला हवे तसे पैसे देणे मुसलमान सावकारालाच शक्य असल्यामुळे मारवाडी सावकारांना ते या क्षेत्रातून हुसकण्यास कारणीभूत होत आहेत यात आश्चर्य नाही.

## नोकऱ्यांतील पक्षपात

सरकारी नोकरीत संस्थानातील लोकसंख्येपैकी फक्त शेकडा १ च मनुष्य आहे. संस्थानाच्या नोकरीत इम्पिरियल आर्मी ४०८१, स्टेट आर्मी

२१५२७, पोलीस १६७७४, पोलीस पाटील १०२१५ (Village Watchmen), इम्पिरियल सर्व्हिस १८४८, स्टेट सर्व्हिस ४५०८१, इंडियन अँड फॉरेन स्टेट सर्व्हिस ४९, म्युनिसिपल अँड लोकल ११४४६, व्हिलेज ऑफिशिअल्स अँड सर्व्हंटस २७१९५ या प्रमाणे १,३८,२१६ जागा आहेत. यापैकी सैन्यात ५३६ व इतर खात्यांत १९६९ अशा २५०५ जागा अधिकाऱ्यांच्या असून त्यापैकी हिंदू २६२, मुसलमान २०९४ व ख्रिश्चन १४९ याप्रमाणे वाटलेल्या आहेत. बाकीच्या जागा हिंदू २३,३६८, मुसलमान १,१२,७३७ व ख्रिश्चन ३६६६ याप्रमाणे दिलेल्या आहेत. लोकसंख्येतील हिंदूंचे प्रमाण शेकडा ८८, मुसलमानांचे शे. १० व ख्रिश्चनचे शे. १॥ आहे. अधिकाऱ्यांच्या जागा हिंदूंना सैन्यातील ७॥ % व इतर ११॥ %, ख्रिश्चनांना सैन्यातील ७ % व इतर ५॥ % आणि मुसलमानांना सैन्यातील ८५॥ % व इतर ८३ % दिलेल्या आहेत. इतर किरकोळ सरकारी नोकऱ्यांतही मुसलमानांचे असेच प्राबल्य आहे. किरकोळ सरकारी नोकऱ्यांपैकी ८१ % मुसलमान, १६ % हिंदू व ३ % ख्रिश्चन याप्रमाणे दिलेल्या आहेत. हिंदूंच्या बाबतीत या प्रकरणी इतका स्पष्ट अन्याय होत आहे की, त्याच्या स्पष्टीकरणांची मुळीच आवश्यकता नाही. एकूण असलेल्या १,३८,२१६ सरकारी जागांपैकी १० % असलेल्या मुसलमानांना १,१४,८३१ जागा दिल्या जातात. यावरून हैद्राबाद सरकारचे धोरण किती सदोष आहे, हे सहजच कळते. संस्थानातील मुसलमानांत नोकरीयोग्य म्हणजे २० वर्षावरील साक्षर मुसलमानांची संख्या फक्त १,०८,९६२ व सरकारी नोकरीतील १,१४,८३१ जागा त्यांना देण्यात आलेल्या आहेत! यावरूनही सरकारी नोकरी देताना योग्यायोग्यतेचा विचार केला जात नसून मुसलमान असणे हेच सरकारी नोकरीला लायक असण्याचे प्रमाणपत्र मानण्यात येते, हे उघडच होते.

## धर्माच्या नावावर जगणारे

धर्माच्या नावावर जगणाऱ्यांची संख्या संस्थानात ७३,९१८ आहे. त्यात स्त्रियांचे प्रमाण २७ % आहे. लोकसंख्येच्या मानाने पाहूं जाता, प्रत्येक २०० लोकांना एक उपाध्याय हे प्रमाण पडते. लोकांच्या धार्मिक भावनांचा, केवळ स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी उपयोग करणारांची संख्या

ब्राम्हणांत सर्वात अधिक म्हणजे ३९६३५ आहे. या वर्गाचा आज सारखा अपकर्ष होत आहे. सुशिक्षित व समंजस लोक त्यांच्याकडे अत्यंत तिरस्काराने पाहात आहेत. आणि याचे खरे कारण काही असेल तर हेच की, या वर्गाने आपली त्यागाची, समाजसेवेची भूमिका सोडून भोगाची व समाज-नाशाची भूमिका स्वीकारली आहे. "इंग्रजी शिक्षणाने लोक नास्तिक बनले." या मोडक्या साधनाने हा वर्ग आपली कर्तव्यभ्रष्टता व स्वार्थांधता लपवण्याचा आज अट्टाहास करीत आहे. पण त्यात त्याला यश येण्याची आशाच नको.

## संस्थानातील दारुबाजी

हैद्राबाद संस्थानात दारुविक्रीचा धंदा फारच जोरात चालू आहे. दारू विकणारांची संख्या दीड लाखावर आहे. त्यांचे प्रमाण दर ९० माणसांना एक दारुविक्या असे पडते. दर २४०० माणसांना एक वैद्य किंवा डॉक्टर, दर २०० माणसांना एक धर्मगुरू, दर १३२५ माणसांना एक शिक्षक, दर १०० माणसांना एक सरकारी नोकर हैद्राबाद संस्थानात आहे. यावरून हैद्राबाद सरकारला लोकांना दारू पाजण्याचे महत्त्व अधिक वाटते, असा तर्क वाटल्यास कोणी काढावा! दारू विकण्याचा परवाना घ्यावा लागत असतो आणि तो सरकारच देत असते. अर्थात् या दारुविक्यांच्या वाढीचे श्रेय सरळ सरकारच्या दारातच पडते. लोकांना दारु पाजून हैद्राबाद सरकार त्यांच्या फाटक्या खिशांतून प्रतिवर्षी १॥। कोटी रुपये काढते. इ. स. १९२९ –३० वा वर्षी या खात्याचे उत्पन्न १,७८,५७,९०४ रुपये झाले असून, दारु व शिंदीच्या दुकानांची संख्या २९,६०२ होती. यावर्षी ८,२४,८९७ प्रुफ गॅलन्स दारू खपली. हैद्राबाद सरकारच्या लोकहितकारक कार्याचा यापेक्षा अधिक चांगला पुरावा कोठे शोधावा?

## भिक्षेकरी व कुंटणखाने

'अनुत्पादक व्यवसाय' या सदराखाली भणंग–भिकारी व कुंटण–कसबिणींची माहिती देताना सेन्सस कमिशनर म्हणतात की, भीक मागणे ही या भागातील सामान्य गोष्ट आहे. एकंदर भणंग–भिकाऱ्यांची संख्या १,२९,६९५ असून त्यात ६६,२१२ स्त्रिया आहेत. भिक्षेकऱ्यांत पुरुषा-

पेक्षा स्त्रियांची संख्या आधिक असण्याचे कारण त्यांचे आर्थिक पारतंत्र्य असू शकेल काय? पण मौजेची गोष्ट ही की ९६८६ पुरुष व ८४०२ स्त्रिया यांनी 'भिक मागणे' हा आपला जोड व्यवसाय असल्याचे नोंदविले आहे. असाहाय्यता किंवा शारीरिक व्यंगामुळे भीक मागणारे लोक समाजात आहेत. पण त्यांची संख्या फक्त २२१९६ आहे. म्हणजे १,०७,४९९ भिकारी अव्यंग आहेत. यांत काही असाहाय्य स्त्रिया आहेत अशी कल्पना केली तरी, भीक मागण्याचा रोग आमच्या समाजात बराच मोठ्या प्रमाणावर वसत असल्याचे दिसते.

कुंटण व कसबिणी यांची संस्थानातील संख्या अनुक्रमे १८९९ व ९३९५ आहे. ८१ पुरुष व ७३७ स्त्रियांनी हा आपला जोड व्यवसाय असल्याचे नोंदविले आहे. इ. स. १९११ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टात या वर्गाची संख्या १९०१ च्या प्रमाणात शे. ३० कमी झाल्याचा उल्लेख आहे. १९२१ च्या रिपोर्टात या वर्गाची संख्या १६७२ व ३११९ ही दाखविलेली आहे. १९३१ चे वर दिलेले आंकडे ताडून पाहता कुंटणींची संख्या २२७ ने व कसबिणींची संख्या ६२७६ ने वाढली, असे दिसते.

## घरगुती धंदे

संस्थानात चालू असलेल्या सर्व प्रकारच्या मागांची संख्या १९३१ मध्ये १११९९८ व १९२१ मध्ये ११५४३४ होती. घरगुती धंद्यांना उत्तेजन देण्याच्या सरकारी इच्छेचा व प्रयत्नाचा परिणाम म्हणून ३४३६ माग कमी झाले की काय काही समजत नाही. एकूण मागांची संख्या कमी झाली असली, तरी हैद्राबाद शहर व अत्राफबल्दा येथे ती २१२१ व २९२१ याप्रमाणे अनुक्रमे वाढली असून, त्याचे श्रेय व्यापार व उद्योग खात्याकडे प्रमुखत्वाने व अल्पांशाने खादीच्या चळवळीला दिलेले आहे.

## शिक्षणात मागासलेले हैद्राबाद

शिक्षण प्रसाराच्या दृष्टीने, हैद्राबादसारखा मागासलेला प्रांत अखिल हिंदुस्थानात दुसरा नाही. आणि असे असूनही हैद्राबाद सरकार आपण आपल्याला प्रागतिक म्हणवून घेते! १९३१ च्या सेन्सस रिपोर्टात, सेन्सस कमिशनरनींच बंगाल, मद्रास, मध्यप्रांत, वऱ्हाड, मुंबई, त्रावणकोर, म्हैसूर,

बडोदा येथील साक्षरतेचे आकडे देऊन हैद्राबादच्या तुलनेची सोय केली आहे. दर हजारी साक्षरता त्रावणकोर २८८, बडोदा २०५, बंगाल १०५, म्हैसूर १०३$\frac{1}{3}$, मुंबई ८६, मद्रास १२२, वऱ्हाड-मध्यप्रांत ६०$\frac{1}{3}$ याप्रमाणे असून हैद्राबादेंत ४८$\frac{1}{3}$ आहे. म्हणजे हैद्राबादचा क्रमांक अगदी शेवटचा आहे. या आपल्या मागासलेल्या स्थितीचे समर्थन, सेन्सस कमिशनरसाहेबांनी असे केले आहे की, इ. स. १९२१ पूर्वी निजाम साहेबांच्या सरकारचे धोरण शिक्षण प्रसाराचे होते; व म्हणून त्यावेळी शाळांची व विद्यार्थ्यांची संख्या १९११ च्या प्रमाणात जवळजवळ चौपटीने वाढली. पण आता शिक्षण खाते संख्येपेक्षा कार्यक्षमतेकडे अधिक लक्ष देत आहे. से. कमिशनरच्या या वक्र स्पष्टीकरणाचा भावार्थ स्पष्ट शद्बांत द्यावयाचा तर तो हा की, १९२१ मध्ये एकूण शाळांची संख्या ८०३९ होती, ती १९३१ मध्ये ५३३२ वर घसरली आहे. इतर प्रांतांच्या प्रमाणांत हैद्राबाद कमालीचे मागे असता शिक्षण संस्थांची वाढ न करता त्या घटवल्या आहेत. वस्तुतः सरकारी शाळांच्या संख्येत गेल्या दहा वर्षांत जवळजवळ तीनशेची वाढच झालेली आहे. घट झालेली आहे ती खाजगी शिक्षण संस्थांच्या संख्येत. १९२१ मध्ये खाजगी शिक्षण संस्थांची संख्या ४०५३ होती, ती १९३१ मध्ये १०४९ वर येऊन आदळली आहे. आणि याचे खरे श्रेय संस्थानच्या शाळा खात्याने खाजगी शाळांवर घातलेला निर्बंध व त्याची अंमलबजावणी पोलीस खात्याकडून करवली गेली या दोन गोष्टींनाच आहे. खाजगी शाळांची संख्या आपोआप कमी झाली असती तर त्याबद्दल उत्तर देताना हैद्राबाद सरकारला तोंड वेडेवाकडे करण्याचे कारणच नव्हते. पण तो आपल्या जुलमी धोरणांचाच प्रत्यक्ष परिणाम आहे हे स्पष्ट दिसल्यामुळे संख्यापेक्षा आम्ही कार्यक्षमतेकडे अधिक लक्ष पुरवीत आहोत अशी मखलाशी केलेली आहे.

## हिंदूंना मारक शैक्षणिक धोरण

इ. स. १९१८ मध्ये अत्यंत अन्यायाने उर्दू विद्यापीठाची स्थापना हैद्राबादेत झालेली असल्यामुळे हिंदू समाजावर त्याचा जबरदस्त आघात होऊन खाजगी शाळांची संख्या १९२१ मध्ये कमालीची वाढली असल्याचे आढळून आले आहे. १९११ मध्ये खाजगी शाळा फक्त १२५९ होत्या त्या

१९२१ मध्ये ४०५३ झाल्या असल्यामुळे शाळा खात्याचे धाबे दणाणले व या गोष्टीला आळा घालण्यासाठी त्यांना कायदा करून पोलीसच्या करवी त्या हजारोनी बंद कराव्या लागल्या आहेत. अशा स्थितीत शिक्षण प्रसाराच्या कार्यात लोकपक्षाला साहाय्य करावयाच्या ऐवजी अडथळे करणारे हैद्राबाद सरकार स्वतःच्या शिक्षण खात्याद्वारे इस्लामी संस्कृतीचा प्रसार करण्याच्या महत्त्वाकांक्षेलाच बळी पडले आहे, असे कोणी का म्हणू नये? केवळ पाच आणि पंधरा वर्षे वयाच्या ३३,३३,४९४ लोकसंख्येत फक्त १,१०,९९८ साक्षर आहेत. म्हणजे प्रत्येक १०० मुलापैकी अवघे ४ देखील शाळेत जात नाहीत. शे. ९६ मुले शाळांबाहेर भटकत असता व सरकारचे लक्ष से. कमिशनर म्हणतात त्याप्रमाणे, विश्वविद्यालयीन शिक्षणाकडे लागलेले असता, ३००४ खाजगी शाळा बंद करण्यास कारणीभूत होणारे हैद्राबादेतील शिक्षण खाते काहीतरी दुष्ट हेतूने प्रेरित झालेले आहे, असा संशय लोकांना येणे स्वाभाविकच नाही काय?

हैद्राबादेतील शैक्षणिक धोरण हिंदूंना मारक व मुसलमानांना पोषकच कसे आहे याबद्दल से. रिपोर्टात अनेक पुरावे सांपडतात. हिंदूंच्या साक्षरतेबद्दल से. कमिशनर म्हणतात,

"Brahmnnic Hindus occupay a very low position in the matter of literacy. There being 47 persons literate per mille." आणि मुसलमानांच्या साक्षरतेबद्दल "Among Muslims, only 120 per mille are literats as compared with 90 in ten years ago." साक्षरतेच्या बाबतीत हिंदूंच्या प्रमाणात मुसलमानांची जवळजवळ तिपटीने वाढ होण्यास संस्थानी शाळा खात्याच्या उपरिनिर्दिष्ट धोरणाशिवाय दुसरे काय कारण असू शकते?

महाराष्ट्र : दि. ७ जून १९३६

# हैद्राबाद संस्थानातील लोकस्थिति : ३

## उर्दूचा मराठीला सासुरवास

हैद्राबाद संस्थानात तेलंगी, मराठी, कानडी व उर्दू या चार भाषा प्रमुखत्वाने प्रचारात आहेत. त्या बोलणारांची संख्या तेलंगी ६९,७२,५३५, मराठी ३७,८६,८३८, कानडी १६,२०,०९४ व उर्दू १५,०७,२७२ याप्रमाणे आहे. पन्नास वर्षांपूर्वी म्हणजे १८८१ मध्ये तेलंगी बोलणारांची संख्या ४२,६६,४७०, कानडी १२,३८,५१९, मराठी ३१,४७,७४५ व उर्दू बोलणारांची १०,३८,३०५ होती. गेल्या ५० वर्षांत उर्दू बोलणारांची संख्या शेकडा ५० ने वाढली आहे. याच्या उलट संस्थानच्या खऱ्या हक्कदार भाषांची वाढ अत्यंत कमी झालेली आहे. इ. स. १९२१ मध्ये मराठी भाषेचे दर हजारी लोकसंख्येतील प्रमाण २६४ होते ते १९३१ मध्ये २६२ वर घसरले आहे. या प्रकरणी सेन्सस कमिशनर म्हणतात,

"Bir among the Marathwada districts holds the predominent position in the matter of the Marathi language. It is numerically so, but as compared with previous censuses Bir is retrograding as the following marginal figures indicate. A perceptible fall in the number of Marathi speakers is also noticeable in Aurangabad, Nander, Parbhani and Osmanabad which are distinctly Marathi districts and the causes for such a steady decline are worth investigating.

सरकारच्या भाषेने सिंहासन व विद्यापीठ गाठावे आणि खऱ्या मान-करणींनी रस्ते झाडावेत अशातला नाही का हा प्रकार? पण हैद्राबादच्या साहित्याचार्यांना मराठी भाषेच्या अधोगतीबद्दल कधी खंत वाटली व त्यांनी त्यासाठी काय स्वार्थत्याग केला आहे? महाराष्ट्र साहित्य संमेलनाच्या अधिकाऱ्यांना संस्थानच्या अधिकाऱ्यांशी पत्रव्यवहार करण्यास भाग पाडून प्रत्यक्ष पुराव्याचा प्रसंग आला असता केवळ स्वार्थत्याग व कष्ट नकोत म्हणून, तोंडघशी पाडण्याची वेळ आणली हाच की नाही?

हैद्राबाद संस्थानातील मराठी मातृभाषा असणारांची ३७,८६,८४६ लोकसंख्या जिल्ह्यांतून, "हैद्राबाद शहर १६,३४४, अत्राफबल्दा १७,९०३, वरंगल १३,६८५, करीमनगर ९५५४, आदलाबाद १,५९,५०९, मेदक ८५४९, निझामाबाद ८३६५, महबूबनगर १२,१८७, नलगोंडा ३६४६, औरंगाबाद ७,४०,६१४, बीड ५,५२,६४२, नांदेड ४,५०,६२१, परभणी ७,०८,७२०, गुलबर्गा १,९८,९५०, उस्मानाबाद ५,४६,७४९, रायचूर ११,२५८ व बीदर ३,२७,५३८" याप्रमाणे विभागलेली आहे.

आणि जी स्थिती मराठी भाषेची तीच संस्थानातील कानडीचीही आहे. इ. स. १९०१ पासून ही भाषा बोलणारांचे प्रमाण सारखे घसरत आहे. इ. स. १८८१ मध्ये संस्थानातील दर हजार लोकसंख्येत कानडी भाषा बोलणारांचे प्रमाण १२६ होते ते १९३१ मध्ये ११२ झालेले आहे.

## उर्दूची वाढ व इस्लामी संस्कृति प्रचार

संस्थानातील देशी भाषांच्या विरुद्ध उर्दू भाषेचा प्रसार संस्थानात उलट झपाट्याने वाढू लागला आहे. इ. स. १८८१ मध्ये दर हजारी लोक-संख्येत उर्दू मातृभाषा असणारांचे प्रमाण फक्त ९४ होते ते १८९१ मध्ये ९८, इ. स. १९११ मध्ये १०३, इ. स. १९२१ मध्ये १०४ व १९३१ मध्ये १०६ याप्रमाणे सारखे वाढत आहे आणि याला कारण, संस्थानातील बहुसंख्य लोकांच्या तेलंगी, मराठी व कानडी या भाषांचा हक्क मारून, त्यांची उपासमार करून उर्दूला पोसण्याचे संस्थानचे अन्यायी धोरण होय.

शक्य त्या प्रत्येक मार्गाने, इस्लामी संस्कृतीचा प्रसार करण्यासाठी हैद्राबाद सरकार कसा आटोकाट प्रयत्न करीत आहे हे उर्दू भाषेसंबंधी

सेन्सस कमिशनरने नमूद केलेल्या खालील उद्गारांवरून अधिकच स्पष्ट होते. ते म्हणतात,

"Urdu is not the mother tongue of Muslims in the sense that Telgu is of Telangas, Marathi of Marathas or Kanarese of Kanadas. A close study of the figures in columns 3 and 4 of the statement above illustrates the point. There are Hindus (including Adi Hindus) and Christians who have written their mother tongue Urdu and therefore, which the Muslim population represent 104 per mille of population. Urdu is the mother tongue of 100 out of a thousand persons. Among other communities we find that there are 89,592 Brahmin hindus, 21,001 Adi Hindus, 368 Jains, 1400 Sikhs, 3303 Christians, 3261 Tribals and 234 others whose mother tongue is Urdu. The language as the medium of instruction at all stages of education, general and technical, and as one employed in official correspondance has of late received considerable stimulas."

भाषेच्या सहवासाने तिच्यातील विचारावर प्रेम जडते व नंतर आचार आवडू लागतात. विचार व आचार यांच्यांत बदल झाला म्हणजे मनुष्याचे धर्मांतर झाल्यासारखे असते आणि म्हणूनच परधर्मीय जेते किंवा सत्ताधीश आपल्या भाषेचा प्रसार जितक्या मार्गाने शक्य असेल त्या मार्गाने करीत असतात. हिंदुस्थानातील मुसलमानांचे व हैद्राबाद सरकारचे धर्मवेड तर प्रसिद्धच आहे. त्यांच्या उर्दू प्रेमाचा व देशी भाषांच्या द्वेषाचा हेतू दुसरा काय असणार? १,१९,१६१ मुसलमानेतर लोक उर्दू ही आमची मातृभाषा म्हणण्याइतपत अधःपतित झालेले आहेत. यावरून हैद्राबाद सरकारच्या उर्दू भाषा प्रसारातील हेतू इस्लामी संस्कृतीचा प्रसाराच आहे, हे सिद्ध होत नाही काय?

## मुसलमान वाढले व हिंदू घटले

इतर अनेक बाबींप्रमाणे धार्मिक दृष्ट्या मुसलमानांची वाढ व हिंदूंची घट होत असलेली दिसत असल्यास त्यात काहीच नवल नाही. इ. स. १९२१ मध्ये दर हजार लोकसंख्येत मुसलमानांचे प्रमाण १०४ होते ते इ. स. १९३१ मध्ये १०६ झालेले आहे. "Animism is the Ante Chamber of Hinduism." हे मान्य करणाऱ्या सेन्सस कमिशनरला त्यांची संख्या निराळी दाखविण्याची गरज काय भासली कोण जाणे? हे लोकही निःसंशय हिंदू आहेत. आदी हिंदूंची (हरिजनांची) संख्याही दर हजारी १८८ होती ती १७१ वर घसरली आहे. इतर कोणापेक्षाही हरिजनांची संख्या अधिक घटत चालली आहे. याचे कारण परधर्मीयांची सोनेरी जाळी व स्वधर्मीयांचा जुल्म हेच आहे याबद्दल वाद नाही. हिंदुधर्माचे प्रामाण्य मानणारांचा वर्ग कमी कमी होणे हे हिंदुधर्माच्या उत्कर्षाचे चिन्ह की अपकर्षाचे? सनातन्यांच्या डोक्यांत केव्हा उजेड पडणार कोण जाणे?

इस्लामच्या अनुयायांची संख्या झपाट्याने वाढतच आहे. इ. स. १९२१ ते १९३१ या दहा वर्षात त्यांची संख्या शेकडा १८ ने वाढली आहे. हिंदूंची संख्या कमी व्हावी व मुसलमानांची १८ ने वाढावी यावरून हैद्राबाद सरकारच्या समत्वाचा चांगला बोध होतो. संस्थानातील मुसलमान महाराष्ट्र विभागांत शेकडा ५६ व आंध्र विभागांत शेकडा ४४ आहेत. इस्लामसंबंधी लिहिताना सेन्सस कमिशनर साहेब म्हणतात, "The ratio of 100 males to 86 females in the city is evidence of the presence of the upcountry men as businessmen and government servants living at home their womenfolk." उत्तर हिंदुस्थानातील धर्मवेड्या मुसलमानांच्यासाठी हैद्राबाद संस्थानचे कुरण कसे मोकळे ठेवलेले आहे याचा वरील उद्गारावरून चांगला बोध होतो.

महाराष्ट्र : दि. १० जून १९३६

# हैद्राबाद संस्थानातील लोकस्थिति : ४

## याला जबाबदार कोण?

हैद्राबाद संस्थानातील लोकस्थितीची यथार्थ कल्पना देणारे काही लेख यापूर्वी 'महाराष्ट्र'त प्रसिद्ध झालेले आहेत. या लेखांतून वर्णन केली गेलेली परिस्थिति सहेतूकपणे कशी निर्माण केली गेली, तिजबद्दल जबाबदार कोण व विशेष प्रकारच्या प्रयत्नांशिवाय ती बदलणे कसे अशक्य आहे. या लेखात चार शब्द लिहिण्याचे योजिले आहे.

हैद्राबाद संस्थानातील हिंदूंची परिस्थिती अत्यंत बिकट होत असून, तितक्याच प्रमाणात मुसलमानांची सुधारत आहे, ही गोष्ट सेन्सस रिपोर्टच्या आधारे लिहलेल्या तीन लेखांतून मी सिद्ध केली आहेच. हैद्राबादेतील हिंदूंचा अपकर्ष होण्यास हैद्राबाद सरकारच सर्वस्वी जबाबदार आहे. हैद्राबाद सरकारच्या या जबाबदारीवर प्रकाश पाडणारे लेख यापूर्वी महाराष्ट्रातून येऊन गेले असल्यामुळे त्यासंबंधी या ठिकाणी पुन्हा विचार करण्याचे प्रयोजन नाही. आता प्रश्न हाच की, ही परिस्थिती सहेतुकपणे, कोणी, कशी व केव्हा निर्माण केली व ती बदलण्यास काय उपाय योजावयास पाहिजेत?

## विसाव्या शतकातील औरंगजेब

या बाबतीत लोकप्रवाद तर अनेक प्रकारचे ऐकू येतात. त्यांच्यावर विश्वास ठेवावा की नाही हा मोठा प्रश्न आहे. या प्रकरणी मद्रासच्या 'हिंदू'च्या ता. ११ ऑगस्ट १९२३ च्या अंकात सेट निहालसिंग या

जगप्रसिद्ध लेखकाने हैद्राबादच्या सध्याच्या निजामसाहेबासंबंधी लिहताना खालीलप्रमाणे विधान केले आहे.

"Everyone whom I consulted during my rather long stay in the Nizam's Dominions, was certain this falling away from the only standard which India can afford to have, is due to the unfortunate bias which an old who taught the Nizam gave to him in favour of Islam, when the latter's mind was in an impressionable stage. It is said that he used to boost of the fact that he had created another Aurangzeb."

सेट निहालसिंग यांच्या वरील विधानात सत्यता आहे की नाही, हे पाहण्यास आजच्या प्रत्यक्ष परिस्थितीचे चित्र हेच अचूक गमक आहे. हैद्राबादेतील आजची स्थिती सेट निहालसिंगाच्या विधानाला पूर्णपणे पुष्टी देणारीच आहे हे काही सांगावयास नको.

## निजामाचे धर्मवेड

संस्थानातील असंतुष्ट मुसलमानांचा अल्पसा वर्ग संस्थानातील वस्तु-स्थितीची जबाबदारी फक्त उच्च अधिकारारूढ उत्तर हिंदुस्थानी मुसलमानांवर व इंग्रज सरकारवर घालीत असतो; आणि काही समानधर्मीय हिंदूही या विधानाला उचलून धरण्याचा प्रयत्न करीत असतात. हे सर्व लोक अधि-काराच्या जागांसाठी हपापलेलेच बहुतकरून आढळतात आणि त्यांच्या मते, निजामसाहेबापर्यंत आपल्या या मुल्की चळवळच्या टिमकीचा आवाज गेला तर आपल्याला एकादी छोटी मोठी अधिकाराची जागा मिळेल. या लोकांच्या मते स्वतः निजाम साहेब अत्यंत निर्दोष असून, इंग्रज सरकारच्या या बगल-बच्च्यांनी राज्यकारभार सर्वस्वी आपल्या हाती घेतलेला आहे. मुल्की चळवळ करणारांचे म्हणणे सर्वस्वी नसले तरी बव्हंशी खरे आहे. त्यात चूक असेल, तर ती हीच की, खुद्द निजाम साहेबांना ते निर्दोषी ठरवू पाहतात. वस्तुतः या सर्व गोष्टींचे मूळ निजाम साहेबांचे धर्मवेडच आहे.

इंग्रज सरकार हे सार्वभौम सरकार असल्यामुळे निजाम साहेबांचे अस्तित्व त्यांच्या कृपेवर अवलंबून आहे, यात वादच नाही. पण याचा अर्थ निजाम साहेबांना धर्मवेडे बनवण्यास इंग्रज सरकार कारणीभूत आहे, असा मुळीच नाही. निजाम साहेबांचे धर्मवेड त्यांना त्यांच्या गुरूकडून लाभलेले आहे. ते काही इंग्रजांनी दिलेले नाही.

"स्क्रुटेटर" या नावावर एका मुल्की मुसलमानाने हैद्राबाद राज्य-कारभारावर काही वर्षांपूर्वी मुंबईच्या क्रॉनिकलमध्ये एक लेखमाला लिहली होती. खरी सत्ता उरलीच नाही, इंग्रज सरकारच्या बगलबच्च्यांनी संस्थानची नासाडी, निजामसाहेबांच्या इच्छेविरुद्ध चालवली आहे. हाच मुद्दा प्रामुख्याने प्रतिपादीला आहे. निजामसाहेब स्वतः अत्यंत कर्तव्यनिष्ठ पुरुष असून; त्यांच्यातील एक धर्मवेडाचा दोष वगळला तर, त्यांच्याशी तुलना करण्यास दुसरा मनुष्य सापडणे कठीण आहे.

## जगप्रसिद्ध लेखकाचा दाखला

त्यांच्या कर्तत्वासंबंधी व कर्तव्यतत्परतेसंबंधी सेंट निहालसिंग तारीख ४-८-२३ च्या हिंदूत लिहितात,

"But he is a man of restless energy. For him it is not unusual to work from early in the morning till late in the evening and some times even far into the night. His interest is confined to no single department of state, nor he content merely to lay down principles and leave the details to be worked out by others He has no passions, no hobby, other than keeping a strict eye upon the administration and managing his crown property as economically as possible. He rarely goes out of "King Kothi" and all his walking hours are devoted to making enquiries into what is happening in his exclusive dominions, asking questions of everyone he sees, reading papers sent up to him or perhaps called for by him, and dictating orders on

every imaginable topic, on every day of the week, with the exception of Friday, which devout muslim, that he is, he refuses to break except for some very special reasons which can not be avoided."

या अशा निजामसाहेबांना संस्थानाबद्दल काही माहिती नाही व त्याबद्दल ते जबाबदार नाहीत असे म्हणणे खरोखरच धाष्टर्याचे आहे. संस्थानातील अधिकारी वर्ग संस्थानच्या हिताकडे बघणारा नाही ही गोष्ट खरी पण याला कारण इंग्रज सरकार नसून स्वतः निजामसाहेबच आहेत.

"Officials exist and the higher ones among them constitute the executive council, whose functions have been clearly defined. These officials, however, live and work in the shadow of personal rule. Rather than take the risk of having their decisions upset, they naturally prefer to find out their master's will before passing orders even upon comparatively trivial matters which be well within their competence.

## एक जुनी आठवण

सेट निहालसिंगाच्या या विधानावरून अधिकारी वर्गाच्या म्हणण्याला निजामसाहेब मान तुकवीत नसून त्यांच्या इच्छेच्या अनुरोधाने अधिकारी वर्ग वागत असतो ही गोष्ट सिद्ध होते. इंग्रज सरकाच्या हिताला बाधक अशी एकादी गोष्ट निजामसाहेब सहजासहजी करू शकत नाहीत, याबद्दल कोणीच वाद घालणार नाही. याचा अर्थ त्यांच्या अंतगत कारभारातही त्यांना स्वातंत्र्य नाही असे करणे चूक आहे. निजामसाहेबांना आपल्या अंतगत कारभारात अनिर्बंध स्वातंत्र्य आहे. सर अली इमामसारख्या मुख्य प्रधानपदावरील अधिकाऱ्याला न्यायाधिशाच्या जागेवर एका हिंदूची नेमणूक करण्याच्या कामी किती अडथळे आले याचे सेंट निहालसिंग यांनी आपल्या लेखात वर्णन केलेले असून एकाद्या जागेसाठी मुसलमानेतर मनुष्याची शिफारस केल्यास निजामसाहेब "योग्य मुसलमान उपलब्ध नाहीत काय?"

किंवा "योग्य मुसलमानांची नावे का सुचविली नाहीत?" अशा प्रकारचे प्रश्न विचारीत असल्याचाही त्यांनी उल्लेख केलेला आहे.

## अलिगडचे वारे हैद्राबादेत

कोणचेही राज्य म्हणजे एक संस्थाच होय. सार्वजनिक संस्था अगर चळवळी चालवणाराला लोकसंग्रहाची बाब किती महत्त्वाची असते व तिच्या-शिवाय कोणचीही चळवळ कशी यशस्वी होऊ शकत नाही हे सांगण्याचे कारण नाही. विशिष्ट हेतूने राज्यकारभार चालवू इच्छिणाऱ्या राजाने, आपल्या भोवतालची खोगीर भरती बाजूला सारून आपला हेतू पूर्ण करू शकणाऱ्या योग्य माणसांचा संग्रह परप्रांतातून करावा हे तात्त्विक दृष्ट्या निःसंशय योग्य आहे. मूळ हेतूच चूक असल्यामुळे त्याच्या पूर्ततेसाठी केल्या जाणाऱ्या साऱ्या गोष्टी चूक ठरतील ही गोष्ट निराळी. निजाम-साहेबांनी आपली महत्त्वाकांक्षा सफल करण्यासाठी अलिगडच्या इस्लामी विद्यापीठाकडे धाव घेतलेली आहे. या प्रकरणी सेट निहालसिंग लिहितात,

"It casually occured to me to ask him (an eminent Hyderabad official) if he could name off hand, howmany of his colleagues holdiug high posts in Nizam's service were either graduates and post-graduates of the Anglo-Oriental college at Ailgarh (Now the Muslim University of Aligarh) or were in one way or another connected with that institution, I was amazed at the long list which those names made."

## निजामसाहेबांचा पैशाचा हव्यास

सध्याची जागनिक परिस्थिती अर्थप्रधान आहे. पैसा ही एक आज अमोघ शक्ती आहे. कोणचेही लहान मोठे कार्य करावयाचे असो, पैसा अवश्य पाहिजे. पैशाशिवाय आज काहीच करणे शक्य नाही. तसेच पैशाने अनेक अशक्य गोष्टी गोष्टी शक्य होऊ शकतात. ही गोष्ट निजामसाहेबांनी अगदी प्रथमच ओळखली होती. संस्थानची सूत्रे हाती घेतल्यावर कित्येक वर्षे त्यांनी पैसा जमा करण्याची एक प्रचंड मोहीम चालवली होती. त्यांच्या

सुदैवाने त्यावेळी लढाईमुळे बाजारात पैसाही पुष्कळच खेळत होता. नजराणा म्हणून प्रचंड रक्कम प्रजेकडून त्यांनी सक्तीच्या खुषीने काढली म्हणतात. एकदा तर भांडारखान्यातील खराब होऊ लागलेला मद्य, मोठ-मोठ्या सावकार वगैरे लोकांकडे भेट म्हणून पाठवून त्याच्या मोबदल्यात हजारो रुपये वसूल केले गेले म्हणतात. सारांश, पैसा मिळविण्याचा प्रत्येक शक्य मार्ग निजामसाहेबानी अत्यंत कसोशीने चोखाळलेला असून आज तर सर्व जगात त्यांच्या श्रीमंतीला तोड उरलेली नाही. त्यांच्या खाजगी खर्चासाठी साधारणपणे एक कोटीच्या उत्पन्नाची त्यांना स्वतंत्र जहागीर असून याशिवाय सरकारी तिजोरीतून प्रतीवर्षी ते पन्नास लाख रुपये उचलतात. त्यांची राहणी अत्यंत काटकसरीची, साधी व निर्व्यसनी असल्यामुळे अगदी सहज प्रतिवर्षी एक कोटीचा संग्रह निजामसाहेब करू शकतात.

## हिंदू संस्कृतीवर संक्रांत

अगणित संपत्ति, कर्तबगार अधिकारी वर्ग, हातात सत्ता व हिंदुस्थान आणि बाहेरच्या मुसलमानांचे पाठबळ इतक्या गोष्टींचा सुंदर संगम घडून आल्यानंतर हैद्राबाद संस्थान हे इस्लामच्या चळवळीचे आदिपीठ बनून त्याची पाळेमुळे गेल्या पंचवीस वर्षांच्या दीर्घ कालात खोल गेली असावीत यात काहीच नवल नाही. अत्यंत हुशार, धोरणी व मुत्सद्दी अशा मंत्रीमंडळाची जोड लाभल्यामुळे पंचवीस वर्षांच्या दीर्घ कालावधीत, लोकसंख्येत शेकडा ८०–८५ हिंदू असूनही बदललेल्या काळाला अनुसरून इस्लामच्या प्रसाराचे कार्यही अगदी अद्ययावत साधनांच्या साहाय्याने चाललेले आहे. मुसलमान लोक हैद्राबाद हे मुसलमानांचे राज्य तर समजतातच, पण बहुसंख्य हिंदुंचीही कल्पना अगदी तीच आहे. दुर्दैवाने ही समर्थांची जन्मभूमी, आज इतकी निस्त्राण व निःसत्व बनली आहे की, हिंदू संस्कृतीवर येवढी प्रचंड आपत्ती ओढवली असता तिला असा प्रतिकार करणारी एकही व्यक्ति एक कोटी हिंदु समाजात निर्माण झाली नाही!

## निस्त्राण हिंदु समाज

निजामसाहेबांच्या धूर्त सरकारने आपल्या मालकाच्या इच्छेनुसार खजिन्यातील पैशांच्या व हातातील सत्तेच्या आधारावर एकीकडे इस्लामला

उचलण्याचा व त्याबरोबरच दुसरीकडे हिंदूंना दाबण्याचाही अत्यंत सावध-गिरीने प्रयत्न केला आहे. हिंदू समाज अगोदरच अज्ञानांधःकारात निश्चेष्ट पडलेला, निर्धन बनलेला, जगण्यापुरतेही खाण्याला न मिळाल्यामुळे काया-वाचा-मनाने निर्बल झालेला, कायद्याच्या बंधनाने चोहोकडून जखडलेला व कागदोपत्री सनदशीर पण प्रत्यक्ष व्यवहारात बव्हंशी बेसनदशीर वागणाऱ्या सरकारच्या आडमुठ्या शिपायांच्या जुलुमामुळे भेदरलेला व बाहेरचा बंधुवर्ग हा स्वतःच्या सुखदुःखाचे प्रश्न सोडविण्यात गर्क झालेला असल्या-मुळे नोकरशाहीला या प्रयत्नात बरेचसे यश सहज संपादिता आले. सारांश, आज हैद्राबाद संस्थानात हिंदू म्हणून स्वाभिमानाने व माणुसकी सांभाळून जगण्याची शक्यताच उरलेली नाही, हाती लेखणी असून लिहिता येत नाही. आजची ही स्थिति केव्हा, कशी व कोणाकडून बदलली जाईल हे सांगणे कठीण आहे!

महाराष्ट्र : दि. २८ जून १९३६

# हैद्राबाद संस्थानातील लोकस्थिति : ५

## शाळा खात्याचा खोडसाळपणा

हैद्राबाद सरकारचे शैक्षणिक धोरण, दिवसेदिवस इतके उघडपणे हिंदु-विरोधी होऊ लागले आहे की, यापुढे संस्थानातल्या हिंदू समाजाला आपली उन्नती करून घेण्याचे सर्व सरळ मार्ग बंद होणार, असे दिसत आहे. गेल्या दहा वीस वर्षांत शिक्षणक्रमात इतकी भयंकर क्रांती केली गेली आहे की, संस्थानातील सरकारी शाळा म्हणजे इस्लामचा अप्रत्यक्ष प्रचार करणाऱ्या संस्थाच होत, असे म्हणणे भाग पडू लागले आहे. केवळ उर्दूच्या वेडगळ व अन्यायी प्रेमामुळेच हैद्राबाद सरकारने आपल्या शैक्षणिक धोरणात बदल केला असता तर हिंदूंच्या खाजगी शैक्षणिक प्रयत्नांना प्रतिक्षणी हाणून पाडण्याचे अमानुष धोरण त्यांनी कधीही स्वीकारले नसते. खाजगी शिक्षण संस्थांच्या मागे परवानगीचा ससेमिरा लावून त्यांची संख्या तीन हजारांनी घटवली या एकाच उदाहरणावरून हैद्राबाद सरकारचे विघातक धोरण स्पष्ट होते. तथापि या कायद्याच्या जाचाला धैर्याने तोंड देणाऱ्या खाजगी संस्थांच्या मागे निजाम सरकार कसे हात धुवून लागते याचे अगदी ताजे उदाहरण अंबेजोगाई येथील "जोगेश्वरी विद्यालय" चे दाखविता येईल.

## जोगेश्वरी विद्यालय

जोगेश्वरी विद्यालय ही एक अंबेजोगाई येथील स्थानिक हिंदू समाजाने कित्येक वर्षांपासून चालविलेली शिक्षण संस्था आहे. गतवर्षीपर्यंत या संस्थेत फक्त प्राथमिक शिक्षणाचीच सोय होती. मुख्य जिल्ह्याच्या ठिकाणी जाण्या-येण्यासाठी पक्की सडक अथवा रेल्वे नसल्यामुळे व जिल्ह्यात इतरत्र हाय-

स्कूलच्या शिक्षणाची सोय नसल्यामुळे, येथील लोकांना आपली मुले औरंगाबाद किंवा हैद्राबादसारख्या दूर ठिकाणी ठेवावी लागत असत. ही व्यवस्था फक्त श्रीमंतानाच परवडत असे. गरीब विद्यार्थ्यांना आपली शिक्षणेच्छा पूर्ण करण्याची शक्यताच नव्हती. ही लोकांची गैरसोय दूर करण्याची बुद्धी या वर्षीपर्यंत हैद्राबाद सरकारच्या शाळा खात्याला कधीच होऊ शकली नाही. सरकारची सहेतुक उदासीनता व लोकांची होत असलेली गैरसोय लक्षात घेऊन जोगेश्वरी विद्यालयाच्या चालकांनी आपली हायस्कूल चालविण्याची इच्छा प्रत्यक्षात आणण्याच्या दृष्टीने प्राथमिक शिक्षणानंतरचे तीन वर्ग गतवर्षी सुरू करून पहिले पाऊल टाकले व त्यासंबंधी शिक्षण खात्याच्या अधिकाऱ्यांना सूचना देऊन रीतसर परवानगीही मागितली. या नव प्रयत्नांचा उद्‌घाटन समारंभ बीड जिल्ह्याच्या कलेक्टरसाहेबांच्या अध्यक्षतेखाली करण्यात आला होता. ही गोष्ट विशेषेकरून लक्षात ध्यावयास पाहिजे. कोणच्याही सार्वजनिक चळवळीच्या जीवनाला व वाढीला हैद्राबाद संस्थानातील हवा इतकी कल्पनातीत प्रतिकूल आहे की, तिचा प्रत्यक्ष अनुभव असलेला प्रत्येक मनुष्य, तालुक्याच्या गावी हायस्कूल चालविण्याच्या या धाडशी प्रयत्नाकडे अत्यंत कौतुकानेच पाहील. त्यातही हे हायस्कूल हैद्राबाद सरकारच्या धोरणाला तंतोतंत अनुसरून उर्दू माध्यमाद्वारे शिक्षण देणारे आहे. साराश सरकारला या प्रयत्नाला शक्य त्या प्रकारे साहाय्यच करणे भाग पडेल. अशाच प्रकारे संस्थेचा चालक वर्ग वागला आहे. पण, हैद्राबाद सरकारच्या दूषित दृष्टीला हिंदू समाजाने स्वखर्चाने स्वोन्नतीचा केलेला प्रयत्न पाहून कौतुक किंवा समाधान वाटण्याऐवजी संतापच आला व तो प्रयत्न हाणून पाडण्यासाठी सरकार आपली बुद्धि व शक्ती खर्च करीत आहे. हैद्राबाद सरकारच्या शाळा खात्याचा हा हिंदुद्वेष नाही काय? हा प्रयत्न हाणून पाडण्यासाठी शाळा खात्याच्या अधिकाऱ्यांना या वर्षीपासून आपले हायस्कूल सुरू करण्याचा खोडसाळपणा करण्याचे दुसरे काय कारण आहे बरे!

## सरकारचे अनिष्ट धोरण

खाजगी शैक्षणिक प्रयत्नाला उघडपणे विरोध करण्याचे नैतिक धैर्य हैद्राबाद सरकारजवळ नाही. पण त्याला हाणून पाडण्यासाठी अप्रत्यक्षपणे

अनेक कुटिल डाव टाकावयासाठी ते कधीच चुकत नाही. निजाम सरकारच्या शाळाखात्याचे धोरण साधे व सरळ असते तर या प्रयत्नाचे कौतुक व अभिनंदन करून आणि थोडिशी आर्थिक मदत करून बहुसंख्य हिंदूंच्या अंतःकरणात त्याला आदरणीय असे स्थान सहज मिळविता आले असते. पण शांतताप्रिय लोकांच्या अंतःकरणाची आज किंमतच आहे कोणाला? शांततेचा भंग होऊ नये म्हणून हिंदूंना आपल्या मातृभाषेला दूर लोटून उर्दूला कवटाळू द्या, मौ. हाशमीसाहेबांनी लिहलेल्या श्रीशिवाजी महाराजाना व हिंदू धर्माला अनादराने पहाण्यास शिकवणारा इतिहास आपल्या मुलांना शिकवू द्या, की आणखी काही करू द्या, जोपर्यंत हिंदू हे हिंदूच आहेत तोपर्यंत त्यांच्या प्रत्येक प्रयत्नाला राजकीय म्हणून, शांतता भंग करणारा म्हणून किंवा आणखी काही कारणाने सरकार हाणून पाडल्याशिवाय राहूच शकत नाही. अशी एकंदर परिस्थिती निर्माण झालेली आहे आणि याचे काही कारण असेल तर ते हे की सत्ता व संपत्तीच्या बळावर वाटेल त्या गोष्टीला वाटेल तो रंग देऊ शकतो व आपले कोणीच काही करू शकत नाही याची सरकारला वाटत असलेली खात्री हेच होय.

## खाजगी प्रयत्न हाणून पाडण्याच्या युक्त्या

संस्थानच्या शिक्षण खात्याच्या प्रत्येक हायस्कूलचा सरासरी खर्च वार्षिक वीस हजार रुपये व मिड्ल स्कूलचा दहा हजार रुपये असतो. खाजगी प्रयत्नाने सुरू होणारे हायस्कूल येनकेन प्रकारेण बंद पडावे, याच उद्देशाने शाळा खात्याने तेथील मिड्ल स्कूलला हायस्कूलचे स्वरूप दिले असल्यामुळे त्याच्या खर्चात दहा हजारांची वाढ झाली आहे. सरकारची वागणूक स्वच्छ व सरळ असती, तर जनतेच्या दहा हजाराची अशी उधळउट्टी करण्याचे खरोखरच काही कारण नव्हते. सरकारच्या खजिन्यात पैसा अधिकच झाला होता तर खाजगी प्रयत्नाला पाच पाच हजारांची दोन ठिकाणी मदत करून सरकारची इभ्रत व प्रजेच्या शैक्षणिक प्रगतीची शुभेच्छा अधिक वाढवता व स्पष्ट करता आली नसती काय?

हैद्राबाद सरकारच्या शिक्षण खात्याने या विद्यालयाला गतवर्षी मान्यता न दिल्यामुळे हायस्कूल प्रवेश परीक्षेला जाणाऱ्या विद्यार्थ्यांना व चालकांना

निरर्थक खर्च व त्रास सहन करावा लागला. दुसरी गोष्ट सरकारने आता आपले हायस्कूल सुरू केले असून, तेथील फीचा दर कमी असल्यामुळे पुष्कळ विद्यार्थी लालचावणारच. त्यात पुन्हा सरकारी नौकर, जहागीरदार, इनामदार या सरकारावलंबित वर्गाला आपली मुले सरकारी शाळेत पाठवून राजनिष्ठा व्यक्त करावी लागणारच. त्यांनी ती आपणहून केली, तर ठीकच, नाही तर हळूच अंधारात त्यांची कानउघाडणी व्हायचीच. सारांश, ज्या शाळा खात्याला खाजगी प्रयत्नाला मान्यता देण्या न देण्याचा प्रश्न निकालात काढण्यापूर्वी सरकारी हायस्कूल सुरू करण्याचा खोडसाळपणा सहज करता येतो, त्याला या गोष्टी करणे कठीण आहे काय? अशा प्रकारे विद्यार्थ्यांच्या अभावी वर्ग बंद करण्याचा प्रसंग खाजगी संस्थेच्या चालकांवर आणणे जर सरकारला सहज शक्य आहे, तर उघडपणे परवानगी नाकारण्याचा गैर-मुत्सद्दीपणा तरी सरकार कशाला दाखवील? परवानगी नाकारावयाची नाही, बक्तशीर द्यावयाचीही नाही, प्रतिक्रियेसाठी दुसरी संस्था तत्पूर्वीच निर्माण करावयाची व गावातील लोकांना आपली मुले पाठविण्यासाठी कमी फीची, शिष्यवृत्त्यांची, माफीची लालूच दाखवावयाची किंवा अधिकाराचा दाब टाकावयाचा व अशा प्रकारे खाजगी प्रयत्न अयशस्वी ठरवावयाचा सरकारी उद्देश या एकंदर गोष्टीवरून स्पष्ट दिसत नाही काय?

## हायस्कूलची तरतूद कशी केली ?

त्रैवार्षिक बजेटाची पद्धत सध्या हैद्राबाद सरकारने प्रचारात आणली असल्यामुळे, गतवर्षी कित्येकांची अशी समजूत होती की, खाजगी प्रयत्नांना हाणून पाडण्यासाठी सरकारी हायस्कूल सुरू करण्याचा शिक्षणाधिकाऱ्यांचा कितीही हेतू असला तरी, नवीन बजेट जाऊन त्याला मान्यता मिळेपर्यंत त्यांना तसे करणे शक्य होणार नाही. पण या लोकांच्या कल्पना! ज्यांना हवे ते कायदे करता येतात, त्यांना ते हवे त्या मार्गाने बदलता येत नाहीत काय? इतर अनेक शाळांच्या खर्चातून थोडी थोडी काटछाट करून एकूण रकमेत वाढ न होऊ देता या नव्या हायस्कूलच्या खर्चाची तरतूद केली गेली असून त्याला कार्यकारी कौन्सिलची मान्यताही मिळवली गेली आहे. सत्ता व संपत्ती हाती असल्यानंतर जेथे एक दोन वर्षांत स्वतंत्र

विद्यापीठ निर्माण करता येते, तेथे एका मिडल स्कूलला हायस्कूलचे स्वरूप देणे कसे कठीण असू शकेल ?

हैद्राबाद सरकारची कार्यपद्धती अशी चमत्कारिक आहे की, त्याला शाळा सुरू करण्याच्या परवानगीचा अर्ज असो, सभेच्या परवानगीचा अर्ज असो, एखादे नियतकालिक सुरू करण्याचा अर्ज असो, छापखाना सुरू करण्याचा अर्ज असो, पोलिस खात्याचा सल्ला घेतल्याशिवाय काही करणे शक्य नसते. आणि पोलिस खात्याला या अशा प्रकरणी राजकारणाचा वास अगदी हटकून यावयाचा. अक्षरशत्रू किंवा फार तर सही करू शकणाऱ्या पोलिस शिपायाच्या हाती अशा प्रकारे, अनेक सुविद्य व अनुभवी लोकांचे भवितव्य ठरविण्याचे काम असते. या अशा रिपोर्टांवर विसंबून अनेक महत्त्वाच्या कामाचे निर्णय अगदी बिनधोकपणे दिले जातात. आणि या एकंदर गोष्टीवरून आज नाही उद्या परवानगी दिली गेली तरी हैद्राबाद सरकारच्या शाळा खात्यातील अधिकारी वर्ग, जोगेश्वरी विद्यालयाच्या चालकांच्या मागे एकनादोन अनेक भानगडी लावल्याशिवाय रहाणार नाही हे आजपर्यंतच्या त्यांच्या वागणुकीवरून स्पष्ट दिसत नाही काय ?

## पवित्र भावनेची गळचेपी

याशिवाय, तुमची इमारतच चांगली नाही, फर्निचरच भिकार आहे, शिक्षकच ट्रेण्ड नाही, करीक्युलमच तंतोतंत फॉलो केले जात नाही. शिक्षक व विद्यार्थ्यांत मुसलमानच नाहीत किंवा कमी आहेत. अशा काही ना काही भानगडी काढल्या जाणारच. इतर ठिकाणचा अनुभव लक्षात घेतल्यास याबद्दल संशयच उरत नाही. पण या अडचणी दूर करण्यासाठी ग्रँट इन एड कोडप्रमाणे सरकार कधी चुकून वागेल तर शपथ. सरकारकडे मदतीसाठी जा की हजार भानगडी पुढे आल्याच. हैद्राबादसारख्या राजधानीच्या शहरी असलेल्या विवेक वर्धिनीचे इमारतीचे प्रकरण कित्येक वर्षांपासून सडत आहे. ट्रेनिंगसाठी पाठवावयाच्या शिक्षकाला मदत करण्याच्या वेळी सरकारजवळ हटकून शिल्लक नसते. सारांश, सरकार स्वतः बेजबाबदारपणे वागत असता इतरांनी आपल्या जबाबदाऱ्या सरकार ठरवील त्याप्रमाणे सांभाळल्याच पाहिजेत असे वाटते. ही सर्व लक्षणे कशाची द्योतक आहेत

बरे! शिक्षणासारखी पवित्र व निरुपद्रवी चळवळ करणाराला हैद्राबाद सरकार मदत करणे तर दूरच पण उलट कसे आणि किती अडथळे निर्माण करते, ही गोष्ट या उदाहरणांवरून स्पष्ट होईलच. "आपल्या समाजाच्या उन्नतीसाठी आपण काही तरी करावे" ही पवित्र भावना प्रत्येक मानवी अंतःकरणात उत्पन्न होणे अत्यंत नैसर्गिक आहे. हैद्राबाद संस्थानच्या हद्दीत ही भावना बाल्यावस्थेतच मारली जात आहे. योग्य संधीच्या अभावी सद्भावना लयाला जात असल्यामुळे लोकनायकाने अत्यंत कुशलतेने परिस्थितीचा फास सैल करून तिच्या जोपासनेला व वाढीला हातभार लावणे अवश्य नाही काय? जे लोकनायकांना शक्य नसेल ते त्यांनी करावेच असा कोणीही आग्रह धरणार नाही पण जे त्यांना शक्य नाही पण इतरांना आहे अशांना मार्ग मोकळा करून द्यावयास शक्य ती प्रत्यक्षाप्रत्यक्ष मदत करावयास नको काय?

महाराष्ट्र : दि. १२ जुलै १९३६

# धार्मिक धोरणावर झगझगीत प्रकाश

## न्याय्य हक्कांची पायमल्ली

धार्मिक प्रश्नावर भिन्नधर्मीय प्रजाजनांमध्ये कलहाचा उद्भव होण्याची भीती असल्यामुळे या विषयाच्या बाबतीत, प्रत्येक प्रजाहितेच्छू सरकारने अत्यंत निःपक्षपातीपणाने व चोखपणे आपले कर्तव्य बजावण्याची सतत खबरदारी घेतली पाहिजे हे तत्त्व आज सर्वमान्य झाले आहे. पण दुर्दैवाने हैद्राबाद संस्थानात आज निःपक्षपातीपणाचे धोरण कडकपणे अंमलांत येत नसल्यामुळे हिंदुसमाजाच्या न्याय्य हक्कांवरही तेथे गदा येत आहे. प्रस्तुत लेखात लेखकाने हैद्राबाद सरकारच्या पक्षपाती व अन्याय्य धार्मिक धोरणाचे आविष्करण केले आहे.

हैद्राबाद संस्थानात 'उपासना-स्वातंत्र्य' व इतर नैसर्गिक हक्क यांची होत असलेली पायमल्ली दाखविणे हाच यात हेतू आहे. श्री. विश्वनाथराव तुळजापूरकर यांनी अत्यंत सनदशीर व शांततेच्या मार्गाने धसाला लावलेल्या पैठण-गणपती प्रकरणावरून हैद्राबाद सरकारच्या कुटिल राजनीतीवर बराच स्पष्ट उजेड पडत असल्यामुळे त्या आधारावरच आजच्या लेखाची उभारणी केली आहे.

## गणपति–प्रकरणाचा पूर्वेतिहास

या प्रकरणाचा थोडक्यांत इतिहास असा: हैद्राबाद सरकारच्या "धार्मिक उत्सव व मिरवणुकी" संबंधीच्या कायद्याला अनुसरून पैठणच्या

हिंदूंनी प्रतिवार्षिक गणपति उत्सवाची व मिरवणुकीची रीतसर परवानगी ता. १३ ऑगस्ट १९२९ इ. ला मागितली असून, ती पूर्वपरंपरेला अनुसरून पैठणचे मामलेदार यांच्या कार्यालयातून नं. ८४ ता. २६ ऑगस्ट १९२९ या पत्राद्वारे देण्यात आलेली आहे. अशा प्रकारचे अर्ज कमीतकमी दहा दिवस अगोदर घ्यावेत व ते आले म्हणजे त्यासंबंधी इतरधर्मीयांचे काही आक्षेप आहेत की काय याची चवकशी केली जावी व तसे काही योग्य आक्षेप नसल्यास परवानगी द्यावी असे नियमांत स्पष्ट केलेले आहे. पैठणच्या मामलेदार साहेबांनी ज्याअर्थी परवानगी दिलेली आहे त्याअर्थी या प्रकरणी ठराविक मुदतीत कोणाही परधर्मीयांनी आक्षेप घेतले नसावेत व म्हणून मामलेदारसाहेबांना काहीच योग्य अडचण दिसली नसावी हे उघड आहे. याप्रमाणे सर्व गोष्टी कायदा व परंपरा यांना अनुसरून शांतपणे झालेल्या असता उत्सवाचे पूर्ण दहा दिवस पार पडून मूर्तीविसर्जनाची मिरवणूक निघाल्यानंतर "मिरवणुकीच्या रस्त्यावर दोन मशिदी आहेत म्हणून ४० यार्ड अलीकडे व ४० यार्ड पलीकडे वाद्ये बंद ठेवावीत" अशा अर्थाचा हेडमास्तर, मुन्सफ, पोलिस इन्स्पेक्टर व धर्मखात्याचे नाझर यांच्या कमिटीचा निकाल, बेकायदेशीर हुकुमांच्या स्वरूपात मिरवणुकीच्या चालकांवर बजावण्यात आला आणि या प्रकरणाची मुहूर्तमेढ रोवण्यात आली.

## हुकुमात अकारण बदल केला

हैद्राबाद सरकारचा धार्मिक उत्सव व मिरवणुकीसंबंधीच्या नियमात या प्रकरणांचे अर्ज घेण्याचा व त्यासंबंधी निकाल देण्याचा अधिकार मामलेदारांना स्पष्टपणे दिलेला असता व त्याचा त्यांनी पूर्णपणे उपयोग केला असता, त्यात ढवळाढवळ करण्याचा उपरिनिर्दिष्ट अनधिकृत कमिटीला काही अधिकारही नव्हता व प्रयोजनही नव्हते. शाळा खात्याच्या व पोलिस खात्याच्या अधिकाऱ्यांना धार्मिक प्रकरणात ढवळाढवळ करण्याचा काहीच अधिकार नसताना त्यांनी यात भाग घेतलेला आहे. तालुक्याच्या ठिकाणचे अधिकारी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून हिंदूंच्या हक्कांवर कसे उघडपणे आक्रमण करीत असतात याचा हा पुरावा नाही काय?

## अधिकाराच्या जागांची विषम वाटणी

या प्रकरणात आणखी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. पैठण तालुक्याच्या गावातील ४-५ अधिकाराच्या जागांवर त्यावेळी केवळ मुसलमानच होते. सर्वच आधिकारी मुसलमान असल्यानंतर हिंदूंच्या हक्काची पायमल्ली व्हावी यात काहीच आश्चर्य नाही. हैद्राबाद सरकारने अधि-काराच्या जागांची वाटणी लोकसंख्येनुरूप केली तर हिंदू-मुसलमानांवर परस्परांचा वचक राहून दुसऱ्याच्या हक्काची पायमल्ली करणे कोणालाही शक्य होणार नाही. पण या सर्व गोष्टी सरकारच्या इच्छेवर अवलंबून आहेत. नीच जेथे हिंदूंच्या हक्कावर आक्रमण करण्याची आहे तेथे खालच्या अधि-काऱ्यांस त्यापेक्षा ती निराळी कशी असू शकेल? आडातील पाणीच जेथे गढूळ आहे तेथे पोहऱ्यातील पाणी स्वच्छ कसे असणार?

## सारे एकाच माळेचे मणी

पैठणच्या सर्वच्या सर्व मुसलमान अधिकाऱ्यांनी एकत्र होऊन पैठणच्या हिंदूंच्या धार्मिक मिरवणुकीत बेकायदेशीर अडथळा आणला व पैठणच्या हिंदूंनी शांतता भंग होऊ नये म्हणून तो तात्पुरता मान्यही केला. पैठणच्या राजनिष्ठ हिंदूंना ही खात्री होती की वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे आपण दाद मागितली म्हणजे आपल्याला न्याय मिळेल. भोळे बिचारे पैठणचे हिंदू! हक्क बजावण्याची संधीही त्यांच्या हातची गेली व पुन्हा न्यायही मिळाला नाही. शांतता भंग होऊ नये म्हणून प्रसंगी हक्कही सोडणाऱ्यांच्या पदरात शेवटी अन्यायच पडावा व हक्कही कायमचा जावा ही आजची न्याय-पद्धती बनली आहे. लोकांचा तिच्यावर विश्वास कसा बसावा? पैठणच्या हिंदूंनी शांततेसाठी तात्पुरता हक्क सोडला तो कायमचाच गेला नाही काय? पैठणच्या एकजात मुसलमान अधिकाऱ्यांच्या अनधिकृत कमिटीने दिलेला बेकायदेशीर हुकूम अगदी थेट एक्झिक्युटिव्ह कौन्सिलने देखील उचलून धरला आहे, याचा अर्थ काय? हैद्राबाद सरकारचे धार्मिक धोरण हिंदूंच्या धार्मिक परंपरागत हक्कांना कधी कायद्याने तर कधी दंडेलीने पायाखाली तुडविणे हेच आहे असा या प्रकरणावरून कोणी निष्कर्ष काढल्यास तो चूक होईल काय?

## धर्मकलहाचे मूळ कोणते ?

धर्माच्या नावावर जगात आजपर्यंत रक्तपात व अन्याय झालेला आहे तेवढा कोणत्याही दुसऱ्या कारणामुळे झाला नसेल, असे काही लोक म्हणतात. पण त्याबरोबरच धर्म या संस्थेने मानवसमाजावर अगणित असे उपकारही केले आहेत, हेही विसरून चालावयाचे नाही. सारांश, धर्म ही एक अशी शक्ती आहे की तिचा सदुपयोग झाला तर ती फारच उपयुक्त व दुरुपयोग झाला तर अत्यंत विघातक अशी ती ठरते. हैद्राबाद संस्थानात आज या शक्तीचा असाच दुरुपयोग होत असल्यामुळे हैदराबादच्या समाजात शांततेऐवजी अशांतता, प्रेमाऐवजी द्वेष, सहकार्याऐवजी सूड, न्यायाऐवजी अन्याय इत्यादींचेच अधिक पीक येऊ लागले आहे. वस्तुतः धर्म ही संस्था मनुष्याला भौतिक सुख आणि वैभव यांची प्राप्ती करून देणारी नसून उलट ती त्यांचा त्याग सांगत असून मनुष्याला आत्मगत सुख प्राप्त करून देणारी आहे. खऱ्या धर्माचा संबंध मनुष्याच्या लौकिक व्यवहाराशी फारसा येतच नाही आणि असे असताही ही संस्था मनुष्यामनुष्यामध्ये द्वेष पसरविताना जेव्हा आढळते तेव्हा या संस्थेच्या चालकवर्गाकडून तिचा दुरुपयोग होत असला पाहिजे असा निष्कर्ष काढणे चूक ठरत नाही.

## इस्लामीयांची गैरवाजवी मागणी

इस्लामच्या अनुयायांना आपल्या आत्मिक उन्नतीसाठी दररोज प्रार्थना करावी लागते. तशी हिंदू लोकही करीत असतात. प्रार्थनेच्यावेळी मुसलमानांना जशी शांतता आवश्यक आहे तशीच ती हिंदूंनाही आहे. पण या आवश्यक शांततेचे हिंदुसमाज घराच्या अथवा देवळाच्या बाहेरील व्यवहाराला बाधक होईल असे स्तोम माजवू इच्छित नाही. मग मुसलमानांनाच सार्वजनिक मालकीच्या सडकेवर धार्मिक उपासनेच्या नावावर बंधने घालण्याची का इच्छा उत्पन्न व्हावी ? प्रत्येक शहरी आपण मुख्य रस्त्यांवरून फिरलो तर आपल्याला अनेक मशीदी आढळून येतात. विशेषतः हिंदूंच्या देवळाच्या आसपास मशीद म्हणा, दर्गा म्हणा असावयाचाच, असा जणू काही नियमच दिसतो. त्यांच्या आस्तित्त्वासंबंधी कधीच कुणाला आक्षेप नव्हता व नाही.

## याला सरकारी धोरणच जबाबदार

पण त्यामुळे प्रजापालन हाच ज्याचा धर्म अशा सरकारच्या मालकीच्या रस्त्यावर त्यांची बंधने काय म्हणून? सार्वजनिक मालकीच्या सडकेवर आपल्या उपासनेचे प्रदर्शन करण्याचे त्यांना कारणही नाही व हक्कही नाही. पण खरी वस्तुस्थिती अशी आहे की हिंदूंच्या धार्मिक भावनेची ज्यांना फिकीर नाही त्यांनी राजरस्त्यावरच्या वाद्यबंदीचा प्रश्न उपस्थित केलेला असून त्याला पर्यायाने स्वतः सरकारच जबाबदार आहे.

लोकशक्ति : दि. २१ सप्टेंबर १९३६

# कायदेमंडळाची सुधारणा : १

## महत्त्वाचे नवे बिल

नामदार ॲ. काशीनाथरावसाहेब वैद्य एम. ए., एलएल. बी. यांनी हैद्राबादच्या कायदेमंडळाची सुधारणा करणारे बील सरकारपुढे मांडले आहे. आमच्या कायदेमंडळाची आजची घटना कित्येक वर्षांपूर्वीच सुधारली जाणे अत्यावश्यक होते. पण ती सुधारण्याचे श्रेय, हैद्राबादेतील लोकमान्य धुरीण, निष्णात कायदेपंडित व लोकमान्यांप्रमाणेच राजमान्य असलेले नामदार ॲ. काशीनाथरावसाहेब वैद्य यांनाच मिळावे अशी विधीघटना होती असे दिसते. कायदेमंडळात निवडून जाण्याचा मान आजपर्यंत काही थोड्यांना लाभलेला नाही. पण त्या प्राप्त संधीचा फायदा घेऊन लोकहित साधण्याचा प्रयत्न केला गेल्याची उदाहरणे कै. नामदार केशवरावजीसाहेब व कै. ना. धर्मवीर वामनरावजी नाईक यांचीच प्रामुख्याने दाखविता येण्यासारखी आहे. पैकी कै. नामदार केशवरावजींचे, विधवा विवाहाचे बिल पास होऊन आता त्याला कायद्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. व कै. ना. धर्मवीर वामनरावजींचे, प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्यासंबंधीचे बील अद्याप अनिर्णित असले तरी लवकरच मूर्त स्वरूपात बाहेर पडेल अशी आशा आहे. हे दोन्ही व इतर प्रयत्न निःसंशयच अभिनंदनीय, अत्यावश्यक व लोकोपयुक्त झालेले आहेत. पण कायदेमंडळाची सुधारणा करणाऱ्या बिलाचे महत्त्व काही विशेषच ठरणारे आहे. कायदेमंडळच सदोष असताना त्याने केलेल्या सुधारणा तात्पुरत्या मलमपट्टीप्रमाणेच उपयुक्त असल्या तरी त्यांचा पूर्णांशाने जनतेला फायदा होण्यासाठी कायदेमंडळाच्या मुळातील

रोगच नाहीसा व्हावयास पाहिजे. अर्थात हे शास्त्रीय प्रमेय वैद्यांशिवाय इतरांच्या लवकर लक्षात आले नसल्यास नवल नाही. आमच्या सामाजिक शरीरातील रोगस्थान अचूकपणे ओळखून त्यावर रामबाण उपाय करणाऱ्या वैद्यांनी आपल्या कुलनामाची कीर्ती अजरामर केली आहे असे म्हणावयास हरकत नाही. कायदेशास्त्राप्रमाणेच सामाजिक शरीरशास्त्रातही आपले वैशिष्ट्य सिद्ध करणारे बील ना. काशीनाथरावसाहेबांनी पुढे आणल्याबद्दल आम्ही त्यांचे हार्दिक अभिनंदन करून जनतेने ठिकठिकाणी सभा भरवून या अत्यंत महत्त्वाच्या बिलाला पाठिंबा द्यावा व सरकारने त्याला शक्य तितक्या लवकर कायद्याचे स्वरूप द्यावे म्हणून विनंती करणारे ठरावही पास करावे अशी आमची सूचना आहे.

## शेजारची प्रांतिक स्वायत्तता

आमच्या शेजारी असलेल्या मुंबई, मद्रास प्रांतात येत्या १ एप्रिल-पासून प्रांतिक स्वायतत्ता नांदू लागेल व पुढच्या वर्षी मध्यवर्ती संयुक्त सरकारचा कारभार सुरू होईल. अशा स्थितीत आमच्या कायदेमंडळात प्रत्येक जिल्ह्यातर्फे दोन दोन व इतर काही थोडेसे अधिक सभासद घेऊन संस्थानचे अंदाजपत्रक कायदेमंडळाने मान्य करणे, नामदार सभासदांना प्रश्न विचारण्याचा अधिकार असणे इत्यादी सुधारणा मागणारे बील काहींच्या मते अपूर्ण व असमाधानकारक असण्याचा संभव आहे हे आम्ही जाणून आहोत. पण समाजाची सुधारणा करावयाची ती हळूहळू व पायरी पायरीनेच करणे अधिक चिरपरिणामी व हितसंवर्धक असते हे लक्षात ठेवणे जरूर आहे. हैद्राबाद सरकारचा राज्यकारभार दिवसेदिवस लोक-मताला अधिक जबाबदार असा करण्याचा स्तुत्य प्रयत्न चालू असला तरी या सुधारकांच्या मार्गात प्राचीन संस्कार प्रत्यक्ष अप्रत्यक्षपणे आडवे येणे अपरिहार्य आहे. ही गोष्ट ओळखून सुवर्णमध्य साधणाऱ्या नामदार काशी-नाथरावसाहेबांच्या बिलाला सर्व मतांचे सभासदांकडून पाठिंबा मिळेल अशी आम्हाला आशा आहे. अगदी शेजारी असलेल्या प्रांतांतून बहुजन समा-जातील कर्तृत्ववान लोक मंत्रिपदावर आरूढ झालेले दिसत असताना आमच्या संस्थानातील कर्तृत्ववान लोकांच्या अंतःकरणात तशीच महत्त्वा-कांक्षांची आंदोलने उठणे अपरिहार्य आहे. तेव्हा 'जुने ते सोने' अशी

एकांगी विचारसरणी असणाऱ्यांनीही निरर्थक विरोध करून कालाची गती थांबविण्याचा निष्फल प्रयत्न न करेण व कालमानानुसार आपल्या अधिकाराचा हळूहळू त्याग करण्यास शिकणे आता जरूर आहे. याच वेळी राईट आनरेबल सर अकबर हैदरीसाहेब हे मुख्य मंत्री व कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष पदावर विराजमान होणे हा या बिलाला अत्यंत शुभ शकूनच झालेला आहे. लोकशाहीच्या तत्त्वासंबंधी सर साहेबांना किती आस्था, अभिमान व आवड आहे याचे दाखले त्यांच्या आजपर्यंतच्या भाषणांतून अनेक दाखविता येतील. तेव्हा या बिलाला मंजुरी मिळून त्यासंबंधी साधक-बाधक चर्चा होऊन ते काही वर्षे भिजत न पडता काही महिन्यांतच कायद्याचे स्वरूप धारण करील अशी आशा करणे अनाठाई होणार नाही.

## कागदोपत्री कायदेमंडळ

हैद्राबादेतील कायदेमंडळाच्या आस्तित्वाची जाणीव बहुजन समाजालाच काय पण चांगल्या शिकल्या सवरलेल्या लोकांनाही नाही. कायदेमंडळाच्या सभांना, वृत्तपत्राच्या प्रतिनिधीना उपास्थित होण्याची मुभा दोन वर्षापासून मिळालेली असली तरी कायदेमंडळाच्या सभा सन १३४० फसलीत दोन, १३४१ फसलीत तीन, १३४२ फसलीत दोन, अशा भरलेल्या असून प्रत्येक सभेचे काम काही तासावर चालले नाही. कायदेमंडळाची घटना प्रथम १३०९ फसलीत तयार होऊन १३१५ फसलीत तिच्यात काही किरकोळ सुधारणा केल्या गेल्या. १३१५ फसलीपासून म्हणजे गेल्या ३० वर्षाच्या दीर्घ काळात पुढारलेल्या हैद्राबाद सरकारच्या कायदेमंडळाच्या घटनेत यत्किंचीतही बदल झालेला नाही. गेल्या २५ वर्षात शेजारच्या इंग्रजी प्रांतांतील कायदेमंडळाचा तीन वेळा विकास झालेला आहे. हैद्राबादच्या कायदेमंडळाची घटना आज कागदोपत्री अशी दाखविण्यात येते की, एकूण असलेल्या २० सभासदांपैकी ८ सभासद बिनसरकारी आहेत. या ८ सभासदांपैकी ४ सभासद पायगा व इतरांचे असल्यामुळे सर्व-साधारण प्रजेच्या हिताहिताच्या दृष्टीने त्यांचा कधीच फारसा उपयोग झालेला नाही. उरलेल्या चौघांपैकी २ जागा वकिलांना देण्यात आलेल्या आहेत. या वर्गाला इतरत्र कोठे प्रतिनिधित्व मिळालेले फारसे आढळत नसताना आमच्या येथेच ते का देण्यात आले असा एक प्रश्न उत्पन्न होतो.

पण शिक्षण, वैद्यक वगैरे धंद्यांत अनेक विद्वान लोक असले तरी राज्य-कारभाराशी त्यांचा संबंध वकील वर्गाइतका येत नाही व साहचर्यामुळे आणि अभ्यासाने वकील वर्ग जनतेची बाजू जेवढी धिटाईने व मुत्सद्देगिरीने मांडू शकतो तेवढी ती इतरांना मांडता येणे शक्य नसते. या गोष्टी विचारात घेतल्यास त्याचे उत्तर सहजच मिळू शकते. आमच्या येथेच काय पण इंग्रजी हद्दीतही राजकीय चळवळ करणाऱ्या पुढारी वर्गात वकिलांचीच संख्या अधिक असलेली दिसते. याचा अर्थ इतर वर्गात राजकीय चळवळीचे धुरीणत्व पत्करण्यायोग्य लोक नसतातच असा मात्र नाही. असतात, पण त्यांची संख्या लहान व अपवादात्मक असते. असो. जाहगिरदारांच्या-साठी कायदेमंडळात दोन जागा आहेत. पण त्यांच्या सभेला आजपर्यंत निवडणुकीच्या तत्त्वाचा उपयोग करण्याची गरज वाटलेली नाही. सारांश, बिनसरकारी सभासदांत खरेखुरे जनतेने निवडलेले सभासदच अगोदर नाहीत. जे काही आहेत ते हाताच्या बोटावर मोजण्याइतके असून काही वर्गांच्या वतीने आलेले असतात. त्यांची संख्या इतकी अल्प असते की त्यांना खरोखरच काही कार्य करण्यास अवसरच मिळत नाही. सरकारच्या बिलाला अगोदर मान्यता मिळवून मगच या नामदारांना एखादे बिल पुढे मांडता येते. आणि या सभासदांत सरकारी सभासदांची व सरकारच्या कृपे-वर सर्वस्वी अवलंबून असलेल्यांचीच संख्या अधिक असल्यामुळे बिनसर-कारी सभासदांना माना डोलावण्यापलीकडे फारसा अवसरच मिळत नाही. याचमुळे बिनसरकारी सभासदांकडून मांडलेल्या बिलांची संख्या अपवादा-त्मक सापडते.

कायदेमंडळाच्या सदोष घटनेमुळे लोकहिताच्या कायद्याची घडण होऊ शकली नाही. ही गोष्ट तर खरीच पण त्याहून आश्चर्याची गोष्ट तर ही आहे की सरकारी कामकाजासाठी आवश्यक असलेले कायदे सरकारच्या अधिकारी सभासदांनी पुढे ठेवलेले असूनही वर्षानुवर्षे पास होऊ शकले नाहीत. काही तासांच्या दोन किंवा तीन बैठकीत कसले काम होणे शक्य आहे? हैद्राबाद सरकारनेच स्वतः "अनसॅटिसफॅक्टरी सिस्टिम ऑफ वर्क अंडर द प्रेझेंट रेग्युलेशन" अशी स्पष्ट कबुलीच आपल्या १३४२ फसलीच्या रिपोर्टात दिलेली असल्यामुळे ना. वैद्यांच्या बिलाचे निराळे

समर्थन करण्याचे प्रयोजन उरत नाही. स्वतः सरकारला तशीच सरकारच्या अनेक खात्यांच्या मंत्र्यांना जी सदोषता अनुभवाने पटलेली आहे ती दूर करणारे बिल बिनविरोध व सर्वांच्या अनुमतीने लवकर पास होण्यास अडचण पडण्याचे कारणच नाही.

## मतभेदांचे काही मुद्दे

ना. काशीनाथरावसाहेबांच्या बिलात मतभेदाला पुष्कळच अवसर आहे. आणि तसा तो असणे अपरिहार्य आहे. सर्वच गोष्टींचा आज विचार करणे शक्य नसले तरी, काही महत्त्वाच्या गोष्टींचा ओझरता उल्लेख करणे जरूर आहे. सर्वांत महत्त्वाची व विचारणीय गोष्ट ही आहे की, निवडणुकी जाती-पंथभेदरहित व्हाव्यात की नाहीत? ना. वैद्यांच्या मते निवडणुकी जाती-पंथभेदरहित व्हाव्यात असे असून मागासलेल्या समाजांनाही राखीव जागा देण्याच्या ते विरुद्ध आहेत. सरकारला बिनसरकारी सभासदांच्या ज्या पाच जागा भरण्याचा आधिकार ठेवलेला आहे त्यांचा सरकारने मागासलेल्या किंवा अल्प संख्यांक समाजासाठी हवा तर उपयोग करावा, अशी नामदार साहेबांची विचारसरणी आहे. ब्रिटिश हिंदुस्थानातील कम्युनल अवार्डमुळे माजलेले निष्फळ व अहितकर मतभेद, त्यानंतर निश्चित झालेल्या गोष्टी, इंग्रज सरकार व हैद्राबाद सरकार यांची राज्यकारभाराची धोरणे व बहुजन समाजावर आजही जबरदस्त असलेली धर्मपंथाची पकड यांचा अत्यंत दूर-दार्शित्वाने विचार केल्यास ना. साहेबांची विचारसरणी सरकारला व बहुजन-समाजाला आजच मान्य होणे शक्य नाही व हितकरही नाही असे आमचे प्रामाणिक मत आहे. नामदार साहेबांच्या मताला मान्यता द्यावयाची म्हणजे 'बळी तो कान पिळी,' या तत्त्वाला मान्यता देण्यासारखेच आहे. आज सर्व जगाचा व्यवहार निःसंशयपणे याच तत्त्वानुसार चाललेला प्रत्यक्ष दिसत असला तरी, प्रत्येकाला आपल्या कृत्याच्या समर्थनार्थ न्याय, नीती, दया, समता, हक्क इत्यादींचा आधारही दाखवावा लागतोच. तेव्हा आम्हीही नुसत्या पुस्तकात दिसणाऱ्या उच्च तत्त्वांचा कोरडा ध्यास घेण्यापेक्षा व्यवहारी अशी त्यांना मुरड घालून जाती-पंथ भेदाच्या संख्येवर त्यांच्या प्रतिनिधींची संख्या ठरवणे अधिक हितकर ठरणारे आहे. आमच्या समाजातील जाती-पंथ भेद इत-क्यात सहज नाहीसे होणे अगदी अशक्य असल्यामुळे त्यांना अशा प्रकारे नष्ट

करण्याचा प्रयत्नच त्यांची पाळेमुळे अधिक खोल नेण्यास व समाजाची शांतता बाधित करण्यास कारण होणार आहे. जाती-पंथ भेद आज निसर्गतःच घसरणीला लागलेला आहे. त्यांना नैसर्गिक मरण मरू देणेच शहाणपणाचे आहे. वाईट गोष्टी नाहीशा करण्याचा अनुभविक व निश्चित असा मार्ग म्हटला म्हणजे चांगल्याची वाढ करणे हाच आहे. वाईट गोष्टी नाहीशा करण्यासाठी त्यांचा पाठलाग करणाऱ्यांना त्यांची संख्या वाढलेलीच आढळून आलेली आहे. तेव्हा आम्हीही त्यांना धक्के देऊन जागे करण्यात काय अर्थ आहे ?

दुसरी महत्त्वाची गोष्ट ही आहे की, आजपर्यंत वर्षातून दोन तीनच मिटिंग होत गेल्यामुळे सरकारी सभासदांपुढे ठेवलेली बीले वर्षानुवर्षे अनिर्णित अशी पडून राहिलेली असल्यामुळे कमीतकमी दर तीन महिन्याला एक मिटिंग घेण्याचे कलम यापेक्षा बरेच विस्तृत होणे जरूर आहे. मिटिंग जर चारच झाल्या व त्यांतही सरकारी बिलांचीच गर्दी झाली आणि ती होणारच, तर इतर सरकारीच पण अधिक लोकोपयुक्त बिलांना वेळेच्या अभावी वर्षेच्या वर्षे आताप्रमाणे दप्तरीच पडून राहावे लागणार आहे. ही आपत्ती दूर करण्यासाठी व संस्थानातील जवळ जवळ दीड कोटी लोकसंख्या लक्षात घेता कायदेमंडळाने वर्षातून कमीतकमी ६० पूर्ण दिवस काम करणे जरूर आहे. कायदेमंडळाला एवढा वेळ न मिळाल्यास त्याच्या घटनेतील सुधारणांचा उपयोग करणेच अशक्य होऊन बसेल.

सारांश, अशी मतभेदांची स्थळे मूळ बिलात अनेक आहेत. त्या सर्वांचा उपयोग आजच येथे करणे अशक्य आहे. सवडीनुरूप आम्ही त्या-संबंधीची आमची मते स्पष्ट करणारच आहोत. संस्थानातील विचारवंत लोक आपली साधक बाधक मते पुढे मांडून लोकमताला चालना देतील अशी आशा करून आम्ही आज वाचकांची रजा घेतो.

निजामविजय : दि. २३ मार्च १९३७

# कायदेमंडळाची सुधारणा : २

## लोकमताला अवसर नाही

ना. वैद्यांनी हैद्राबादच्या कायदे मंडळाची सुधारणा करणारे जे बील सरकारकडे मंजुरीसाठी पाठविले आहे ते आजच्या अंकी इतरत्र छापले आहे. त्यासंबंधी चार प्रास्ताविक शद्ब व एक दोन महत्त्वाच्या मुद्दयासंबंधीची आमची मते आम्ही गतांकी नमूद केली असून आजच्या लेखात आणखी काही मुद्दयासंबंधी विचार करणार आहोत.

विज्ञानशास्त्रातील नवनव्या शोधांमुळे गेल्या शेदोनशे वर्षांत मानवी जीवन व व्यवहार यांत कल्पनातीत अशी क्रांती झाली आहे. पूर्वीच्या काळी राज्यकारभार हा एकतंत्री असे. यांत्रिक युगामुळे झालेला फेरफार इतका मोठा आहे की, कोणीही एक व्यक्ती राज्यकारभाराची सूत्रे आज सुव्यवस्थितपणे हलवूच शकत नाही. आणि त्याचमुळे सुधारलेल्या प्रगमनशील राष्ट्रांतून कित्येक वर्षांपूर्वीपासून लोकशाहीच्या युगाला आरंभ झालेला आहे. शिक्षणाचा प्रसार जसजसा अधिक होऊ लागला तसतशा लोकांच्या जुन्या कल्पना नष्ट होऊन गेल्या. राजा हा विष्णूचा अवतार मानण्याचे युग संपुष्टात येत आहे व त्याचबरोबर राज्यकारभारात आमच्या मताला मान मिळाल्याखेरीज आम्ही कर तरी का द्यावा अशा प्रकारची विचारसरणी प्रचलित होऊन आज सर्व सुशिक्षित व प्रगतिशील राष्ट्रांतून राज्यकारभाराची सूत्रे लोकमतानुसार हलवली जात आहेत. आमचे हैद्राबाद संस्थानही एक प्रगमनशील संस्थान आहे. गेल्या पंचवीस वर्षांत संस्थानी कारभारात अनेक सुधारणा झाल्या आहेत. नाही म्हणावयास संस्थानचा

राज्यकारभार ज्या एका पद्धतीने गेल्या २५–३० वर्षांपासून चालत असे त्याच पद्धतीने आजही चालत आहे, त्यात लोकमताला काही अवसर नाही. ही उणीव खरोखरच चटकन लक्षात येण्यासारखी आहे. किंबहुना इतर अनेक सुधारणांची किंमत सुधारणेच्या अभावी जगाच्या दृष्टीने फारच कमी उतरते. आमच्या अलाहजरतांची इच्छा राज्यकारभार लोकमतानुवर्ती असावा अशी फार पूर्वीपासूनच आहे. आणि असे असूनही संस्थानी राज्यकारभारात लोकमताला अद्याप अवसर मिळाला नाही. तो मिळावा म्हणून पुढे आणलेल्या बिलाला त्यांच्याकडून त्वरित मान्यता मिळेल व संस्थानी राज्य व संस्थानी राज्यकारभारावरील "मागासलेला" हा दोष नाहीसा होईल अशी आशा आहे.

## कायदे मंडळाविषयी अपेक्षा

हैद्राबाद संस्थानचा राज्यकारभार प्राचीन पद्धतीने चालत आहे ही गोष्ट लक्षात घेऊन तिच्यात आज सुधारणा करावयाची आहे हे आपण विसरता कामा नये. हिंदुस्थानातील निरनिराळ्या संस्थानांतून किंवा प्रांतांतून आज प्रचलित असलेल्या राज्य कारभाराच्या पद्धतीचे काही नमुने आम्ही आमच्यापुढे ठेवावयास काही हरकत नाही. पण आम्ही आमच्या विशेष परिस्थितीचा विचार न करताच त्यांची नक्कल करणे वेडेपणाचे आहे. दुसऱ्यांचे जवळ जे काही चांगले असेल त्यांचे अनुकरण विचारपूर्वक झाले पाहिजे व त्याच्यातील दोष आपण टाळले पाहिजेत. ब्रिटिश हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतांतून आज प्रांतिक स्वायत्ततेचा अंमल सुरू झाला आहे. म्हणून हैद्राबादेत तो आजच सुरू व्हावा असे कोणीही म्हणू लागले तर त्याला वेड्याच्या इस्पितळातच पाठवावे लागेल. मद्रास किंवा मुंबई हे प्रांत केवळ आमच्या शेजारी आहेत एवढ्यावरूनच त्यांची सर्वच बाबतीत बरोबरी करू पाहणे अदूरदर्शीपणाचे आहे. म्हणून मद्रास प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत २१४ व मुंबई प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत १७५ जागा आहेत व एवढ्याच कारणावरून तितक्या जागा आमच्या येथेही असाव्या असे आजच म्हणणे योग्य होणार नाही. पण त्याबरोबरच ना. वैद्यांनी आपल्या बिलात नमूद केलेली संख्याही अतिशय लहान आहे म्हणून असमाधानकारकही आहे यातही वाद नाही. १ कोटी ४४ लक्ष लोकांच्या

प्रातिनिधिक संस्थेत सर्वसाधारणपणे १४४ सभासद असावयास पाहिजेत असे आमचे मत आहे. ना. वैद्यांनी प्रत्येक जिल्ह्याला दोन सभासद निवडण्याचा अधिकार मागितला आहे. पण आमच्या मते हे मताधिकाराचे लोण कमी अधिक प्रमाणात तालुक्यापर्यंत जाणे जरूर आहे. पाच हजारांवरील लोकसंख्येची गावे हैद्राबाद संस्थानात १३३ आहेत. सारांश, आमच्या असेंब्लीत १२५ ते १५० पर्यंत सभासदसंख्या असावयास पाहिजे.

पण संख्येपेक्षाही लोकांच्या हाती खरोखरच काय सत्ता आहे यावरच या अशा संस्थांची योग्यायोग्यता ठरवावयाची असते. केवळ लोकमताचे दिग्दर्शन करणे एवढेच कार्य आमचे कायदे मंडळ करणार असल्यास व कायदे मंडळाचे मत काही अपवाद वगळून सरकारला मुळीच बंधनकारक नसल्यास एवढा खटाटोप करून लोकांच्या पदरात कसलीच सत्ता पडली नाही असे म्हणण्याची वेळ न येवो म्हणजे झाले.

निजामविजय : दि. ३० मार्च १९३७

# ऊठ, महाराष्ट्रा ऊठ –

## परतूडचे अधिवेशन

आजच्या अंकात इतरत्र छापलेले महाराष्ट्र परिषदेच्या पहिल्या अधिवेशनाचे पहिले प्रसिद्धी पत्रक वाचनांत येईलच. त्यावरून निजाम प्रांतातील जवळ जवळ ३८ लक्ष महाराष्ट्रीयांच्या सुखदुःखाचे, हितअहिताचे प्रश्न सोडविण्यासाठी हैद्राबाद येथील सुप्रसिद्ध पुढारी श्री. गोविंदरावजी उर्फ दादासाहेब नानल वकील हायकोर्ट यांच्या सुयोग्य अध्यक्षत्वाखाली परतूड जहागीर जिल्हा परभणी येथे ता. २७, २८, २९ तीर १३४६ फ. (१, २, ३ जून १९३७) ला महाराष्ट्र परिषदेचे पहिले आधिवेशन भरणार असल्याचे सर्वांना कळालेच आहे. हैद्राबाद संस्थानातील आंध्राची परिषद तर फार पुढे गेली आहे. कर्नाटक बांधवांनी वाट चालावयास आरंभ केला आहे. घोरत पडला होता तो फक्त महाराष्ट्रच. त्याला जागविण्यासाठी महाराष्ट्र परिषदेचे चालक हाक मारीत आहे "ऊठ, महाराष्ट्रा ऊठ".

## समर्थांची भूमी

आणि योगायोग असा की, ही हाक येत आहे, 'महाराष्ट्र-धर्माचे' आद्य प्रवर्तक व जनक श्री समर्थांच्या जन्मभूमीच्या आसमंतातून. श्री समर्थांसारख्या तेजस्वी व ओजस्वी नररत्नाला जन्म देणारा आद्य महाराष्ट्र, तीन शतकांच्या दीर्घ कालावधीनंतरही खडतर व प्रतिकूल कालाचे असह्य आघात सहन करूनही आपले वैशिष्ट्य कायम ठेवू शकला. नुसते कायम ठेवू शकला असे नाही तर त्यात कार्यक्षमताही राखू शकला. हे पाहून कोणाही महाराष्ट्रीयाला सानंद कौतुक वाटणे साहाजिकच आहे. आता नुसते शाब्दिक कौतुक

करून भागणारे नाही ही गोष्ट महाराष्ट्रीयांनी ओळखली पाहिजे. परतूड-करांच्या हाकेला महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातूनही सक्रिय उत्तर मिळाले पाहिजे. आपले बांधव उन्नतीचा मार्ग आक्रमीत असलेले पाहून व शेजार-पाजारचे लोक कितीतरी पुढे गेलेले पाहून, हे करून, हा आद्य महाराष्ट्र—हा मूळ महाराष्ट्र—आपला आळस झाडून उठेल, परतूडला आपले हजारो प्रतिनिधी पाठवील व माझ्यातील ऐक्य, ज्ञान, धाडस, त्याग, चिकाटी इत्यादी गुण अद्याप कायम आहेत व ते मी माझ्या राज्यासाठी, माझ्या देशासाठी, माझ्या देशबांधवांसाठी, उपयोगात आणावयास तत्पर आहे हे दाखवील, अशी आम्हांस आशा आहे. महाराष्ट्र—सिंह झोपला असेल. पण तो एक वेळं जागा झाल्यावर, कामाला लागल्यावर, त्याच्या मार्गातील अडचणींची धूळ बनली नाही असे घडले नाही म्हणतात. होय ना सिंहाच्या छाव्यानो ?

## तरुणांनो परतूडला चला

तरुणांनो, भावी पिढीचे तुम्हीच आधारस्तंभ आहा ना? भविष्यकाळ हा तुमचाच आहे ना? मग उठा चला पाहू परतूडला. पण लक्षात असू द्या की, शिस्त नसेल, अज्ञाधारकत्व नसेल, सेवेची आवड नसेल, त्याग नसेल, तर तुमच्या तारुण्याचा काही उपयोग नाही. काय म्हणता? या सर्व गोष्टी आहेत तुमच्या जवळ. छान! फार छान! मग जमा पाहू या परतूडला! आज समाजाला तुमचीच गरज आहे. तुमच्या कृतीकडे समाज आज आशापूर्ण दृष्टीने पाहात आहे.

श्रीमंतांनो, तुमच्या आश्रयाखालीच सर्व गुण असल्यामुळे तुमचे येणे तर अत्यंत जरूर आहे, हे काय सांगावयास पाहिजे. आपण तर समाजाचे एकमेव आधार आहा. आपल्या ठिकाणी श्रीमंतीला अत्यंत आवश्यक अस-लेला दातृत्वाचा गुण हा निश्चित आहे, हे आम्ही जाणून आहो.

आपण जे धनसंपन्न बनला आहा ते काही त्या निर्जीव धातूचे दास, पूजक होण्यासाठी नाही, तर समाजासाठी, समाजाच्या रूपाने प्रगट झालेल्या सर्वेश्वरासाठी ती संपत्ती उपयोजण्यासाठी बनला आहात, याची आम्हांला पूर्ण जाणीव आहे. याखेरीज का आपणाला ही विश्वासाची जागा

मिळाली आहे? तेव्हा चला आपणही परतूडला. आपणालाही अत्यंत महत्त्वाची करावयाची ती ही की, आपले वास्तव्य पिढ्यान्‌पिढ्या महाराष्ट्रात असल्यामुळे मारवाडी, गुजराथी, पारसी इत्यादी प्रकारच्या नाजूक भावनांना व वैशिष्ट्यांना न दुखवताही आपण महाराष्ट्रीयत्वाच्या व्यापक भावनेशी अधिक समरस झाले पाहिजे. आपले पूर्वज महाराष्ट्रातच काल व्यतीत करून गेले. आपणही महाराष्ट्रातच जन्मला व वाढला आहात. आणि आपल्या भावी पिढ्याही येथेच नांदणार आहेत. तेव्हा, आपण अंतःकरणाला संकोच न करता महाराष्ट्र परिषदेच्या मंडपाखाली, महाराष्ट्रीयत्वाच्या व्यापक भावनेने अवश्य अवश्य याच.

अनुभविक मुत्सद्यांनो, तुम्ही तर समाजाची ढाल आहात. तुम्ही तर समाजाचे छत्र आहात. तुमच्या मदतीशिवाय हा समाजाचा रणगाडा सुरक्षितपणे या दलदलीतून कसा जाणार? वयोमानामुळे उदासीनतेचे प्राबल्य वाढले असले तरी, तरुणाना अनुभव येईपर्यंत, त्यांचे हिताहित त्यांना चांगले कळू लागेपर्यंत, त्यांची पाठराखण केली पाहिजे. आपलीच मुले आहेत ती. आपल्या गादीवर त्यांचाच हक्क आहे. तेव्हा आपणही यावयास चुकावयाचे नाही बरं का? नाही तर म्हणाल, "अहो माहीत आहे काय होणार आहे ते तेथे?" पण केल्यानेच होत असते ना? उन्हाचा त्रास होईल थोडासा आपल्याला. पण त्यासाठी का आपण समाजाचा उन्हाळा करणार? नाही कधीच नाही.

### शेतकऱ्यांनो चला

भोळ्या भाबड्या शेतकऱ्यांनो, समाजाचे आपण तर मूळ आहा. समाजाला जीवनरस पुरविणारे तुम्ही आहा. तुम्ही सुखी तर समाज सुखी. आणि म्हणूनच तर एवढी ही धडपड आहे. आता थोडेसे बाहेर या. परतूडला भरणाऱ्या मेळाव्यात भाग घ्या. तुमच्या दृष्टीवरची काच फार मळलेली आहे. परतूडला येणार आहेत वैद्य, ते स्वच्छ करून देतील चांगली. काही पैसे मागणारसुद्धा नाहीत. तुम्हाला जेवणाखाण्याची सोयसुद्धा तेच करतील. तुम्ही नुसते या, बायकापोरांसह या. हजारोंनी या. नुसते या म्हणजे झाले.

आणि देवींनो! आपण तर आलेच पाहिजे. आपण तर समाजाचे मूर्तिमंत सौभाग्य आहा. आपल्याशिवाय महाराष्ट्र परिषदेचा पाळणा कोण हालवणार? तिचे लालनपालन कोण करील? तेव्हा तुम्ही आलेच पाहिजे. हट्ट कसा धरावा हे काय आपल्याला शिकवावयास पाहिजे? पुरुष म्हणतील 'तेथे काही नाही, ती काय काँग्रेस थोडीच आहे. त्रास फार होईल, तेथे काही सोय नाही.' पण तुम्ही लक्षात ठेवा की ही पुरुषांची जात मोठी स्वार्थी असते. आणि म्हणूनच हट्ट धरून बसा की, परतूडला यायचेच, तुमच्या हट्टापुढे कोण नमते घेणार नाही? मूर्तीमंत अवतार तुम्ही शक्तीचे, तुमची शक्ती अतुल आहे. तिचा उपयोग करा नीटपणे म्हणजे झाले. आत्मविश्वास तर पाहिजे. आणि तो उत्पन्न व्हावा, तुमच्या शक्तीची तुम्हाला जाणीव व्हावी, कर्तव्याची ओळख पटावी, परिस्थितीचे ज्ञान व्हावे म्हणूनच तर आम्ही पुन्हा पुन्हा म्हणत आहोत की, तुम्ही याच.

स्थलसंकोचास्तव सारांशात सर्वांना पुन्हा पुन्हा हेच सांगावयाचे की, महाराष्ट्र परिषदेचे हे पहिले अधिवेशन आहे, याची जाणीव ठेवून ते सर्वोत्कृष्ट रीतीने पार पाडण्यासाठी प्रत्येकाने आपापल्या परीने साहाय्य करण्यासाठी स्वयंस्फूर्तीने व अहमहमीकेने पुढे यावे. ज्याला ज्या प्रकारची थोडी फार मदत करणे त्याने ती आज केली पाहिजे. एवढ्या मोठ्या कार्यासाठी काय नको? सर्व पाहिजे. पैसा तर अगोदर पाहिजे. त्याबरोबरच कार्यकर्तेही पाहिजेत. वैयक्तिक द्वेष, मत्सर, मतभेद यांना सामाजिक कार्यासाठी तूर्त कैद करून, एकत्वाच्या, राष्ट्रीयत्वाच्या भावनेने प्रेरीत होऊन कार्य करण्यासाठी आज पुढे आले पाहिजे. थोडा वेळ असल्यामुळे प्रचारकांच्या येण्याची, निमंत्रणाची, आग्रहाची किंवा मागणीची वाट न पाहता, कोणी काय केले हे न पाहता, आपण आपले कर्तव्य प्रत्येकजण आपले स्वतःचे कार्य समजून करील व महाराष्ट्र परिषदेचे अधिवेशन अत्यंत यशस्वीरीतीने पार पडेल अशी आम्हांला आशा आहे.

**निजामविजय :** दि. ४ मे १९३७

# महाराष्ट्र परिषदेपुढील कार्य : १

## काही तात्त्विक सूचना

हैद्राबाद संस्थानातील मराठवाड्याचे प्रतिनिधी ता. २७, २८, २९ तीरला (जून २, ३, ४, १९३७) परतूडला जमणार व जवळजवळ ३८ लक्ष महाराष्ट्रीयांच्या सुखदुःखाचा, अडीअडचणींचा विचार करून त्यासंबंधी ठरावही पास करणार हे निश्चितच आहे. थोड्याशा अवधीत परतूडसारख्या जहागिरीच्या तालुक्याच्या गावी नुसती परिषद भरवून ठराव पास करण्याचे कामही किती दुर्घट आहे याची कल्पना प्रत्यक्ष अनुभवाशिवाय येणे कठीण आहे. तथापि परिषदेचे कार्य कितीही दुर्घट असले तरी कर्तव्याची मर्यादा तेथेच संपली असे मानणे आत्मघातकीपणाचे आहे. परिषदेचे कार्य म्हणजे प्रत्यक्ष कर्तव्याची सुरुवात आहे. आरंभच इतका दुर्घट, तेव्हा पुढील मार्ग त्याहूनही अधिक दुर्घट असेल यासंबंधी संशय बाळगण्याचे कारण नाही. कार्य जेवढे अधिक मोठे, तेवढ्या त्याच्या मार्गातील अडचणीही अधिक मोठ्या असावयाच्याच. ज्यांना कार्य करावयाचे आहे त्यांना अडचणींची भीति सोडली पाहिजे. त्यांचा सत्यावरील विश्वास अढळ असला पाहिजे. त्याशिवाय का समाजाची उन्नती होणार आहे? समाजाची सेवा करणे, समाजोन्नतीचा प्रयत्न करणे म्हणजे लोहभस्म खाऊन जगणे आहे. समाजाची सेवा हे सतीचे वाण आहे. अशा या पवित्र पण दुर्घट कार्याला मराठवाडा आरंभ करणार आहे व त्यामुळे आज आम्ही त्याला काही तात्त्विक सूचना करणार आहो.

'सर्वे गुणः कांचनमाश्रयंती' हे सुभाषित फार प्राचीन आहे. पण त्याचा अनुभव आजच्या काळासारखा पूर्वी कधीच आलेला नाही. तेव्हा महाराष्ट्राची सर्वांगीण उन्नती करावयाची असल्यास त्याची प्रथम आर्थिक उन्नति झाली पाहिजे. अर्थ जर नाही तर कशातच अर्थ नाही. एकूण असलेल्या १९,८४५ सावकारांपैकी शेकडा ७१ सावकार निझाम-महाराष्ट्रात आहेत. यावरून महाराष्ट्रीयांना कर्ज काढण्यासाठी सावकारांची फार गरज असते ही गोष्ट स्पष्ट आहे आणि या कर्जापायी महाराष्ट्रातील शेतकरी इतका नागवला आहे की, सरकारला जमीन विक्रीचा कायदा प्रथम औरंगाबाद व उस्मानाबाद या जिल्ह्यांना लागू करावा लागला आहे. सारांश, महाराष्ट्र परिषदेने महाराष्ट्रातील जनतेची आर्थिक उन्नति कशी होईल? तिच्या मार्गात काय काय अडचणी आहेत या गोष्टीकडे पहिल्यांदा लक्ष दिले पाहिजे. आमच्या सरकारचेही अनेक प्रयत्न या दिशेने चालू असल्यामुळे परिषदेच्या कार्यात को-ऑपरेटिव्हसारख्या निमसरकारी संस्थांचेही बहुमोल साहाय्य मिळू शकेल. सरकार आणि समाज यांचे अशा प्रकारे सहकार्य झाल्यास महाराष्ट्राची आर्थिक उन्नती होणे कठीण आहे काय? आणि एक अर्थ साधला म्हणजे शैक्षणिक व सामाजिक सुधारणा घडवून आणणे तितकेसे कठीण मुळीच भासणार नाही. सारांश, पहिल्यांदा अर्थ पाहिजे व म्हणून त्याच्यावरच अधिक भर दिला पाहिजे. जेथे सर्व जग अर्थप्रधान बनून प्रत्येक गोष्टीकडे आर्थिक चष्म्यातून पाहू लागले आहे तेथे महाराष्ट्राने अगदी लेटेस्ट मॉडेलच्या आद्ययावत् असा मॉडर्न चष्मा वापरण्याशिवाय गत्यंतर ठरू शकणार नाही.

## आर्थिक प्रगतीचा प्रश्न

जागतिक परिस्थिती अर्थप्रधान असल्यामुळे परिषदेनेही आर्थिक चष्म्यातून सर्व जगाकडे पाहणे जरूर आहे. आर्थिक उन्नतीच्या कार्यक्रमा-वर आज विशेष भर देणे अवश्य आहे याचा अर्थ बाकीच्या धार्मिक, शैक्षणिक किंवा सामाजिक बाबींकडे लक्ष देण्याचे काही कारण नाही असा मात्र कोणी करू नये. या चारही बाबी आपापल्यापरीने महत्त्वाच्या आहेत. पण त्या सर्वांत आर्थिक बाबीकडे विशेष व तातडीने लक्ष पुरविले पाहिजे, एवढाच त्याचा अर्थ आहे. लोकांना प्रथम पोटभर खावयाला जाडीभरडी

भाकरी व पांघरायला अंगभर कपडा पाहिजे. यानंतर बाकीच्या सुधारणा. प्रथम भाकरीचा प्रश्न जर सोडविला गेला नाही तर या दुसऱ्या सुधारणा पचविता येणार नाहीत. या विचारसरणीचा भावार्थ आर्थिक उन्नति झाल्यानंतर बाकीचे कार्यक्रम हाती घ्यावयाचे असा मुळीच नाही. एकाच वेळी सर्व गोष्टींवर विचार झाला पाहिजे. या सर्वच बाबी परस्परावलंबी किंवा एकमेकांना पूरक असल्यामुळे त्यांना एकदमच उचलल्या पाहिजेत. धार्मिक बाबही आज अत्यंत नाजूक बनलेली आहे. तिचा विचार फार काळजीपूर्वक व शांतपणे झाला पाहिजे. बहुजनसमाजाच्या मनाबर अद्यापही धर्माची पकड फार जबर असल्यामुळे तिला कार्यक्रमातून वगळणे अशक्य आहे.

## कार्यकर्त्यांचा संग्रह

आर्थिक, शैक्षणिक व सामाजिक बाबींवर विचारविनिमय करावयाचा म्हणजे त्यासाठी एका एका बाबीवर दहा दहा लेख लिहावे लागतील. आज आपल्याला स्थूल मानाने विचार करावयाचा आहे. परिषदेने दुसरी महत्त्वाची गोष्ट लक्षात घ्यावयाची ती लोकसंग्रहाची होय. प्रथम ध्येय साध्य निश्चित झाल्यानंतर साधनांकडे लक्ष पुरवावयास पाहिजे. नुसत्या उच्च ध्येयाकडे पाहून त्याची प्राप्ती होत नसते. त्या अनुरोधाने कार्य व्हावयास पाहिजे आणि त्यासाठी प्रथम कार्यकर्ते पाहिजेत. कोणत्याही कार्याचे यशापयश त्याला लाभलेल्या कार्यकर्त्यांवर अवलंबून आहे. तेव्हा निष्ठावंत, ध्येयनिष्ठ अशा कार्यकर्त्यांचा संग्रह प्रथम केला पाहिजे. हे कार्यकर्ते परिषदेच्या कार्याला सर्वस्वी वाहून घेतलेले पाहिजेत. या गोष्टीकडे आजपर्यंत दुर्लक्ष केले गेले असल्यामुळेच आमच्या संस्थांवर आज मृतकळा पसरलेली दिसते. ही गोष्ट महाराष्ट्र परिषदेने विसरून चालणार नाही. महाराष्ट्र गरीब आहे, त्याच्याजवळ पैसा नाही, ही गोष्ट जरी खरी असली तरी, समाजाच्या कार्याला वाहून घेतलेले योग्य कार्यकर्ते परिषदेने संग्रहित करणे अवश्य आहे. आपल्या कुटुंबातील एक तरी व्यक्ती कार्यकर्ती आहे ही भावना नुसत्या जिल्हा व तालुक्यातील वकिलांनी दृढ केली व दररोज ओंजळभर धान्य बाजूला काढले तर असा एक काय पण अनेक कार्यकर्ते महाराष्ट्र आजही पोसू शकेल अशी आमची खात्री आहे. फुकट व फावेल त्यावेळी काम करणारांचा आता काळ उरलेला नाही. एका एका विषयाचा शास्त्रशुद्ध

अभ्यास केलेले अधिकारी, कार्यकर्ते आज पाहिजेत. नुसत्या झाडाला पत्रावळी लावून आता भागणार नाही. कार्यकर्त्यांची जोपासना समाजानेच केली पाहिजे. त्यांच्या आवश्यक गरजा समाजानेच भागविल्या पाहिजेत. जर परिषद ही आपली आद्य जबाबदारी ओळखील तरच तिच्या हातून काही कार्य होण्याची आशा आहे. तेव्हा परिषदेसाठी येणारे प्रतिनिधी या व इतर महत्त्वाच्या प्रश्नांसंबंधी विचार करतील, निश्चित योजना ठरवतील व ती अमलात आणतील अशी आम्हांला फार फार आशा आहे.

**निजामविजय** : दि. ११ मे १९३७

# महाराष्ट्र परिषदेपुढील कार्य : २

## सामाजिक भावनेचा अभाव

परतूडला ता. १, २, ३ जून ला भरणाऱ्या प्रथम महाराष्ट्र परिषदे-पुढील कार्यासंबंधीच्या एक दोन महत्त्वाच्या बाबींचा विचार आम्ही गतांकी केलेला आहे. त्यातील पहिली बाब ही की, परिषदेने आर्थिक उन्नतिकडे विशेष लक्ष द्यावे, व जागतिक अर्थशास्त्रीय दृष्टिकोण आपलासा करून त्यावरूनच जीवनाच्या बहुविध अंगांकडे बघावे. दुसरी बाब निष्ठा-वंत कार्यकर्त्यांचा संग्रह करण्याची होय. आजच्या लेखात आम्ही सामाजिक बाबींचाच फक्त विचार करणार आहोत.

"हे विश्वची माझे घर" ही सर्वोच्च भावनेची शिकवण, आम्हांला हजारो वर्षांपासून मिळत आहे. या उदात्त शिकवणुकीचा हजारांश तरी आज आमच्या प्रत्यक्ष आचरणात उतरलेला दिसतो काय? या प्रश्नाला उत्तर देताना आम्हांला आज लाजेने खाली मान घालावी लागत आहे. स्पष्ट बोलावयाचे म्हणजे आम्हांला, विश्वाच्या दृष्टीने तर राहोच, पण संस्थाना-तील महाराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनेही अद्याप अस्तित्व लाभलेले नाही. ज्या लोकांना स्वतःच्या घराच्या चार भिंतीपलीकडे बघण्याची बुद्धी नाही, जाणीव नाही त्या लोकांचे दैन्य सर्वच प्रकारे कळसास पोहचलेले असावे यात काहीच आश्चर्य नाही. आमच्या समाजाचे बारकाईने निरीक्षण कर-णाऱ्या कोण्याही विद्यार्थ्याला हे आढळून येईल की, ठिकठिकाणचा चांगला सुविद्य वर्ग व सुस्थित वर्ग, पोटापाण्याच्या उद्योगाशिवाय उरलेला तासच्या-तास वेळ नुसत्या चकाट्या, टबाळ्या करण्यात व पत्ते झोडण्यात घालवीत

असतो. कौटुंबिक जबाबदारी आणि तीही कनिष्ठ प्रतीची सांभाळण्यापली-कडे आपल्यावर काही सामाजिक जबाबदारी आहे याची जाणीव विद्यालयाच्या पदव्या मिळविणारांतही शोधून लवकर आढळत नाही. जेथे पदवीधरांची ही स्थिती तेथे इतरांचा प्रश्न कशाला? नवनव्या यांत्रिक शोधांमुळे, जगातील भिन्न भिन्न देशांचे व समाजांचे संबंध निकटवर्ती होऊ लागले आहेत व त्यामुळे दूरच्या देशांतील घडामोडींचे बरेवाईट परिणाम आमच्यावर प्रत्यक्ष होत आहेत, याची माहिती आमच्या सुशिक्षिताना चांगलीशी असते असेही नाही. पण त्यातलेत्यात स्वतःचे पोट भरल्यानंतर शेजारी मेला आहे का जिवंत हे पाहाण्याचीसुद्धा या लोकांना गरज भासत नाही. शेजाऱ्यांच्या घराला आग लागली असता, दरवाजे बंद करून स्वस्थ बसल्यानंतर जो अनुभव येणे शक्य आहे तोच अनुभव अनेक सुविद्य व सुस्थित घराण्यांना आलेला आम्ही प्रत्यक्ष पाहूनही पुन्हा आमचे आत्म-घातकी तत्त्वज्ञान कायमचे कायमच आहे. या सर्व अनर्थांच्या मुळाशी जर कोणती गोष्ट असेल तर ती आमच्या सामाजिक भावनेचा अभाव ही आहे. आधुनिक शिक्षणप्रणालीत हा एक अत्यंत मोठा दोष आहे की, नवशिक्षित तरुणांना स्वतःच्या पलीकडे पाहाण्याची कल्पनाच नसते. बहुजन समाज हा नेहमीच थोरामोठ्यांच्या पावलावर पाऊल टाकीत असल्यामुळे, त्यांच्यातही हा कोत्या दृष्टीचा रोग झपाट्याने प्रसार पावत आहे. त्यामुळे आज त्यांची अन्नान्न दशा झालेली आहे. सारांश, सामाजिक जीवनाची यथार्थ जाणीव उत्पन्न करून देण्याचे कार्य परिषदेने हाती घेतले पाहिजे. त्याशिवाय सामा-जिक संस्था कार्यक्षम ठरणार नाहीत. त्यांना आर्थिक अडचणींना तोंड देता येणार नाही. कर्तृत्ववान कार्यकर्त्यांचा संग्रह करणे शक्य होणार नाही. आणि या सर्वांच्या अभावी समाजाचे दैन्य दूर करणे शक्य होणार नाही.

## दारिद्र्याचे जिणे

दुसरी जी घाण प्रवृत्ती आमच्या समाजात दिवसेंदिवस बळावत चाल-लेली दिसते ती ही की, "कसेही जगावयाचे". कसेही जगण्याची प्रवृत्ती ज्या समाजात प्रबल होऊ लागली तो समाज अवनतीच्या खोल गर्तेकडे जाऊ लागला आहे, असे समजावयास काहीच हरकत नाही. कसेही जगावयाचे हे ध्येय पुढे ठेवून मनुष्य जगू लागला, आपला व्यवहार करू

लागला की त्याची व स्वार्थाभिमान, आत्मविश्वास इ. गुणांची फारकत होते. अशा प्रकारे अवनतीच्या घसरणीला लागलेला समाज, त्याला वेळीच सावरले नाही तर, तो नष्ट होण्याची भीती असते. समाजात कसेही जगावयाचे नाही, तर फक्त मानाने मनुष्य म्हणून जगावयाचे ही भावना सतत तेवत ठेवली तरच त्या समाजाला आपले वैशिष्ट्य कायम ठेवून जगणे शक्य असते. आज आमच्या समाजाचे सूक्ष्मपणे निरीक्षण करू जाता तरुण पिढीत स्वाभिमान किंवा आत्मविश्वास दिसण्याऐवजी, कशाही स्थितीतून मी मार्ग काढीनच व माझ्या स्वाभिमानाला यत्किंचीतही कमीपणा आणणाऱ्या गोष्टी मला सहन होणार नाहीत, अशी वीर वृत्ती दिसण्याऐवजी झटपट श्रीमंत होण्याची व त्यासाठी वाटेल ते अर्थात ज्यामुळे कसेतरी जगावयाचे या ध्येयाला बाध येणार नाही असे, करण्याकडेच त्यांचा अधिकांशाने कल असलेला दिसतो. ज्या तरुण वर्गाच्या आशेवर भविष्यकाळाची सुंदर चित्रे चितारावयाची तोच जर, 'कसे करू, काय करू?' हा अष्टाक्षरी मंत्र जपू लागला, परिस्थितीला वाकविण्याऐवजी तिच्यापुढे कां कूं करू लागला व कसेतरी जगावयाचे असा हट्ट धरू लागला तर असे व्हावयाचे? तेव्हा तरुण वर्गात झटपट श्रीमंत होण्याची वाढत असलेली अनिष्ट प्रवृत्ती व तिच्याच पोटी जन्म पावणारी कसेही जगावयाचे, ही आत्मघातकी विचारसरणी निर्माणच होईल व गरिबी हे पाप आहे असे न वाटेल, श्रम करण्याची हौस वाढेल, उन्नतीसाठी कसलेही हाल, कष्ट सोसण्याची सिद्धता असेल, आपल्या राज्याचा अभिमान वाटेल असे ठराव परिषदेच्या चालकांनी केले पाहिजेत. "यथासांग जे कार्य काही घडेना, घडे कर्म ते पुण्य गाठी पडेना", ही समर्थांची उक्ती प्रसिद्धच आहे. या समर्थोक्तीचा रोकडा अनुभव आज आम्हांला येत आहे. आजच्या अंकात कठीण काळातही धर्म या शीर्षकाखाली प्रति वार्षिक खर्ची पडणारा आकडा फार मोठा आहे, हे कोणाही विचारवंताला सहज कळून येईल.

## मोक्षासाठी धडपड

आमच्या समाजाच्या पदरात जीवनाला आवश्यक असलेली ओलीकोरडी भाकरी व जाडा भरडा कपडाही पडत नाही. धर्माचार्य सांगतील की, याची आम्हांला कल्पना आहे. पण त्यांच्या या म्हणण्याला मतलब-

सिंधूशिवाय कसलाच आधार नाही ही गोष्ट प्रत्येक विचार करू शकणाऱ्याला आता पटलेली आहे, व त्यामुळे त्यासंबंधी काम करण्याचे कारणच उरलेले नाही. जो धर्म समाजाला धारण करू शकत नाही तो मोक्षाच्या गोष्टी काय सांगणार? मोक्षाच्या अभिलाषेने समाजाची पद्धतशीर चाललेली पिळवणूक बंद करून त्यांच्या ठिकाणी जिवंतपणे श्रम करून मानाने पोटभर भाकरी व अंगभर कपडा देणाऱ्या व कुटुंब, समाज व विश्व यांच्याशी पायरी पायरीने समरस होणाऱ्या व शिकविणाऱ्या खऱ्या धर्मबांधवांची अवश्यकता आहे. आपलेपणा निर्माण केला गेला पाहिजे. मेल्यानंतर मिळणाऱ्या मोक्षाची आता माती झाली पाहिजे, त्याच्यासाठी निरर्थक पैशाचा व शक्तीचा अपव्यय न करता जिवंतपणी नगदी मोक्ष देणारे बंधू पाहिजेत. त्यांनी धर्माचा ओघ आता वळविलाच पाहिजे. दीनांचे दुःख दूर करू न शकणारा, भुकेल्यास भाकरी न देणारा, उघड्यांना वस्त्र न देणारा, विद्यार्थ्यांना विद्या न देणारा, स्वतःचीच विटंबना न थांबवू शकणारा समाज धर्म म्हणून जिवंत राहू शकत नाही. इतर गोष्टी तर दूर राहोतच, पण अनाथ मुलांमुलींचे गृहासारख्या आधुनिक संस्थांचे संगोपन करणे, नवसुशिक्षितांना व सुधारकाग्रणी लोकांना आमच्या इलाख्यात शक्य होऊ नये व त्यांची महति कळू नये यापेक्षा अधोगती ती कोणती? मुलीकरिता एक हायस्कूल नाही. समाजाकडून मिळत असलेल्या पैशांचा मोबदला समाजाच्या सेवेला सर्वस्वी जरी नाही तरी, अंशात्मक मदत देण्याची कल्पनाच आमच्या वर्गाला अद्याप झालेली नाही.

व्यक्तिगत उन्नतीसाठी, व्यक्तिगत सुखासाठी धडपडणाऱ्यांना मदत करण्याकरिता, समाजाच्या धार्मिक भावनेचा अपव्यय करणे सर्वथैव अनुपयुक्त व आक्षेपार्ह आहे. आमच्या सामाजिक संस्थांची दृष्टी समाजाच्या कल्याणाकडे, उन्नतीकडे असणे जरूर नाही काय?

दहापाच वर्षांत आपल्या मुलाबाळांचा संसार थाटाने करणारे दहापाच डॉक्टर किंवा पदवीधर निर्माण करणे हेच संस्थांचे ध्येय असावयास पाहिजे काय? स्वतःचा काही संसार नेटका करू शकणाऱ्या वकील डॉक्टरांची आज समाजाला गरज आहे. मात्र समाजाच्या साहाय्याची परतफेड करणारांची व त्यांच्या सेवेला वाहून घेणारांची, समाजसेवकां[redacted]

आहे. पण ही गोष्ट अद्यापही आमच्या सुशिक्षितांत निर्माण झालेली नाही. सारांश काय की, समाजाच्या त्यागाचा, समाजाच्या कार्याचा, समाजाच्या धर्माचा, त्याच्या हिताच्या, सुखाच्या, कल्याणाच्या दृष्टीने उपयोग करणे कसे शक्य होईल याचा विचार व तदनुसार प्रयत्न होणे आज अत्यंत जरूरी आहे.

## स्त्रीसमाजाची केविलवाणी स्थिती

आमच्या सर्व समाजाची स्थिती तर अत्यंत हीन दीन अशी बनलेली आहे. त्यांना शिक्षण नाही, त्यांना मान नाही, त्यांना जबाबदारीची जाणीव नाही, त्यांना आत्मविश्वास नाही, थोडक्यात सांगावयाचे म्हणजे आम्ही त्यांना मनुष्यच समजावयास तयार नाही. प्रत्येक गावात जेव्हा सुशिक्षित स्त्रिया आढळतील व त्याच आपल्या भगिनीच्या उन्नतीसाठी खटपट करतील तेव्हाच स्त्री-समाज सुधारण्याची आशा आहे. आमच्या स्त्री-समाजात आत्मविश्वास कसा निर्माण होईल, त्यांच्यात आपल्या भगिनी वर्गाच्या उन्नतीची तळमळ कशी उत्पन्न होईल, एवढी काळजी महाराष्ट्र परिषदेने घेतली तरी पुरे. स्त्री समाजाची उन्नती त्यांनी स्वतः प्रयत्य केल्याशिवाय होणारी नाही ही गोष्ट खरी आहे. पण आजच्या त्यांच्या केविलवाण्या स्थितीत त्यांना कार्यप्रवृत्त करणे जरूर आहे. स्त्री ही समाजाचे अर्धे अंग व्यापून आहे. समाजाच्या धारण पोषणादी कार्यात तिच्याकडे फार मोठ्या जबाबदारीची कर्तव्ये अवलंबून आहेत. ती मनुष्य रत्नाची चालती बोलती खाण आहे. ही खाण जर सुस्थित असेल तर तिच्याकडून मिळणारी रत्ने कशी चांगली असतील? जो समाज आपल्या स्त्री-समाजाकडे दुर्लक्ष करीत आहे, त्याच्या सुखदुःख व उन्नती अवनतीविषयी निष्काळजी आहे तो अर्धांगवायूने पीडित माणसाप्रमाणेच नाही काय?

निजामविजय : दि. १८ मे १९३७

# महाराष्ट्र परिषदेपुढील कार्य : ३

## प्रथम खेड्यांची सुधारणा

महाराष्ट्र परिषदेपुढील कार्यासंबंधी आम्ही गेल्या दोन अंकात स्थूल मानाने विचार केला आहे. स्थलसंकोचास्तव व वेळेच्या अभावी आम्हांला आज व्यवहाराच्या प्रत्यक्ष क्षेत्रात उपयुक्त ठरतील अशा गोष्टींचा विचार करणे जरूर वाटत आहे. कारण पुढच्या मंगळवारी परिषदेच्या कार्याला आरंभ होणार आहे. या परिषदेपुढे येणाऱ्या काही ठरावांचा कच्चा खर्डा आम्ही आज इतरत्र प्रसिद्ध केलेला आहे. त्यामुळे परिषदेपूर्वी निरनिराळ्या मुद्द्यांवर साधकबाधकपणे विचार करण्यास पुष्कळच अवसर मिळेल.

परिषदेच्या प्रथम पत्रकात, शैक्षणिक, आर्थिक, धार्मिक व सामाजिक बाबींचा परिषदेत विचार केला जाणार आहे. परिषदेपुढे येणाऱ्या काही ठरावांचा जो कच्चा खर्डा इतरत्र प्रसिद्ध झाला आहे त्यावरून उपरिनिर्दिष्ट चार बाबींसंबंधीच्या कोणत्या कोणत्या मुद्द्यांवर तेथे चर्चा होणार आहे याची बरीच कल्पना येऊ शकते. या सर्व ठरावांसंबंधी येथे विचार करण्याचे प्रयोजन नाही. त्यांतील बहुतेक ठराव आजपर्यंत अनेक वेळां चर्चिले गेलेले व मतभेदातीत आहेत. उदाहरणार्थ, प्राथमिक शिक्षण सक्तीचे, मोफत व मातृभाषेतून देण्याचा ठराव पाहा. या ठरावाला विरोध होण्याचे आता भयच उरलेले नाही. सरकारला देखील ते मान्य आहेतच. त्यांना व्यवहारात आणण्यासंबंधीचाच काय तो प्रश्न आहे. या अशा ठरावाशिवाय इतर अनेक ठराव परिषदेपुढे येणार असतीलच. त्यांच्यापैकी काही महत्त्वाच्या बाबींकडे आम्ही आज परिषदेचे लक्ष वेधू इच्छितो.

आमच्या हिंदुस्थानातील प्रत्येक प्रांतात बहुसंख्य लोक खेड्यांतून राहातात. खेड्यांची सुधारणा होणे म्हणजेच हिंदुस्थानची सुधारणा होण्या-सारखे आहे. मोठमोठाल्या राजधानीच्या किंवा इतर शहरांतून डांबरी सडका, प्रासादतुल्य घरे, विजेचे दिवे, विश्रांतीसाठी सुंदर बागा व इतर प्रकारच्या अनेक सुखसोई केल्या म्हणजे त्या प्रातातील बहुजनसमाजाची अथवा तो राहात असलेल्या गावांची सुधारणा झाली असे होत नाही. शेकडा ८० हून अधिक लोक खेड्यांत राहात असल्यामुळे त्यांची सुधारणा झाली तरच देशाची सुधारणा झाली असे म्हणता येईल. म्हणूनच आमच्या देशातील लोकनायकांचे तसेच सरकारचेही लक्ष आज खेडी व त्यांतील गरीब व आशिक्षित लोकांकडे वेधले असून को-ऑपरेटिव्ह खात्याचे विद्य-माने काही ग्रामसुधारणेचे प्रयोग सुरू करण्यात आले आहेत. हिंदु-स्थानातील इतर प्रांतांतून या दिशेने अनेक प्रयत्न खाजगी व सरकारी चालू असता आम्ही मात्र अद्याप प्रयोगच करीत आहोत. जी इतर ठिकाणी मान्य झाली आहे त्या गोष्टीसंबंधी नुसते प्रयोग करण्यात कालापव्यय करण्याचे आज वस्तुतः कारणच नाही. खेड्यांतील जनतेची सुधारणा कशी करता येईल, त्यांची दुःखे कशी कमी होतलि या गोष्टींचा आता आमच्या सरकारने व सामाजिक संस्थांनी नेटाने प्रयत्न केला पाहिजे. ‘ग्राम सुधारणा करावयाची, ग्राम सुधारणा करावयाची’, म्हणजे काय करावयाचे, हाच एक मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. आमच्या निझामी महाराष्ट्रात पाच दहा गावी जे प्रयत्न चालू आहेत त्यावरून या प्रकरणी काही समाधान मानता येत नाही. सरकारी खात्याने शे-पन्नास रुपयांवर एकादा मनुष्य नोकर ठेवला व त्याने एकाद्या खेड्यात, बतावणीसाठी काही ४ गोष्टी केल्या व त्याची टामटीम केली म्हणजे काही भागत नाही. त्यासाठी पद्धतशीर प्रयत्न झाला पाहिजे.

खेड्यांतील बहुसंख्य वर्ग शेतकीवर अवलंबून आहे आणि आज ५-१० वर्षांपासून शेतीची इतकी हलाखीची स्थिती झाली आहे की, तीजवर अवलंबून असलेला शेतकरी वर्ग अन्नाला महाग होऊन बसला आहे. तेव्हा शेतकऱ्यांच्या भाकरीचा प्रश्न प्रथम सोडवला जावयास पाहिजे. हा प्रश्न आमच्या सुवर्ण भूमीत सोडवणे वस्तुतः फारसे कठिण नाही. पण आज

प्रत्यक्षात कठीण होऊन बसला आहे खरा. थोड्याशा विचाराने आपणास हे दिसून येईल की, सरकार व सावकार यांच्या देण्यापायीच गरीब शेतकरी इतका नागवला जातो की, त्याला शेवटी पोटाला पुरेशी भाकरी व अंगाला कपडाही मिळत नाही.

## शेतसारा कमी करा

ज्या वेळी शेतीच्या मालाला पुष्कळ किंमत येत असे, त्यावेळी सरकारने शेतसारा बराच वाढविला, पण शेतीच्या मालाच्या किंमती गेल्या पाच सात वर्षांपासून इतक्या कमालीच्या घसरल्या आहेत की, वाढलेले सरकारी देणे दिले म्हणजे शेतकऱ्यांजवळ काहीच उरत नाही, किंवा फारच थोडी शिल्लक उरते, तदिखलि पुरेशी नसते. जीवनाला आवश्यक गोष्टी श्रम करून न मिळाल्या म्हणजे सावकाराचे घर पाहाणे हाच त्यावर एक उपाय आहे. शेतकऱ्याचे मूळ उत्पन्नच अपुरे असल्यावर त्यावर सावकाराच्या साहाय्याचा काहीच परिणाम होऊ शकत नाही. मग हा सावकार चार महिन्यात सवाई घेणारा असो किंवा सरकारच्या आश्रयाने चाललेली सहकारी पतपेढी असो. मुळातच शेतकऱ्याला पुरेसे उत्पन्न होत नाही, तेथे त्याने सावकाराच्या देण्याचा प्रश्न कितीही सवलती दिल्या तरी, सोडवणे शक्यच नाही. आणि म्हणूनच कित्येक ठिकाणी शेतकऱ्याला कायमचा ऋणमुक्त करण्यासाठी त्याच्या ऋणाची जबाबदारी सरकार स्वतःवर घेत आहे.

शेतीच्या मालाच्या किंमती कमालीच्या उतरल्यामुळे सरकारी देणे त्या प्रमाणात कमी केले गेल्याशिवाय शेतकऱ्याला कमी दराने कर्ज देण्याची सोय करून काहीच उपयोग होणार नाही. ही गोष्ट लोकनायक व सरकार यांना मान्य झाली असल्यामुळे आमच्या शेजारच्या मुंबई व मद्रास या प्रांतांत नवीन सुधारणा कायद्याप्रमाणे लोकनियुक्त मंत्र्यांचे हाती सत्ता आल्याबरोबर त्यांनी प्रथम शेतसारा कमी करण्याचा प्रश्न हाती घेतला आहे. मुंबई व मद्रास प्रांतातील शेतकऱ्यांची जी हलाखीची स्थिती आहे तीच आमच्या हैद्राबाद संस्थानातील शेतकऱ्यांची आहे. मुंबई व मद्रास सरकारला जर शेतसाऱ्यात २५ टक्के घट करण्याची आवश्यकता दिसली व पटली तर ती येथेही का पटू नये ?

शेतसारा कमी करणे ही आजची अत्यंत निकडीची गरज आहे. पण त्याचबरोबर शेतकऱ्याला आज असलेले कर्ज सरकारने स्वतःच दिल्याखेरीज त्याला ही सूट मिळूनही काही फारसा उपयोग होणार नाही. तसेच सावकारी व्याजाला द. म. द. शे. आठ आण्याची मर्यादा घातली गेली पाहिजे, व शेतकऱ्याला आडवणुकीशिवाय आवश्यकता व मगदूर याला अनुसरून कर्ज मिळण्याची सोय झाली पाहिजे.

सहकारी चळवळीचे तत्त्व आता जगमान्य झालेले आहे. आमच्या संस्थानातील सहकारी चळवळीलाही कधीच कोणी आक्षेप घेणार नाहीत. आक्षेप काय तो ही चळवळ चालवण्याच्या पद्धतीवर आहे. सहकारी चळवळ ही म्हणावयास निमसरकारी असली तरी सरकारी अधिकाऱ्यांची तिजवरची पकड फार जबर आहे. पुष्कळ ठिकाणी बिनसरकारी लोकांची तिजवर सत्ता चालत असलेली दिसते. हे लोक, लोककल्याणेच्छेपेक्षा अधिकारी वर्गाच्या कृपेचे भुकेले असतात, त्यामुळे सरकारची सदिच्छा असूनही या चळवळीला यावे तसे यश येत नाही. वरिष्ठ अधिकारीवर्गाला या बाबतीत प्रत्यक्ष दोष देता येणार नाही, पण त्याच्या हाताखालच्या लोकांचे धनीपण त्यांचेकडे येत असल्यामुळे त्या दोषांचे खापर त्यांच्याच माथ्यावर फुटणे स्वाभाविक आहे, व या चळवळीच्या अपयशाला हेही एक कारण आहे.

## वऱ्हाड प्रांताची मालकी

वऱ्हाड प्रांतावर आमच्या सरकारची मालकी असल्याची कबुली इंग्रज सरकारने परवा पुन्हा एकवेळ दिली आहे. आमच्या मालकीच्या या प्रांतातील लोकांत आमच्या राजसिंहासनाविषयी व आम्हां लोकांविषयी, त्यांचे आमचे संबंध गेली ७५ वर्षे तुटकपणाचे राहिल्यामुळे, परकेपणाची भावना वसत आलेली पाहून हैद्राबाद संस्थानच्या कोणाही अभिमान्याला दुःख वाटल्यावाचून राहाणार नाही. ज्या राजघराण्याची मालकी त्या प्रांतावर आहे व ज्या लोकसमाजाचा तो एक भाग आहे, त्यांच्यासंबंधी आपुलकी न वाटता इंग्रज सरकार व मुंबई प्रांतातील जनता त्याला अधिकांशाने जवळची वाटते. आमच्या मते या गोष्टीला आळा घालून संस्थानी जनता व

संस्थानी सरकार यांच्यासंबंधी आदर व प्रेमभावना वऱ्हाडच्या लोकात निर्माण होतील असा आमच्या सरकारने व जनतेने प्रयत्न केला पाहिजे. हा प्रयत्न महाराष्ट्रीय लोकांना अधिक सुलभतेने करणे शक्य असल्यामुळे महाराष्ट्र परिषदेने आपल्या कार्यक्षेत्रात आपल्या सरकारच्याच मालकीच्या वऱ्हाडाचाही समावेश करावा. प्रेम किंवा आदराची भावना, सहवास व संघटनेने निर्माण होत असल्यामुळे सामाजिक प्रसंगी वऱ्हाडात जाणे, एक-मेकांची दुःखे समजावून घेणे व एकमेकांना अडचणीच्या वेळी मदत करणे वगैरे गोष्टी जितक्या अधिक घडून आणता येतील तितक्या आणल्या पाहिजेत. गैरमुलकीचे कलम काही वऱ्हाडाला लागू शकत नाही. आपल्या संस्थानची इभ्रत वाढविण्याचे काम महाराष्ट्र परिषदेने अवश्यमेव हाती घ्यावे व सरकारनेही प्रांतीय सहकार वाढविण्याच्या प्रयत्नाला शक्य ते साहाय्य करावे अशी आमची कळकळीची विनंती आहे. हा प्रयत्न जर न झाला, तर वऱ्हाडची आपली मालकी मान्य करवण्याचा प्रयत्न होऊन न होऊन सारखाच ठरेल. अत्यंत प्रयासाने व कष्टाने जी गोष्ट साध्य केली गेली आहे तिचे संरक्षण करणे, तिच्यात वाढ करणे हे सरकारबरोबर आम्हा महाराष्ट्रीय समाजाचे कर्तव्यच आहे. महाराष्ट्र परिषद या आमच्या सूचनेचा काळजीपूर्वक विचार करील काय?

**निजामविजय** : दि. २५ मे १९३७

# महाराष्ट्रा परत जागृत हो

## आत्मविश्वासाचे वातावरण

हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषदेचे पहिले आधिवेशन गेल्या १, २, जून १९३७ ला परतूड येथे श्री. गोविंदरावजी दाजीसाहेब नानल यांच्या अध्यक्षतेखाली भरले होते व ते यशस्वी रीतीने पार पडले हे ऐकून समाधान व अभिमान वाटला यात शंका नाही. अवघ्या २५-२७ दिवसांच्या अल्प कालावधीत अगणित अडचणींना कुशलतेने बगल देऊन परिषद यशस्वी केल्याबद्दल चालक वर्गाचे अभिनंदन करणे जरूर आहे. ज्या भूमीने भारताच्या पडत्या काळात, त्याचे गतवैभव, त्याचे मतस्वातंत्र्य पुन्हा मिळविण्याच्या कामात महाराष्ट्राला पुढारी नेमले व त्यास पुढारीपण स्वीकारावयास उद्युक्त केले व त्यांच्यात आत्मविश्वास उत्पन्न करून अनेक अनुल्लंघनीय अडचणींचे डोंगर चढून जाण्यास प्रवृत्त केले त्याच भूमीतील परतूडने "महाराष्ट्र परत जागा हो!" असा यथोचित संदेश तेथे हजारोंच्या संख्येने जमलेल्या प्रतिनिधींना व प्रेक्षकांना दिला. निझामीय महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतून आलेले १ हजार प्रतिनिधी व २ हजार प्रेक्षक आपापल्या भागांत परतून परतूड येथे मिळालेला परत जागृत होण्याचा दिव्य संदेश महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून, दऱ्याखोऱ्यांतून, घराघरांतून पोहचवतील व सबंध महाराष्ट्रातील वातावरण आत्मविश्वासाच्या व नवचैतन्याच्या लहरींनी भरलेले फार थोड्या अवधीत आढळेल अशी आशा करावयास आज कसलीच हरकत नाही.

परतूडसारख्या जहागिरितील तालुक्याच्या गावी एवढा मोठा समाज एकंदर समाजाच्या सर्वांगीण उन्नतीचा विचार करण्यास जमलेला असा हा पहिलाच प्रसंग आहे. महाराष्ट्र परिषदेचे हे पहिलेच अधिवेशन असल्या-मुळे व त्याच्या आवश्यक व्यवस्थेसाठी पुरेसा वेळ नसल्यामुळे ते इतक्या उत्कृष्ट प्रकारे यशस्वी होईल अशी चालकांनाही कल्पना नव्हती. आणि अशा प्रकारची कल्पना असणाऱ्यांना अपेक्षा नव्हती. आणि म्हणूनच अपेक्षा आणि कल्पना याहून आधिक यशस्वी ठरलेल्या परिषदेची आज समाजाला तीव्र गरज भासत होती हे सिद्ध होते. अनेक ठिकाणच्या कार्यकर्त्यांच्या मनात अशा प्रकारची परिषद व्हावी, तीत ठिकठिकाणच्या कार्यकर्त्यांनी भाग घ्यावा, विचारांची देवाण घेवाण व्हावी, परिस्थितीच्या संकलित स्वरू-पाचे दर्शन व्हावे व त्यावर परिणामकारक उपायांची योजना केली जावी असे विचार बरेच दिवसांपासून घोळत होते. कै. वामनरावजी नाईक, ॲ. काशीनाथरावजी वैद्य, श्री. दिगंबरराव बिंदू व श्री. लक्ष्मणराव फाटक व इतर महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनी अशा परिषदेची आवश्यकता फार पूर्वीच ओळखून तिला मूर्त स्वरूप देण्याच्या प्रयत्नाला हात घातला होता. असली कल्पना प्रत्यक्षात उतरलेली पाहाण्यास आज धर्मवीर वामनराव नाईक हयात नाहीत ही गोष्ट सर्वांच्या मनाला सारखीच लागलेली आहे. परिषदेने त्यांच्या अकाली निधनासंबंधी दुःख व्यक्त केले आहेच. आपला सहकारी गेला तरी परिषदेची कल्पना प्रत्यक्षात उतरवण्याचे कामी ॲ. वैद्यांनी जी धडाडी दाखविली ती निःसंशय अभिनंदनीयच आहे. ॲ. वैद्यांचे नाव परिषदेच्या चालकवर्गात नसले तरी किंवा ते अध्यक्ष अथवा उपाध्यक्ष नसले तरी, परिषदेच्या मूळ कल्पनेपासून तो ती इतक्या यशस्वी रीतीने पार पडेपर्यंत पुष्कळसे श्रेय त्यांनाच आहे ही गोष्ट निराळी सांग-ण्याची गरज नाही. सारांश, ॲ. वैद्यांचे व श्री. दिगंबरराव बिंदूंचे या प्रसंगी अभिनंदन करणे जरूर आहे.

## योग्य भाषणे आणि ठराव

अपेक्षेबाहेर परिषद यशस्वी झाली असली तरी यावरून तिची लोकांना तीव्र गरज आहे हे जसे सिद्ध झाले, तसेच एका खेडेगावातील पाटील अशा प्रसंगी स्वागताध्यक्षाची जबाबदारी सांभाळण्यास पुढे आलेला आहे

व ती यशस्वीरीतीने पार पाडू शकला आहे यावरून शहरे व खेडी यांतील जनता आता एका व्यासपीठावर येण्यास उत्सुक आहे हे सिद्ध झालेले आहे. परिषदेच्या मंडपाखाली लहान थोर, जहाल मवाळ, सनातनी सुधारक, व्यापारी मारवाडी समाज वगैरे बहुविध प्रकारच्या समाजाचे व जातिपंथांचे, कृत्रिम बंधने झुगारून देऊन महाराष्ट्रीयत्वाच्या व्यापक भावनेने एकत्र आलेले पाहून सहृदय माणसाचे अंतःकरण आनंदाने उचंबळून आल्यास नवल नाही.

स्वागताध्यक्षांचे भाषण आम्ही गतांकीच प्रसिद्ध केले आहे. एकंदर परिस्थितीचा विचार करता ते लहानसे भाषण असूनही फारच उत्कृष्ट वठले आहे, असे म्हणावयास कसलीच हरकत नाही. अध्यक्षीय भाषणही बरे झाले आहे. परिषदेत पास झालेले ठराव इतरत्र छापलेले आहेत. त्यात बहुतेक सभाबंदी, खाजगी शाळांचा कायदा, प्राथमिक शिक्षण सक्तीचे व मोफत करण्याची मागणी वगैरे ठराव आहेत. या असल्या कंठाळी ठरावांवर प्रत्येक परिषदेत शब्दांचा कीस पाडून व त्याच त्याच मुद्दयांवर पुन्हा पुन्हा लांबलचक व्याख्याने देऊन काळाचा अपव्यय करण्यापेक्षा अध्यक्षाकडून ते मांडले जाणे व नवीन प्रश्नांचा विचार होणे अत्यंत जरूर आहे. महाराष्ट्र परिषदेचे हे पहिले अधिवेशन थोड्या अवधीत भरले असल्यामुळे, त्यांत व्यावहारिक चुका झालेल्या असल्या तरी त्या क्षम्य समजून परिषद अपेक्षेबाहेर यशस्वी झाली आहे असेच कोणीही म्हणेल.

**निजामविजय** : दि. ८ जून १९३७

# दिशाभूल करणारी वादळे

## स्फोटक बातम्या काय दर्शवितात ?

गेल्या आठ पंधरा दिवसांपासून हैद्राबादच्या वृत्तपत्रीय जगात "कॉमन प्लॅटफॉर्म" च्या भुताने बरीच दंगल उडवून दिली आहे. फेडरेशनची चर्चा करीत असताना, कॉमन प्लॅटफॉर्मची आवश्यकता काय प्रतिपादिली जाते, फेडरेशनसंबंधी उलटसुलट काय काय लेख प्रसिद्ध होतात, त्यांतूनच हिंदु–मुसलमानातील बेबनाव दूर करण्यासाठी एका संयुक्त मंडळाच्या स्थापनेची बातमी काय प्रसिद्ध होते, लागलीच दुसऱ्या कमिटीला हिंदु–मुसलमानांत काही बेबनाव आहे हेच मुळी मान्य नसल्याचे काय प्रसिद्ध होते, संस्थानाबाहेरील वृत्तपत्रे या कमिटीला 'शांतता स्थापन करण्यासाठी हैद्राबाद सरकारने नेमलेली' असे विधान काय करतात, कमिटीच्या सभासदांत जबाबदार समजल्या जाणाऱ्यांची नावे प्रसिद्ध होऊनही ते काहीच कसे स्पष्टीकरण करीत नाहीत व हैद्राबादेतील हिंदूंचा पुढारी वर्ग एकत्र जमून इकडच्या तिकडच्या चार गप्पा मारून पुन्हा घरोघर काय परततो, हे एक खरोखरीच गौडबंगाल आहे.

आणि या साऱ्या गोष्टी हैद्राबादेसारख्या राजधानीच्या शहरी केव्हा घडत आहेत? होपल्याला दंगा होऊन मुसलमानांनी तीन हिंदू ठार करून त्यांची प्रेते जाळली. हळ्ळीखेड येथे मारामारी होऊन कित्येक लोक जखमी झाले, लातूरला मुन्सफ साहेबावर गुंडांचा हल्ला झाला इत्यादी अंगावर शहारे आणणाऱ्या बातम्या येऊन धडकत आहेत तेव्हा. देशात दिवसा ढवळ्या बंदुकी तलवारी घेऊन अत्याचारी लोक खून करीत आहेत, कोठे

डोकी फोडीत आहेत, कोठे अब्रू घेत आहेत आणि राजधानीच्या शहरातील लोक फेडरेशनच्या प्रश्नावर चर्चा करीत आहेत. कॉमन प्लॅटफॉर्मची आवश्यकता प्रस्थापित करीत आहेत. शांतता कमिटीवर जावे की न जावे या संबंधी वाटाघाटी करीत आहेत. आणि आमच्या सुव्यवस्थित पोलिस खात्याला होपल्यातील अत्याचारी लवकर सापडत नाहीत. लातूरच्या मुन्सफसाहेबांवर हल्ला करणारा एकच गुंड सापडतो. तेव्हा वृत्तपत्रीय बातम्यांत किती तथ्य आहे, वस्तुस्थिती काय आहे, काय काय उपाय अमलात आणले गेले आहेत याची माहिती जनतेला देण्याची आवश्यकता असताही सरकार तिकडे कानाडोळा करते हा दुर्दैवाचा कळस नाही काय?

उपरिनिर्दीष्ट गोष्टी बघितल्यानंतर कोणाही विचारी माणसाला अशी शंका येते की, या सर्वांच्या मुळाशी फेडरल कौन्सीलमध्ये जाण्याची, एकादी लट्ठ पगाराची व अधिकाराची जागा मिळविण्याची अथवा देशातील अत्याचाराकडे उपेक्षा दृष्टीने पाहाण्यास प्रवृत्त करण्याची राक्षसी महत्त्वाकांक्षा अथवा अशीच एखादी गोष्ट तर नाही ना? कामिटीतल्या ज्या सभासदांची जी नावे ता. १४ जुलैच्या 'मुशीर' मध्ये प्रसिद्ध झाली आहेत ती पाहिल्यानंतर ही कमिटी एक भावी हिंदू पुढारी म्हणविणाऱ्याच्या गृही "चहाच्या वादळात" हिंदु–मुसलमान समाजात शांतता स्थापन करण्याच्या हेतूने स्थापन झाली असेल अशी कल्पनाच करवत नाही. तबलिगसारख्या चळवळीचे सूत्रचालक एकिकडे आणि हैद्राबादेतील हिंदूंच्या अन्यायाचे परिमार्जन व्हावे म्हणून झटणारे दुसरीकडे असल्याचे पाहून वरील संशयाला अधिकच बळकटी येते. अब्रू, वित्त आणि जीवित यांची दिवसाढवळ्या लूट होत असल्याच्या बातम्या येत असताना पुढाऱ्यांना प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे त्यांशी हस्तांदोलन करण्याची व त्यांच्याबरोबर शांतिपाठ म्हणण्याची इच्छा न लपवता येण्याइतकी तीव्र होते. आमच्या पुढाऱ्यांची जर तशी इच्छा नसेल तर त्यांनी आपल्या नावाचा केला जात असलेला दुरुपयोग ताबडतोब बंद करावयास नको काय?

### या गोंधळावर प्रकाश टाकावा

ता. १५ जुलैच्या 'मुशीर' मध्ये प्रसिद्ध झालेली याच प्रकरणासंबंधीची बातमी पाहून वरील विधानांना अधिकच बळकटी येते. या

कमिटीला हिंदू मुसलमानात बेबनाव आहे हेच मुळी मान्य नाही म्हणतात. नवाब बहादुरयारजंग यांचेच हे मत असल्यास त्यासंबंधी आम्हांस आज येथे काहीच लिहिण्याची गरज दिसत नाही व शक्यताही नाही. पण हिंदू समाजाच्या दुर्दैवाने या कामिटीवर श्री. वैद्य व श्री. एस. हनुमंतरावासारखे हिंदूंचे पुढारी असल्याचे वाचून मन उद्विग्न होते आणि म्हणून या पुढाऱ्यांचीही उपरिनिर्दीष्ट मताला मान्यता आहे काय असा स्पष्ट प्रश्न करणे आम्हांस आवश्यक वाटत आहे. सर्वार्थ साधण्याचा मौन हा एक सर्वोत्कृष्ट उपाय आहे. आमचे लोकनायक मौन स्वीकारून ज्या अर्थी या किंवा इतर सावळ्यागोंधळावर आधिकृत प्रकाश टाकण्याचे टाळीत आहेत त्याअर्थी त्यांची पूर्वीची निष्ठा डळमळीत होत चालली आहे काय, असा कोणी संशय घेतल्यास त्यात काय चूक आहे? आणि ही वादळे रा. ऑ. सर अकबर हैदरी यांच्या आगमनापूर्वी उठत असलेली पाहून विचारी मन अधिकच संशयात गुरफटत आहे. विचारवंतांना विचारविनिमय करण्यास कोणीच अडकाठी घालणार नाही व घालू नये. परंतु विचारांची दिशा जोपावेतो निश्चित स्वरूपात येणार नाही तोपावेतो मिथ्यावर सत्याची उभारणी करणेही बरोबर होणार नाही. आज राष्ट्राभिमान व देशाभिमान पाहिजे आहे, पण तो स्वाभिमानपूर्वक असेल तर तो हवा आहे, नाही तर 'तुम्ही आम्ही एक व कंठाळीशी मेख' असा प्रकार होऊ नये.

## स्वावलंबनाचा मार्ग

"जीवनार्थ कलह" हे सृष्टीचे आद्य तत्त्व असून भौतिक सुधारणा कितीही पुढे गेल्या तरी हा जीवन कलह थांबवून मनुष्याला निसर्गावर विजय मिळविता येईल ही कल्पनाच फोल आहे. जीवनार्थ कलह हा सृष्टीचा क्रम आहे हे मान्य करण्यास नाकारणे म्हणजे आपली जगण्याची लायकी नाही हे सिद्ध करणे आहे. संस्थानातील मुसलमान बांधवांचा हिंदूंना स्नेह संपादन करावयाचा असेल, व त्यांचेशी सहकार्य करून त्यांची व आपली उन्नती करून घ्यावयाची असेल तर सध्या जे अत्याचार घडत आहेत त्यांचा त्यांनी जाहीर निषेध करण्यास पुढे आले पाहिजे. जोपर्यंत तसे होत नाही तोपर्यंत अशांतता व अवनतीच्या खोल गर्तेतून वर येणे अशक्य आहे.

सारांश, कॉमन प्लॅटफॉर्म व शांतता कमिटी हवी आहे, पण या गोड शद्बांच्या आधारे उठविण्यात येत असलेल्या वादळात खऱ्या कार्यकर्त्यांनी व विचारी जनतेने स्वतःला गुरफटून न घेता स्वावलंबनाचा मार्गच आक्रमण करावा हे इष्ट आहे. आम्ही आमचे कर्तव्य जोपर्यंत नीटपणे पालन करणार नाही, तोपर्यंत आम्ही आमच्या हक्कांना पारखे राहाणारच आहोत. लोखंडाचे सोने बनवू शकतो, असे म्हणणाऱ्याच्या मागे जाणाऱ्याच्या पदरात ज्याप्रमाणे अज्ञान व निराशा पडलेली आढळते तद्वतच स्प्रिंगच्या कोचावर बसून शांतता, वैभव व हक्क मिळवून देतो असे भासविणाऱ्याच्या मागे जाण्याने आमच्या पदरात अज्ञान व निराशा पडणार आहे. तेव्हा ही वादळे जनतेची दिशाभूल करणारी आहेत हे निराळे सांगावयाचे प्रयोजन नाही.

**निजामविजय :** दि. २० जुल १९३७

# निजामशाहीत असा स्वातंत्र्याची गळचेपी

## शिक्षण परिषदेला बंदी

एप्रिल १५ व २२ च्या महाराष्ट्रात हैद्राबादेतील हिंदूंची संस्कृती बुडविण्याचा निजामाचे सरकार शिक्षणाचे द्वारे कसकसे प्रयत्न करीत आहे हे आम्ही विस्तारपूर्वक लिहिलेच आहे. परवापर्यंत आम्हांला अशी आशा वाटत होती की, संस्थानी सरकारकडून मनलज्जेस्तव नाही तर जनलज्जेस्तव निदान प्रजा शिक्षण परिषदेच्या अधिवेशनाला उशीरा का होईना परवानगी मिळेल. गेल्या आठवड्यात आलेल्या बातमीने ही आशा समूळ नष्ट केली आहे. पण त्याबरोबरच निजामसाहेबांच्या अधिकारी वर्गाकडून सत्तेच्या व धर्मवेडाच्या धुंदीत दिल्या जाणाऱ्या अन्यायी व बेजबाबदार हुकमांची प्रतिक्रिया तितक्याच बेजबाबदार पद्धतीने होणार की काय अशी शंका निर्माण केली आहे. वाघोबा म्हटले तरी खाणारच व वाघ्या म्हटले तरी खाणारच अशी ज्या वेळेस परिस्थिती निर्माण होते त्या वेळेस निसर्गतःच वाघ्या म्हणण्याची प्रवृत्ती प्रबल होते. यत्किंचित मांजरासारख्या प्राण्यालाही ज्या वेळेस पळून जाण्यासाठी मार्ग उरत नाही व मरण टाळण्यासाठी शक्यता उरत नाही तेव्हा ते प्रतिपक्षाच्या प्रबलतेचा विचार सोडून स्वप्राणाची आशा गुंडाळून तुटून पडतेच की नाही? हैद्राबादचा हिंदू समाज आज कितीही निःस्त्राण बनलेला असला तरी तो माणसांचाच असल्यामुळे चळवळीचे सर्व मार्ग बंद केले असून ते उघडण्याची आशा नाही असे खात्रीपूर्वक त्याला पटल्यानंतर, मरावयाचे हे निश्चित आहे तेव्हा अशा प्रकारे झिजत काल कंठण्यापेक्षा दोन हात करून का मरू नये? असा

विचार त्याने करणे सृष्टिनियमाला धरूनच होणार आहे. आता निराशेच्या पोटी जन्माला येणारी ही प्रखर कर्तव्य जागृती भावनाप्रधान तरुणांचा कल कोणच्या आडमार्गाकडे झुकवील याचा नेम नाही.

## ही परवानगी की तिची थट्टा

वर उल्लेखिलेली महत्त्वाची घटना म्हणजे निजाम सरकारचे मुख्य दिवाण यांच्या आज्ञेवरून पोलीस खात्याच्या मुख्याकडून औरंगाबाद येथे भरणाऱ्या प्रजा शिक्षण परिषदेसंबंधी, औरंगाबादच्या कलेक्टरसाहेबांना पाठविलेले पत्र होय. जाहीर सभेसंबंधी परवानगी देण्याचा आधिकार आमच्या संस्थानी नियमाप्रमाणे कलेक्टर यांच्याकडे, जिल्ह्याचे पोलीस खात्याचे मुख्य आधिकारी या नात्याने दिलेला आहे. प्रजा शिक्षण परिषदेची दोन आधिवेशने, खुद्द राजधानीच्या शहरी पार पडली असता व तिसरे आधि-वेशन औरंगाबादेस भरविण्याची परवानगी मागितली असता औरंगाबादच्या कलेक्टरसाहेबांना तीतून राजकारणाचा वास यावा हेच अगोदर आश्चर्य आहे. पण या नियमांचा उद्देश प्रजेच्या प्रत्येक न्याय्य चळवळीला पायबंद घालण्याचाच आहे हे कटु सत्य लक्षात घेतल्यास राजकारणाच्या नावाखाली प्रजा शिक्षण परिषदेला जी प्रथम परवानगी दिली गेली नाही, त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारणच उरत नाही. कलेक्टरसाहेबांनी आपल्या वरिष्ठां-कडे परिषदेच्या परवानगीचे प्रकरण पोलीस खात्याच्या कर्तव्यानुरूप रंगवून पाठवल्याला एक वर्षापेक्षा आधिक काळ लोटला आहे. यापेक्षा या प्रकर-णाचा निकाल देण्यास अधिक वेळ घेण्यास लाज वाटूनच की काय (पण येथे लाजलज्जेचा प्रश्नच उरत नाही. कोणाच्याही कामाला अक्षम्य उशीर लावणे हेच आमच्या राजवटीचे वैशिष्ट्य आहे.) पोलीसखात्याच्या प्रमुखा-कडून मुख्य दिवाणसाहेबांच्या सहीचा त्यावर शिक्कामोर्तब होऊन, (१) परिषदेच्या चालकाकडून जामीन घ्यावा, (२) परिषदेचे क्षेत्र एकाच वर्गासाठी मर्यादित असू नये व (३) परिषदेच्या अध्यक्षाची निवड सर-कारच्या मंजुरीनंतर केली जावी. या तीन अटीवर परिषद भरविण्याची परवानगी देण्याकरिता कलेक्टरला लिहिण्यात आले. आणि परिषदेच्याच बगलबच्चाकडून परिषदेला परवानगी मिळाल्याची गुप्त बातमी पसरवण्याचा प्रयत्न केला आहे.

## या अटी मान्य कशा होणार ?

कोणीही स्वाभीमानी मनुष्य, सारासार विचारच ज्याने सोडला आहे व जे सर्वस्वी शेकडा ८० वर निरक्षर असलेल्या हडेलहप्पी पोलिसांच्या खात्याच्या हातातील कळसूत्री बाहुले आहेत, अशा सरकारवर विश्वासून वरील अटी मान्य करू शकेल काय? प्रजा शिक्षण परिषदेला परवानगी देणे म्हणजे शिक्षणाच्या नावाखाली आपण गुपचूप चालविलेले इस्लामी संस्कृतीच्या प्रसाराचे कार्य उजेडात आणण्यास परवानगी देणेच असल्यामुळे निजामसाहेबांच्या सरकारला ते इष्ट वाटत नसल्यास नवल नाही. पण शिक्षण परिषदेला परवानगी नाकारण्याचे धैर्य होत नाही त्यामुळे वरील-प्रमाणे अटी घालून परवानगी दिल्याचे श्रेयही उपटण्याचा मुत्सद्देगिरीचा नवा डाव टाकण्यात आला आहे. सरकारने पुढे केलेल्या अटी मान्य करावयाच्या म्हणजे कसायाच्या हाती गाय देण्यासारखे तर आहेच पण तेवढे करूनही परिषदेच्या मुख्य हेतूला हरताळ फासला जावयाचा काही टाळता यावयाचा नाही. परिषदेचा चालक वर्ग या अपमानास्पद अटी मान्य करू शकत नाही ही गोष्ट लक्षात घेऊनच सरकारने हा नवा डाव टाकला आहे असे म्हणावयास काहीच हरकत नाही. आम्ही परवानगी नाकारली नाही, असे म्हणावयास आमचे सरकार पुन्हा मोकळे ते मोकळेच.

## भडका उडाल्याशिवाय राहाणार नाही

प्रजा शिक्षण परिषदेची अशा प्रकारे धुळधाण उडविण्यात सरकारला आज जरी तात्पुरते यश आल्यासारखे वाटत असले तरी, त्याचा परिणाम मात्र आज ना उद्या सरकारला धडकी भरविण्यासारखा भयंकर झाल्याशिवाय राहणार नाही. निजामसाहेबांचे सरकार आमची संस्कृती नष्ट करण्याचा शिक्षणाद्वारे प्रयत्न करीत आहे, हा संस्थानातील शेकडा ८०–८५ असलेल्या हिंदूंच्या अंतःकरणातील संशय सरकारच्या लपंडावाने कमी होण्याऐवजी बळावणाराच आहे. संस्थानातील हिंदु समाज निरानिराळ्या जुलमांच्या जोखडाखाली दबलेला आहे. त्यांच्यात संघटन नाही. बाहेरून मदत मिळण्याची आशा नाही व त्यामुळेच त्याजकडून प्रतिकार होण्याची शक्यता नाही. या गोष्टी खऱ्या असल्या तरी “कीं तोडीला तरू फुटे आणखी

भराने", या सृष्टीच्या त्रिकालाबाधित नियमाप्रमाणे संस्कृतीच्या नाशाचे दुःखाने भरलेली तरुणांची अंतःकरणे वाणीच्या द्वारे रिकामी न होऊ शकल्यास त्यांच्या मेंदूची साम्यावस्था ढळल्याखेरीज राहाणार नाही? आणि एक वेळ तरुणांच्या अंतःकरणात निराशेच्या भावनेने पेट घेतला की, त्याची प्रखर आंच सरकारच्या नियमापलीकडे बरीच दूरवर गेल्याशिवाय राहणे शक्य नाही. पेटलेला वडवानल ज्याप्रमाणे वारा वाहील तिकडे भडकत जातो त्याचप्रमाणे भडकलेला तरुण वर्ग मिळेल ती वाट धरणे अगदी साहजिकच आहे. समाजाच्या आजच्या बाह्य औदासीन्यावरून वरील गोष्टी कोणी अशक्य म्हणून दुर्लक्ष करण्यायोग्य ठरवील तर ती मोठीच चूक होणारी आहे. बाह्य देखावा कल्पना करण्यास काहीही अवसर देवो नभोमंडळातील वातावरण त्वेष, द्वेष, सूड इत्यादी क्रूर भावनांनी भरण्यास आपल्या परीने मदतच करीत आहे यात संशय नाही. या भावना कोणाच्या मेंदूत कोण्यावेळी घुसवून भडका उडवतील हे सांगणे कठीण आहे.

### स्वस्थ बसण्याचे दुष्परिणाम

आमच्या संस्थानात कोणच्याही चळवळीला अवसर नसल्यामुळे समाज अगदीच विस्कळीत स्थितीत आहे. जेथे समाजातलि लहानसा वर्गही संघटित होण्याची शक्यता नाही, तेथे पुढाऱ्यांचे आस्तित्व संभवत नाही. हैद्राबाद संस्थानात हिंदूंची संख्या एक सव्वा कोटी असून कमीतकमी एक हजार अनुयायी असणारा पुढारी आढळत नाही. अर्थात हा दोष सर्वस्वी पुढाऱ्यांचाच आहे असे नाही. तेव्हा या अशा स्थितीत चालू परिस्थितीचा उत्तम प्रकारे अभ्यास करून तिच्यातून निघणाऱ्या इष्टानिष्ट भविष्यकाळाची अचूक कल्पना करून इष्ट वातावरण आनिष्ट घडविण्याच्या दृष्टीने तिच्यात बदल करण्याचा प्रयत्न करण्याची जबाबदारी पुढाऱ्यांच्या अभावी व सरकारच्या अविचारीपणामुळे समाजातील विचारी नागरिकांवर विभागली जाणे अपरिहार्य आहे. संस्थानी तरुण वर्ग अविचारी बनला तर आपले काही करू शकणार नाही अशी सत्ताधारी, सत्ताधीश मदांधांना घमेंड वाटायाचीच. पण म्हणून शांतताप्रिय विचारी नागरिकांनी सरकारप्रमाणे सध्याच्या परिस्थितीत तेल ओतणे तर दूरच पण नुसते स्वस्थ बसूनही परिस्थितीचा प्रसार होण्यास अवसर देणे त्याच्या स्वतःच्या हिताच्या दृष्टीने

अत्यंत धोक्याचे आहे. कोणत्याही प्रकारच्या चळवळीला अप्रत्यक्षपणे अडथळे आणून सरकार तरुणांच्या द्वेषांचे जसे स्थान बनणार, तसेच किंबहुना अधिक महत्त्वाचे स्थान समाजातील विचारी नागरिकिही बनणे संभवनीय आहे. तरुणांच्या भावनेच्या भरारीबरोबर विचारी नागरिकाला धावणे शक्यच होणारे नसल्यामुळे व त्यामुळे तरुण वर्ग आपला व्यवहार सरकारप्रमाणे विचारी नागरिकांना न कळू शकेल अशा मार्गाने करण्याची शक्यता असल्यामुळे, तसेच विचारी नागरिकांनीही तरुणांच्या आविचाराला सहाय्य करणे तर दूरच पण अवरोध केला तरीही आविचारी तरुणाप्रमाणेच आविचारी सरकारच्या रोषालाही बळी पडणे त्याला अपरिहार्य होणार आहे. एकंदरित आज विचारी नागरिकांनी आपली जबाबदारी न ओळखणे म्हणजे घरात आणि दारात निष्कारण अनेक शत्रू निर्माण करून काही न करता स्वतःवर अनेक प्रकारची संकटे ओढवून घेणेच आहे.

## कायदेभंग करणे जरूर

भविष्यकाळात निर्माण होऊ पहाणाऱ्या दुधारी परिस्थितीतून सुटका करून घेण्याचा विचारी नागरिकांना आज फक्त एकच एक मार्ग मोकळा आहे. आणि तो म्हणजे कायदेभंगाची चळवळ संस्थानात सुरू करून तरुणांना आपल्या उन्नतीसाठी करावयाच्या धडाडीला अवसर निर्माण करून देणे हा होय. सरकारी जुलमाचा ओघ हव्या त्या भल्या बुऱ्या मार्गाने आज वाहू लागला असल्याने व त्याची दृष्टी हिंदूंच्या संस्कृतींवरच खिळलेली स्पष्ट दिसत असल्यामुळे संस्थानातील हिंदू तरुण यापुढे आपल्या हृदयस्थ प्रिय भावना दिवसाढवळ्या दुखवल्याचे निर्लज्जपणे पाहात काळ कंठीत राहणे शक्य नाही. सरकारच्या अरेरावीमुळे उद्दीपित होणाऱ्या त्याच्या कर्तृत्व-शक्तीचा ओघ कायदेभंगासारख्या शांततेच्या मार्गाकडे वळवला जाणे आज अत्यंत अवश्य आहे. केवळ स्वार्थापायी ज्यांच्या विचारांचे दिवाळे निघाले आहे अशा खुशालचेंडूंना कायदेभंगाचा मार्गही अत्यंत भयंकर असा भासणारच. पण यापेक्षा कमी भयंकर असा मार्ग पुढे येईपर्यंत हाच अनु-सरणे भाग आहे. ब्रिटिश सरकारच्या प्रत्यक्ष आसनाला धक्का बसणार नाही या मर्यादेपर्यंत सरकारने आपली बाजू सुरक्षित ठेवून लोकांच्या कर्तृत्वाला वाव दिल्यास सरकारचे आज काहीच बिघडत नाही. संस्थानातील

कायद्याने वरील मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्याला शासन करण्याचे सामर्थ्य आजही दिलेले आहे. पण सवलतींचा फायदा न देता सर्व समाजाच्या हालचालीवर विशिष्ट हेतूने निर्बंध घालणे हे निःसंशय लोकक्षोभाला कारण होणारे आहे. संस्थानातील न्यायखाते नावापुरतेच अमलबजावणी करणाऱ्या खात्यापासून निराळे असून, त्याचा प्रजेला न्याय्य हक्काच्या संरक्षणाच्या दृष्टीने काडीइतकाही फायदा नाही. यामुळेच निर्भीडपणे सरकाच्या चुका दाखविणे व सरकारला वाईट वाटले तरी आपली बाजू मांडण्यास आरोपीला अवसर मिळणे या गोष्टी संस्थानात दिसत नाहीत. हा मार्ग मोकळा असता तर समाजातील स्वार्थत्यागी कर्तृत्ववान माणसावर कायदेभंगाच्या चळवळीने एकदम येणाऱ्या मोठ्या संकटापेक्षा कमी संकटे आली असती ही गोष्ट खरी आहे. पण संकटाचा मार्गच सरकारने बंद केलेला असल्यामुळे व फाजील संकटे ओढवून घेणे चुकीचे असल्यामुळे कायदेभंगाचा मध्यम मार्गच आज स्वीकारणे योग्य आहे.

## चळवळ यशस्वी होईल काय ?

चळवळीचा ओनामाही गिरविलेला नाही अशा समाजाने एकदम कायदेभंगासारख्या चळवळीला हात घालणे व त्यातही या चळवळीला ब्रिटिश इंडियात अपयश आल्याचे उदाहरण ताजे असता कितपत योग्य व सुपरिणामी होणार याबद्दल अनेक विचारी माणसांना शंका वाटण्याचा संभव आहे. ब्रिटिश इंडियातील कायदेभंगाची चळवळ अयशस्वी ठरली म्हणून आमचे येथेही ती अयशस्वी ठरेलच असे म्हणण्यात फारसा अर्थ नाही. ब्रिटिश इंडियातील चळवळ अयशस्वी का झाली याची कारणे विचारात घेतली गेल्यास व चळवळीची दिशा ब्रिटिश इंडियातील चळवळीच्या अगदी तंतोतंत धरतीवर न नेता परिस्थितीनुरूप त्यात फरक केला गेल्यास चळवळ पूर्णपणे यशस्वी न झाली तरी दुःखाचा उसासा टाळण्याची शक्यता निर्माण होण्याइतका आजच्या परिस्थितीत बदल हा खात्रीने होईलच. चळवळीच्या प्रणेत्यांनी लोकमताला जबाबदार राहील अशा संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी आज करावयास जशी हरकत नाही, तशीच ती संपूर्णतः आज प्राप्त न झाल्यास चळवळ अयशस्वी झाली असे समजण्याचेही कारण नाही.

अगदी आरंभाला कायदेभंगासारखी चळवळ झेपेल की नाही अशी शंका उत्पन्न होणे शक्य असले तरी ती झेपणारच नाही अशी निश्चित कल्पना करावयास आज काही आधार आहे असेही नाही. आज मुख्य प्रश्न चळवळ कोणची करावयाची हा नसून तरुणांच्या कर्तृत्वाला आडमार्गापासून परावृत्त करून योग्य वळण देण्याचा आहे. कायदेभंगापेक्षा कमी कठीण असणारे सर्व चळवळीचे मार्ग आज बंद असल्यामुळे या चळवळीला हात घालण्याशिवाय दुसरे काही करण्याची शक्यता नाही. तेव्हा अशा स्थितीत हैद्राबादचा हिंदू समाज पुढे काय करणार ?

**महाराष्ट्र : दि. ९ सप्टेंबर १९३७**

# निजाम, समाज आणि राजकीय सुधारणा

## हितैक्य की हित विरोध ?

आमच्या संस्थानचा राज्यकारभार लोकमतानुवर्ती असावा अशी प्रामाणिक इच्छा असल्यास लोकांना भाषण लेखनादी प्राथमिक मूलभूत हक्क प्रथम दिले जाणे किती आवश्यक आहे, त्याखेरीज दिलेल्या सुधारणा कशा निरुपयोगी ठरणार आहेत, याचे दिग्दर्शन आम्ही अनेकदा केले आहे. आमच्या दयाळू आला हजरतांची व मुख्यमंत्री राईट ऑनरेबल सर अकबर हैदरीसाहेब यांची सदिच्छा, सरकार आणि समाज यांचे हितैक्य करण्याची असल्याचे आता स्पष्ट झाले आहे. अर्थातच यावरून सद्यःस्थितीत सरकार आणि समाज यांच्या हितात विरोध आहे असाही कित्येकजण निष्कर्ष काढण्याचा संभव आहे. आमच्या मते असा निष्कर्ष काढणे वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे होईल. आमच्या सरकारने "प्रजेचे कल्याण", हेच स्वतःचे हित मानले असल्याबद्दल अनेक पुरावे दाखविता येतील व प्रजेने आपली अढळ राजनिष्ठा व्यक्त केल्याचे दाखलेही अगणित आहेत. तेव्हा मग प्रश्न असा उत्पन्न होतो की राजा आणि प्रजा किंवा सरकार आणि समाज यांच्या हितात विरोधच नाही तर ऐक्य निर्माण करण्याचा प्रश्न कोठे उत्पन्न होतो ? सरसाहेबांचे भाषण ज्यांनी काळजीपूर्वक वाचले असेल त्यांना त्यांचे "मोर इफेक्टिव्ह असोसिएशन" या शद्बांवरून ही गोष्ट कळली असेल की, आमच्या सरकारच्या व समाजाच्या हितात तत्त्वशः ऐक्य आहे पण व्यवहारात त्याचा परिणाम चटकन दिसण्यासारखा नाही. किंवा कित्येक वेळा मुळातलि सदिच्छेचा विपर्यास करणारा दिसत आहे. आणि म्हणूनच तत्त्वशः

व कागदोपत्री असलेले हितैक्य प्रत्यक्ष व्यवहारात अधिक परिणामकारक कसे होईल यासंबंधी सूचना करण्यासाठी "आयंगार" कमिटीची स्थापना करण्यात आली आहे. आमच्या सरकारचा दृष्टिकोण, आमच्या सरकारचे धोरण, जातीय (कम्युनल) नाही. आमच्या सरकारला सर्व धर्म-पंथांची प्रजा सारखीच प्रिय आहे व असे असताना प्रत्यक्षात ज्या काही गोष्टी सरकारी धोरणाच्या किंवा हिताच्या विरुद्ध दिसत आहेत त्या काही अंशी अधिकाऱ्यांच्या अदूरदर्शीपणामुळे किंवा चुकीमुळे घडलेल्या आहेत व त्याचे निराकरण हळूहळू होतही आहे. शहाणे लोक आपल्या पूर्वजांना किंवा वाडवडलांना कधीही दोष देत नाहीत. उलट, "त्यांनी आपल्या काळात आपल्या सामर्थ्यानुरूप योग्य असेच केले", असे आदरार्थी उद्‌गार काढून, "आता काळ बदलला असल्यामुळे आपण बदलणे जरूर आहे" असे सांगून नव्या सुधारणा घडवून आणतात. समाजाच्या नेत्यांनीही गतकालातील घडलेल्या बऱ्या–वाईट गोष्टीची प्रेते उकरीत न बसता शाहाण्या व दूरदर्शी लोकांना सुधारणा घडवून आणण्याच्या कामी शक्यतो अधिक साहाय्य देणेच शहाणपणाचे होय.

## संशय पिशाचाने पछाडले

टाळी कधी एका हाताने वाजत नाही व भांडणही कधी एकट्याचे नसते. आमच्या समाजात आज असा एक बहुसंख्य वर्ग आहे की, ज्याची सरकारच्या धोरणासंबंधी साशंक वृत्ती आहे व सरकारचीही त्या वर्गासंबंधी तशीच आहे. सरकारचा वरिष्ठ अधिकारीवर्गाचा व समाजातील वरिष्ठ नेत्यांचा वर्ग यांच्यात संशयी वृत्ती नाही व संपूर्ण हितैक्य आहे याबद्दल आम्हांला संशय नाही. पण सरकारचा बहुसंख्य अधिकारी व नोकर वर्ग आणि बहुसंख्य समाज यांच्यावर साशंकतेने आपला फार मोठा पगडा बसविला आहे ही वस्तुस्थिती अत्यंत घातुक आहे यात संशय नाही. पण दुर्गुणाकडे झाल्यास त्यांची वाढ अत्यंत वेगाने होऊन तितक्या प्रमाणात अधिक दुष्परिणाम भोगावे लागतात. त्यात संशय पिशाच हे असे चमत्कारिक आहे की, त्याच्या झापडीत एखादा मनुष्य सापडला की, त्याची स्वतंत्र दृष्टी नाहीशी होतेच होते. दुर्दैवाने आमचा बहुसंख्य अधिकारी वर्ग व समाज आज याच पिशाचाने पछाडलेला आहे आणि त्याचे उच्चाटन

करणे हे समाजातील नेत्यांचे, तसेच सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचे आद्य कर्तव्य आहे. या संशय पिशाचाचे मूळ कोठे आहे याचा आपण शोध करीत चाललो तर ते गुप्त असे सापडेल किंवा गुप्त खात्यात 'सिगे राज' मध्ये असल्याचे आपल्याला आढळून येईल. राजकारणात व राज्यकारभारात गुप्त खात्याचे स्थान फार महत्त्वाचे आहे हे आम्हांला मान्य आहे. पण गुप्त खात्यात कोणत्या गोष्टी असाव्यात आणि कोणत्या नसाव्यात याबद्दल मात्र तीव्र मतभेद आहेत. मौल्यवान वस्तूंच्या सुरक्षिततेसाठी लोखंडी मजबूत व अवजड तिजोरी ठेवणाराला कोणीच दोष देणार नाही. पण त्या तिजोरीत हर घडी उपयोगी पडणारी वस्तू कोणी कवडीचुंबक ठेवू लागेल तर बाहेरच्या लोकांच्या उपहासाला तो तर पात्र होईलच, पण घरच्या लोकांच्या द्वेषाला व संशयालाही तो बळी पडल्याशिवाय राहाणे शक्य नाही. "आम्ही करू तेच खरे" या कोत्या समजुतीमुळे राज्यकारभार हाकणाऱ्या सामान्य अधिकारी वर्गात व बहुजन समाजात संशयाची एक भली मोठी भिंत निर्माण झाली आहे.

समाज व सरकार यांच्यातील हा पडदा दूर करण्याचे कार्य बराच काळ दुर्लक्षिले गेल्यामुळे सरकारी सामान्य अधिकारी व नोकर वर्गाची व बहुजन समाजाची मते परस्परांसंबंधी साशंक बनलेली आहेत व त्याचमुळे आमच्या संस्थानात एक प्रकारचे भयग्रस्त वातावरण पसरलेले आहे.

आमच्या संस्थानात या क्षणापर्यंत "सामाजिक जीवन" हे सार्थ नाव ज्याला देता येईल त्याचा आरंभच अद्याप झालेला नाही. शेजारच्या श्रीमंताच्या मुलाने गळ्यात सोन्याची सरी घातलेली पाहून भिकाऱ्याच्या मुलाला त्याचे अनुकरण करण्याचा मोह होणे निसर्गाला धरून आहे. दारिद्र्यामुळे सोन्याच्या सरीऐवजी दोरीवरच तो काम भागवून घेत असताना आपल्याला दिसतो. अगदी याच उदाहरणाप्रमाणे सार्वजनिक संस्थांच्या सोन्याच्या सऱ्यांची तहान आम्ही गळ्यात दोऱ्या बांधून आज भागवीत आहोत. आमच्या सार्वजनिक संस्थांना भिकाऱ्याच्या मुलाच्या गळ्याच्या दोरीच्या सरापेक्षा अधिक किंमत मुळीच नाही. सोन्याचा रंग पिवळा असतो म्हणून आम्ही आमच्या गळ्यातील दोऱ्या हळदीच्या पाण्यात भिजवून पिवळ्या केलेल्या आहेत. केवळ पदवी, श्रीमंती, मोठेपणाची हाव व

गुलहौस भागविण्यासाठी केलेली लटपट यांच्या मदाने धुंद झालेल्या डोळ्यांना काही ओळखू येत नाही. असो. सार्वजनिक संस्था व सामान्य कार्यकर्ते यांच्यासंबंधी सरकारी कागदपत्रांत यदाकदाचित "भयंकर, महा भयंकर" अशी वर्णने केली गेलेली असल्यास ते लोक सरकारी अधिकाऱ्यांच्या रोषाला पात्र होताना आढळतात. मनुष्य स्वभाव असा आहे की, खात्री असली तरी एकच गोष्ट दहा वेळा ऐकल्यानंतर, तिच्यात काही तरी सत्य असेल असा त्याला निदान संशय तरी येतोच. या नियमाला वरिष्ठ अधिकारी वर्ग, तसाच समाजही अपवाद असू शकत नाही.

## 'डेंजरस'चा तांबडा छाप

सरकार आणि समाज यांची मते परस्परांच्या सद्हेतूसंबंधी साशंक असताना प्रत्येक चांगल्या गोष्टीचा प्रत्येक पक्षाकडून विपर्यास केला जाणे शक्य आहे. तेव्हा या संशय पिशाचाच्या बाधेपासून सरकार आणि समाज यांची मुक्तता होणे जरूर आहे. आमची अशी खात्री आहे की, सरकारी अधिकारी जर आपली अंतःकरणे जनतेला उकलून दाखविण्याचे व कार्यकर्त्यांशी खुल्या दिलाने विचार विनिमय करण्याचे ठरवून बोलू लागतील तर काळ्या यादीतील नामावळीत मुळीच राम नाही हे स्पष्ट झाल्याशिवाय राहणार नाही. ही गोष्ट आम्हांसही मान्य आहे की, उल्कापात झाल्याप्रमाणे मधून मधून सरकारवर टीका केली जाते, पण त्याला तात्कालिक मनःसंतापापलीकडे काही किंमत असत नाही. समाजसेवेची नैसर्गिक आवड असलेल्या लोकांना मर्यादित का होईना कार्यक्षेत्र व स्वातंत्र्य मिळाल्यास आज ज्या मधून मधून त्यांच्या भावना क्षुब्ध होत असताना दिसतात त्या तशा होणार नाहीत व त्यांच्या हातून अनेक लोकसेवेची कार्ये पार पडतील. तेव्हा सरकारने सार्वजनिक कार्यकर्ता म्हटला की, त्याला 'डेंजरस'चा तांबडा छाप मारण्याची व माशा वोंघावत असलेल्या त्याच्या संस्थेवर, त्याच्या मित्रमंडळीवर व त्याच्यावर प्रसिद्ध क्रांतीकारकाप्रमाणे पाळत ठेवण्याची अनिष्ट प्रथा ताबडतोब बंद करून सरकारच्या देखरेखीखाली चालण्याच्या विधायक कार्याचे ओझे त्याच्यावर टाकण्याची किंवा त्याच्या कार्याला मदत करून व त्या निमित्ताने त्याच्यावर योग्य देखरेख ठेवण्याची नवी प्रथा सुरू करणे जरूर आहे. जिल्ह्यातील अधिकाऱ्यांनी आपल्या वरिष्ठांच्या वागणुकीचे

अनुकरण करण्यास प्रारंभ केला म्हणजे सरकारलाही हे कार्यकर्ते 'डेंजरस' नाहीत हे कळून येईल व जनतेलाही सरकार आपल्या कल्याणासाठीच खटपट करीत आहे हे प्रत्यक्ष अनुभवाने पटेल.

## सुधारणांचे स्वरूप व प्रतिनिधित्व

आगामी सुधारणांच्यासाठी उपरिनिर्दिष्ट अपरिहार्य गोष्टी प्रथम प्रचारात आणून योग्य ती भूमिका निर्माण करण्याची आज अत्यंत आवश्यकता आहे. आणि ती निर्माण केली तरच सुधारणांचा मार्ग सुकर होणार आहे. लोकशाहीच्या युगात मताधिकार व प्रतिनिधित्व या दोन फार महत्त्वाच्या गोष्टी आहेत. सरकार आणि समाजाचे हितैक्य साधण्यासाठी सरकार आणि समाज यांचे प्रतिनिधी एकत्र येणे व त्यांनी राज्यकारभार चालवणे जरूर आहे.

आम्हांला मिळणाऱ्या सुधारणांचे स्वरूप कसे आहे याची आज निश्चित कल्पना नसली तरी राज्यकारभार चालवण्याच्या कामी यापुढे जनतेच्या प्रतिनिधींचे साहाय्य व मत घेतले जाईल अशी कल्पना करणे मुळीच चूक होणार नाही.

मताधिकार हा संस्थानातील प्रत्येक सज्ञान रहिवाशाला दिला गेला पाहिजे. यावर कोणी म्हणतील की, अगदी सुरुवातीला इतक्या मोठ्या प्रमाणात मताधिकार देण्याची गरज नाही. पण यावर असेही उत्तर देता येईल की, सुरुवातच फार उशीरा होत असल्यामुळे मागच्या चुकीची भरपाई म्हणून आता बाकीसह सर्व देणे देऊन टाकावे हे उत्तम. हप्त्याहप्त्यांनी सुधारणा देण्याची प्रथा आमच्या स्वराज्यात रूढ करण्याची काही गरज नाही. प्रत्येक सज्ञान मनुष्याला मताधिकार दिला गेला म्हणजे प्रतिनिधी आपोआपच आपल्या मतदारांना सज्ञान, साक्षर व समाजहितैषी बनवण्याचा जोराने प्रयत्न करतील.

त्यात पुन्हा अनेक उमेदवारांत स्पर्धा निर्माण होऊन त्यामुळे लोकजागृतीचे कार्य दुप्पट वेगाने होईल.

मताधिकाराला श्रीमंतीची व साक्षरतेची बंधने घातली गेल्यास बहुसंख्य अज्ञान व गरीब समाज या राजकीय सुधारणांचा फायदा उचलू

शकणार नाही. शिवाय आम्हांला आता बाहेरच्या प्रांताबरोबर बसावयाचे असल्यामुळे मताधिकार हा सार्वजनिक होणे जरूर आहे, असे आम्हांला वाटते.

दुसरा अत्यंत वादग्रस्त प्रश्न प्रतिनिधित्वाचा आहे. या प्रश्नात आणखी बरेच किचकट उपप्रश्नही आहेत. त्यांपैकी आज फक्त "प्रतिनिधित्व हे जातीय तत्त्वावर दिले जावे की नाही" यासंबंधी आमचे मत देऊन बाकीचा विचार पुढील अंकी करू. ब्रिटिश इंडियात आज जातवार प्रतिनिधित्वाची पद्धत प्रचलित आहे. या पद्धतीने समाजातील अगोदरच्या भेदांना अधिक बळकटी येते म्हणून कॉंग्रेसने तिच्याविरुद्ध चळवळ चालविली आहे. अर्थात जी गोष्ट शेजारच्या प्रांतात अनिष्ट तीच येथेही अनिष्टच ठरणारी व म्हणून त्याज्य आहे हे स्पष्टच आहे. आमचे सरकारही जातीय प्रतिनिधित्वाच्या तत्त्वाच्या विरुद्धच आहे असे आमचे मत आहे. आणि आयंगार कमिटीही या तत्त्वानुरूप दुजोराच देणारी आहे असा आमचा तर्क आहे. पण संस्थानातील बहुसंख्य हिंदू समाज या गोष्टीला लवकर मान्यता देईल असे वाटत नाही. त्याचे कारण तो इतरांचे प्रमाणात निर्घृण आहे, अधिक निर्बल आहे. अधिक अज्ञानी बनला आहे हे आहे. तो तसा बनण्यास काय कारणे झाली हा प्रश्न निराळा. पण आज तो तसा आहे याबद्दल आम्हांलाही संशय नाही. निर्बल मनुष्य हा नेहमीच भित्रा व साशंक असतो, त्याचा आत्मविश्वास उडालेला असतो.

## जातीय-तत्त्वाला विरोध

संस्थानातील हिंदू समाजाची ही स्थिती आज अगदी तंतोतंत अशी आहे. आणि म्हणूनच तो जातीय तत्त्वावर प्रतिनिधित्व असावे असा आग्रह धरण्याचा संभव आहे, असे आम्हांला वाटते. आणि कदाचित एवढ्याच बाबीपुरता विचार केल्यास या मागणीत तथ्य सापडेलही बरेचसे. तथापि आम्ही मात्र, हिंदू समाजाची अडचण व भय विचारार्ह आहे असे आमचे मत असूनही, जातीय तत्त्वावर प्रतिनिधित्व देण्याच्या तत्त्वाचे विरोधकच आहोत. त्याचे कारण हेच की, एकदा जातीय तत्त्वाला मान्यता दिली की, हा विषवृक्ष आमच्या संस्थानच्या असंतोषाचा अग्नि भडकविल्याशिवाय

राहाणार नाही, अशी आमची प्रामाणिक समजूत आहे. हिंदू समाज आज सर्वच दृष्टींनी मागासलेला आहे. त्याला इतर समाजाशी स्पर्धेत टिकाव धरणे शक्य नाही, ही गोष्ट आम्हांस मान्य आहे. पण त्यासाठी जातीय तत्त्वाचा त्याने आग्रह धरण्याऐवजी निवडणुकीत संयुक्त तत्त्वावर भाग घ्यावा व जर त्याला निदान ५० टक्के जागा मिळविता न आल्या तर, कमी पडलेल्या जागा भरून काढण्यासाठी सरकारने आपल्या नॉमिनेशनच्या अधिकाराने त्याला मदत करण्याची हमी द्यावी, असे आमचे मत आहे. आमच्या मते हिंदू समाजाची सार्थ भीती दूर करण्याचा हाच एक रामबाण उपाय आहे. आणि त्याच्या अवलंबनाने त्याची भीती दूर होऊन तो संयुक्त प्रतिनिधित्वाच्या तत्त्वाला मान्यता देईल अशी आम्हांला उमेद आहे.

**निजामविजय** : दि. १९ ऑक्टोबर १९३७

# हिंदू पुढाऱ्यांची जबाबदारी

## पुढारी म्हणून मिरवण्याची हौस

हैद्राबाद येथील हिंदू स्टँडिंग कमेटीने गेल्या ता. १९ जानेवारीला हैद्राबाद सरकारकडे सादर केलेले पत्रक आजच्या अंकी आम्ही निजामविजयावरून इतरत्र उद्धृत केले आहे. हैद्राबादेतील उर्दू पत्रावरून असे कळते की, हे पत्रक प्रथम मद्रासच्या 'हिंदू'मे उजेडात आणले व त्यावरून डेक्कन न्यूज एजन्सीने हैद्राबादेतील पत्रांना त्याचा सविस्तर सारांश पुरवला. हैद्राबादेतील उर्दू पत्रांनी या पत्रकाचा राईचा पर्वत केल्यानंतर निजामविजयकारांनी ते आपल्या ८ तारखेच्या अंकात संपूर्णतः भाषांतर करून प्रसिद्ध केले आहे. निजामविजयकारांना या पत्रकाची बातमी उर्दू पत्रावरून मिळाली असावी व नंतर त्यांनी मूळ प्रत संपादन करून प्रसिद्ध केली असावी असा तर्क करणे एकंदर दृश्य पुराव्यावरून फारसे चूक ठरणार नाही. तर मग प्रश्न असा उत्पन्न होतो की, हिंदू स्टँडिंग कमेटीने ताकाची भीक मागावयास जाताना भांडे पदरा आड लपवण्याचा जो प्रयत्न केला तो काय म्हणून ?

हैद्राबाद हिंदू स्टँडिंग कमेटीने संस्थानातील एक कोटीहून अधिक असलेल्या हिंदू प्रजेला, स्वतःच्या कर्तबगारीची जाणीव करून द्यावयास नको काय? जर असे करणे तिचे कर्तव्य असेल तर ते तिने या खेपेला किंवा पूर्वीही का बजावले नसावे असा साहाजिकच प्रश्न उत्पन्न होतो. हैद्राबाद सरकारची नेहमी अशी इच्छा असते की, कोणच्याही संस्थेने समाजात जागृती निर्माण होईल अशी चळवळ मुळीच करू नये. सरकारी

अधिकाऱ्याची मर्जी पाहून चळवळ करावी अशा विचाराचे दडपण हिंदू स्टँडिंग कमेटीवर असल्यामुळे ती आपली पत्रके आपणहून प्रसिद्ध करण्याचे धाडस, अधिकाऱ्याच्या रोषाच्या भीतीने, करीत नसावी असे स्पष्ट अनुमान यावरून करावयास हरकत दिसत नाही. उर्दू पत्रांनी या कमेटीची पत्रके उजेडात आणून त्याविरुद्ध केवढीही आरडाओरड केली तर ती हैद्राबाद सरकारला मानवते व म्हणून हिंदू स्टँडिंग कमेटीलाही परवडते. सारांश, हैद्राबादेतील सर्व उलट्या व्यवहाराला अनुसरून हिंदू स्टँडिंग कमेटीने आपल्या पत्रकाच्या प्रचाराचे कार्य मुसलमान समाज व त्यांची पत्रे यांवर सोपवून प्रपोगंडा केल्याचे पाप टाळण्याचा हा उपक्रम स्वीकारला आहे हे स्पष्ट आहे. पण या उपक्रमात खरोखर दूरदर्शित्व आहे काय?

हैद्राबादेतील हिंदू समाजाची दिवसेंदिवस किती शोचनीय स्थिती होत चालली आहे यासंबंधी कमेटीने केलेल्या विधानाशी आम्ही पूर्ण सहमत आहो. पण ती थांबविण्यासाठी कमिटी जे प्रयत्न करीत आहे ते अत्यंत चुकीचे व हिंदू समाजाच्या मनात फोल आशा उत्पन्न करून त्याला अधिक संकटात टाकणारे आहेत असे आमचे स्पष्ट मत आहे. आणि म्हणून आमची हिंदूंच्या या पुढाऱ्यांना अशी सूचना आहे की जर त्यांना हिंदूंचा लढा खरोखरच लढविण्याची इच्छा असेल तर त्यांनी छातीठोकपणे पुढे यावे. ज्यांना सरकारी अधिकाऱ्यांचा कल व स्वतःच्या व्यवसायातून फुरसत पाहून चळवळ करावयाची असेल, ज्यांच्यात विरुद्ध पक्षाला उघड सामना देण्याचे सामर्थ्य नसेल, ज्यांना हिंदू समाजात लोकजागृती करण्याचे कार्य मुसलमान समाजावर सोपवून हिंदूंचे पुढारी म्हणून मिरवायचे असेल व प्रसंग आला तर सरकारच्या गटात सामील व्हावयाचे असेल त्यांनी हिंदू समाजावर दया करावी व त्याला अधिक खोल खड्ड्यात उतरवू नये अशी आमची त्यांना कळकळीची प्रार्थना आहे.

## बहुसंख्य प्रजेचा प्रश्न

हैद्राबादेतील परिस्थिती प्रतिदिवशी बिकट होत चालली आहे. बहुजन-समाजाच्या यातना प्रत्यही वाढत आहेत त्यावर उपाय, संस्थानातील प्रजेला प्रथम मनुष्य म्हणून, नागरिक म्हणून जगण्यास शिकविणे व जगण्याची

शक्यता निर्माण करून देणे हाच एक आहे. येथील बहुसंख्य लोकांना तोंड असून बोलता येत नाही, कान असून ऐकता येत नाही, शिक्षित असून शिकवता येत नाही, त्यांच्यासाठी नौकऱ्या मिळविण्याचा प्रयत्न करणे म्हणजे कालाचा व थोड्याफार शिल्लक असलेल्या शक्तीचा नुसता अपव्यय करणे आहे. हिंदू स्टँडिंग कमेटीला आपल्या सामर्थ्याची पूर्ण जाणीव आहे काय? बहुसंख्य प्रजेचा लढा हिंदुत्वाच्या आधाराने लढविण्याची तिच्यात शक्ती नाही. मग उगाच फोल डोलारा उभा करून लोकांची दुःखे वाढवण्यात काय अर्थ आहे? त्यापेक्षा कमिटी आपली शक्ती प्रजेला नागरिकत्वाचे हक्क संपादन करून देण्यासाठी खर्च करील तर फार बरे होईल. हैद्राबादेतील बहुसंख्य प्रजेचा प्रश्न "हिंदू म्हणून जगावयाचे की मुसलमान म्हणून?" हा नसून तो आज "मनुष्य म्हणून जगावयाचे की पशू म्हणून?" हा आहे. जेथे माणुसकीला पारखे होण्याचा प्रसंग, तेथे जातिधर्माच्या प्रश्नाला कसले महत्त्व आहे? जर आमची माणुसकी शिल्लक राहणार नसेल तर त्या धर्माला आणि त्याच्या नावावर येणाऱ्या नोकऱ्यांना काय करावयाचे आहे?

## माणुसकी दाखविली नाही

होपला वगैरे ठिकाणी घडलेल्या प्रकारांचे ज्या हिंदू स्टँडिंग कमेटीने आपल्या पत्रकात दाखले दिले आहेत तेथे तिच्या एखाद्या सभासदाने नुसते जाऊन, विचारपूस करण्याची तरी माणुसकी दाखविली आहे काय? ८२ हजार चौरस मैलाच्या विस्तीर्ण प्रदेशात इतस्ततः पसरलेल्या एक कोटीहून अधिक हिंदू समाजाची आज काय परिस्थिती आहे याची नुसती माहिती घेण्याची माणुसकी कमिटीने सांभाळली आहे काय? जर या साध्या माणुसकीच्या कर्तव्याचे पालन करणे कमिटीला शक्य होत नसेल तर तिने निःस्त्राण बनलेल्या हिंदूंच्या जातीय भावना जागृत करून त्यांची शक्ती अनाठायी खर्च होण्यास तरी प्रत्यक्षाप्रत्यक्ष कारण होऊ नये यात शहाणपणा आहे. हैद्राबादेतील हिंदू समाजाचे पुढारीपण म्हणजे सुळावरची पोळी आहे, काटेरी मुगुट आहे. हिंदू समाजाचे तारू आज वादळात सापडलेले आहे. हिंदूचे म्हणून काम करणारांवर आज मोठी जबाबदारी आहे ती ते ओळखून समयोचित कार्यपद्धती आखतील काय?

## राजकीय चळवळीची गरज

हैद्राबादेतील हिंदू समाज आज अशा काही चमत्कारिक पकडीत पकडला गेला आहे की, त्याने आपल्या उन्नतीसाठी शैक्षणिक, धार्मिक, सामाजिक, आर्थिक अशी कोणचीही चळवळ केली की, तिच्यावर "जातीय" व "राजकीय" हे छापे मारले जातातच. या दोन्हीं छापांतून सुटून कसलीच चळवळ करणे आज शक्य नाही. जातीय चळवळींना सरकार आणि मुसलमान समाज या दोघांना तोंड देणे अपरिहार्य आहे. राजकीय चळवळीला फक्त सरकारशीच झगडा केल्याने भागणारे आहे. दुसरी गोष्ट ही की, हिंदूंच्या आजच्या परिस्थितीचे कारण सरकारच्याच धोरणात आहे. तेव्हा हैद्राबाद संस्थानात आज राजकीय चळवळच व्हावयास पाहिजे. या चळवळीचा ओनामा नागरिक हक्कापासून केला जाणे अगत्याचे आहे. सुदैवाने कॉंग्रेसने फेडरेशनला मान्यता देण्याच्या बाबतीत संस्थानात जबाबदार राज्यपद्धती सुरू करण्याची व लोकमतानुवर्ती संस्था स्थापन करण्याची अट घातली असल्यामुळे ब्रिटिश सरकारही आज संस्थानांतून सुधारणा घडवून आणण्याची खटपट करीत आहे. अशा वेळी संस्थानांतील जनतेने चिकाटीने व धिटाईने चळवळ केल्यास तिला पुष्कळ यश येण्याची शक्यता आहे. ही संधी जर हैद्राबादेतील पुढारी गमावतील तर त्यांनी आपली जबाबदारी ओळखून कार्य न केल्याबद्दल भावी पिढी त्यांना दोष दिल्याशिवाय राहणार नाही.

**मराठवाडा, वर्ष १ ले, अंक २ रा** : दि. १७ फेब्रुवारी १९३८

# तबलीग व शुद्धी

## दंग्याधोप्याचे वाढते प्रमाण

आमचे इलाख्यातून दिवसेंदिवस ज्या बातम्या येत आहेत, त्यांत दंगे-धोपे इत्यादींच्या स्वरूपाकडे पाहिले म्हणजे ही गोष्ट फार वाईट आहे यात शंका नाही. पण त्याला आळा घालण्याचे सामर्थ्य कोणात आहे? त्याबद्दल चर्चा करणे ही फार कठिण गोष्ट आहे. पण केवळ कठीण आहे म्हणून न चर्चिता आजिबात सोडून देणे हेही बरोबर नाही. समाजात घडून येणारी विलक्षण धर्मक्रांती व तज्जन्य भीषण परिस्थिती दिवसेंदिवस फार आनिवार होत आहे.

त्यामुळे दंगे धोपे होत आहेत त्यास वेळीच आळा घालणे अवश्य आहे. दंग्याची व वादाची मूळ कारणे शोधता असे आढळून येईल की, जुनी परंपरा, धर्मभावना, समाजव्यवस्था यास धक्का पोहोचून समाजात निष्कारण बजबजपुरी आणि असंतोष माजून आपल्या देशाचे मोठे नुकसान होऊ पाहात आहे अशी भीती व्यक्त केल्याशिवाय राहवत नाही.

अलीकडे तबलीग आणि शुद्धी यास जो ऊत आला आहे तो आर्थिक आणि राजकीय परिस्थितीचा परिणाम आहे काय? कदाचित समीपच्या भावी काळात इष्टानिष्ट होण्याचा संभव असला तरी बारकाईने निरीक्षण केले असता त्याचे परिणाम वर्गकलहात अधिकच भीषण स्वरूप प्राप्त करणार आहे. अशा परिस्थितीत देशाला कोणते वळण देणे शक्य आहे याचा विचार एच. सी. एस. अधिकारी करू शकणार नाहीत काय?

देशातील सर्वव्यापी व्यक्तीचे सनदशीर शासन पद्धतीने पालन करणे हे नोकरशाहीचे आद्य कर्तव्य आहे. परंतु हे कर्तव्य न बजावता आल्या-

मुळे त्यांच्यावर जो पक्षपातीपणाचा आरोप केला जातो त्याबद्दल नैतिक-दृष्ट्या व न्याय्य दृष्ट्या ते कारणीभूत होत नाहीत, असे म्हणणे संभवनीय आहे काय? कारण जोपर्यंत या अधिकाऱ्यांचे आचरण कृतीत येणार नाही तोपर्यंत त्यांचा बोलघेवडेपणाच म्हणविला जाईल.

सरकारने एच. सी. एस. हा वर्गसुद्धा मुद्दाम निर्माण करण्याचे कारण असे की, त्यांच्यात न्याय, समतोल बुद्धी, सारासार विचार, देशात शांतता आणि बहुजन व अल्पसंख्याकांचे रक्षण, जातविरहित स्वतःचे आचरण, कोणाच्याही धर्मभावना न दुखविता राजवट हाकण्यास हाच उपयोग. असे कार्य जर त्यांचेकडून झाले नाही तर हा वर्ग निर्माण करूनही काहीच उपयोग झाला नाही असे म्हणावे लागेल. पण आम्हांस अशी उमेद आहे की, निदान या वर्गाकडून तरी देशात शांतता, दुसऱ्याच्या धर्मभावना न दुखविता एक राष्ट्रीयत्व प्राप्त करण्याकरिता ते प्रयत्नात कसूर करणार नाहीत.

निजामाबाद आणि गुलबर्गा येथे जिल्ह्याचे वरिष्ठ अधिकारी हजर असताना धडधडीत जनतेला वाटणारे अन्याय होत आहेत, तर तालुका आणि खेडोपाडी काय प्रकार होत असतील याची कल्पना करणे आम्ही वाचकांवरच सोपवितो.

आमची जनतेला प्रार्थना आहे की, शांतता प्रस्थापित करणे हे प्रत्येक व्यक्तीचे कर्तव्य आहे. विशेषतः प्रत्येक गावातील हिंदु–मुसलमान पुढाऱ्यांनी एकत्रित होऊन जाहीरनामा काढावा. ज्यामुळे तंटे बखेडे फिरून होणार नाहीत अशी तजवीज होणे अगत्याचे आहे.

**निजामविजय** : दि. २२ मार्च १९३८

# संघटित व्हा

## आजवर नुकसान झाले

कोणतेही कार्य एकएकट्याने करण्यापेक्षा संघटित होऊन केले तर अधिक यशस्वी होते. आपल्या इतिहासाकडे पाहिले तर आपण संघटित न राहिल्यामुळे किती नुकसान झाले हे दिसून येते. श्री समर्थांनी 'मराठा तितुका मेळवावा' म्हणून घोषणा केली व त्यांनी संघटना करून यश प्राप्ती करून घेतली. आपणात पक्षोपपक्षाची ही पद्धत फार पूर्वीपासून चालत आलेली आहे व त्यापासून अनेक तोटे झाले असतानाही आपण ती उराशी धरून बसलो आहोत हे इष्ट नव्हे.

आपल्या देशबांधवाकडे नजर टाकली तर त्यांनी संघटित होऊन केलेल्या कार्याची अनेक उदाहरणे दिसतील. आपल्या येथील महाराष्ट्रीय बांधवांना अजून एकीचे बळ कळलेले नाही असे वाटते. कारण येथे अनेक पक्षोपपक्ष दृष्टीस पडतात व यांतील काही मनापासून स्वतः कोणतेही कार्य न करता केवळ ईर्षेखातर कार्य केल्याचे दाखवितात.

आमच्या येथील सुशिक्षित समाजातील बरेच लोक नुसते वावदूकच आहेत असे वाटते व त्यांना मिळालेल्या शिक्षणाचा उपयोग आपल्या देश-बांधवांची उन्नती करण्याकडे त्यांनी केलेला दिसत नाही. नाही म्हणावयास येथे काही चांगल्या संस्था दिसतात. पण त्यांचे कार्य वाढत्या प्रमाणावर नाही. पूर्वी ज्या वेळेस सुबत्ता होती त्या वेळेस पोटभर खाण्यास व अंगभर लेण्यास थोड्या श्रमात मिळत असे. पण आज परिस्थिती बदललेली आहे. आज साध्या साध्या गोष्टीसाठीसुद्धा पुष्कळ श्रम करावे लागतात. पूर्वी खेड्या-

पाड्यात संबंध येत असल्यामुळे फारसा त्रास होत नसे. पण आज खेड्यांतील परिस्थितीवरही बाहेरील परिस्थितीचे आघात होत आहेत व त्याचे परिणाम त्यांना -भोगावे लागत आहेत. अशा वेळेस त्यांनी आपली दृष्टिमर्यादा वाढविली पाहिजे. प्रगत देशांची माहिती व अभ्यास असणाऱ्या सुशिक्षितांनी आपल्या देशबांधवांच्या उन्नतीसाठी लहान लहान गटांचा उपयोग करून घ्यावयास पाहिजे. आपल्या बाजूच्या प्रांतातील आपल्याच बांधवांची एकंदर कार्यपद्धती पाहून तरी जागे व्हावयास पाहिजे. स्वार्थत्यागी वृत्तीने त्यानी केलेली कार्ये आपणास हेच दाखवितात की, आपणासही त्यांच्याचप्रमाणे कार्य करणे शक्य आहे.

## सुशिक्षितांचे कर्तव्य

त्यांच्यात व आपल्यात एकेवेळी काहीच फरक नव्हता. पण कार्य करीत राहून त्यांनी आपली सुधारणा करून घेतली असे दिसते. आपल्या अवनतीस अनेक कारणे असूनही आपण एकाचेही निर्मूलन करू शकलो नाही. आपणास आपला दृष्टिकोण बदलला पाहिजे. मी गरीब, मी एकटा, माझ्याने काय होणार? असे म्हणून भागावयाचे नाही. या मनोगंडास बाजूस सारून कार्यतत्पर होणे हेच सुशिक्षितांचे कर्तव्य आहे. आपल्या अज्ञानी देशबांधवांना शहाणे करून संघटितपणे उन्नती करावयास लावले असता अडचणीचा डोंगरही नाहीसा होईल.

निजामविजय : दि. १७ मे १९३८

## वस्तुस्थिती काय दर्शविते ?

### परवानगीचा घोळ

महाराष्ट्र परिषदेच्या द्वितीय अधिवेशनाची लोक मार्गप्रतीक्षा करीत होते. पण ते भरणार किंवा नाही याचा काहीच पत्ता योग्य वेळी न लागल्याने बऱ्याच जणांची निराशा झाली. परंतु अधिवेशनच बंद होईपर्यंत बाहेरून लोक येतच होते. लोकांचा उत्साह अवर्णनीय होता.

महाराष्ट्र परिषदेच्या चालकांनी पूर्वापार परिस्थिती जाणून परिषदेच्या द्वितीय अधिवेशनाला परवानगी मिळावी म्हणून दोन तीन महिन्यांपूर्वीच अर्ज केला होता. पण दिरंगाई व्हावयाची ती झालीच. मग एकंदर रागरंग पाहून परिषदेच्या चालकांना अधिवेशनाच्या तारखा बदलण्याची आवश्यकता भासली. एवढेच नव्हे तर परवानगी न मिळाल्यामुळे त्यांना खाजगी संमेलन भरवण्याचा विचार करणे भाग पडले. त्यास अनुसरून त्यांनी तारखाही जाहीर केल्या. पूर्वी ठरलेल्या तारखा व नंतरच्या तारखात ७-८ दिवसांचाच अवधी होता. कारण एकतर पावसाळा सुरू झाल्याची चिन्हे दिसत होती. परवानगी मिळेल या आशेवर परिषदेची तयारी झाली होती, पण वाट पाहूनही परवानगी आली नाही. मग खाजगी अधिवेशन भरविण्याच्या विचाराला महत्त्व प्राप्त होऊन तारखा ठरविण्यात आल्या व त्यासंबंधी प्रसिद्धीपत्रकेही प्रसिद्ध झाली होती. तोच २२ तीरला सरकारची परवानगी येऊन थडकली. त्यामुळे नाइलाजाने तारखा पुढे न ढकलता त्याच वेळेस परिषद भरविण्याचे ठरले. अध्यक्षांच्या आगमनप्रसंगी स्थानिक अधिकाऱ्यांकडून मिरवणुकीस हरकत घेण्यात आली. तदनंतर त्यांनी ध्वज-

वंदनासरख्या साध्या रीतीरिवाजास निराळ्या प्रकारच्या परवानगीची आवश्यकता असल्याचे कळविल्याने लोकांच्या भावना ताणल्या गेल्या. ध्वजवंदन हा पूर्वापार रिवाज असून त्याने आनंद प्रदर्शनाचे कार्य होत असते व आनंद प्रदर्शनसमयी गुढ्या उभारण्याची रीतच आहे.

## उतारे गाळण्याचा हुकूम

अध्यक्षांच्या भाषणातील काही उतारे गाळून ते वाचून दाखविण्यास तालुकदारांनी परवानगी दिली. त्यावेळेसच परिषदेचे कार्य स्थगित झाले असते पण अध्यक्ष महाशयांनी एकंदर परिस्थितीचे अवलोकन करून व कार्यावर दृष्टी ठेवून शांततेने व सहनशीलतेने कार्यारंभ केला. ते छापील उतारे विनाकारणच गाळण्यात आले व कोणते उतारे गाळण्यांत आले हे दाखविल्यामुळे तर गाळण्याचा मूळ उद्देश काय सफल झाला असेल ते गाळावयास सांगणारेच जाणोत व याव्यतिरिक्त स्वागताध्यक्षांच्या भाषणातही काही शब्दांचा फेरफार करण्यात आला.

मागच्या वर्षी पास झालेल्या नागरिकांच्या ठरावाला अमान्यता देण्यात आली हे पाहून लोकांनी आपणास अशी ढवळाढवळ पसंत नसल्याचे दाखवून देण्यासाठी परिषद अर्धवट ठेवण्याबाबत आग्रह धरला. परंतु तालुक-दारांकडे ते ठराव परत विचार करण्याकरिता पाठवून परिषदेच्या चालकांनी परिषद पार पाडण्याची आपली इच्छा प्रदर्शित केली. पण त्यानंतर त्यातील नागरिकत्वाच्या हक्काबाबतच्या ठरावाला परवानगी मिळाली व दंग्याबाबत कमिशन नेमण्याबद्दलच्या ठरावाला मात्र काही अंशाने अमान्यता देण्यात आली, हे काही योग्य झाले नाही. कारण खुद्द हैद्राबादेतील काही कार्य-कर्त्या व्यक्तींनी, संस्थानी व अनेकांनी अशी मागणी केली होती व तशा प्रकारचा ठराव करण्यास परवानगी स्थानिक अधिकाऱ्यांनी देऊ नये हे आश्चर्यकारक वाटते. कारण जे हैद्राबादला राहून मागता येते ते लातूरला राहून मागता येऊ नये काय ?

## परिषद अर्धवट ठेवली

आणि त्यामुळेच लातूर येथील परिषद अर्धवट ठेवण्यात आली. लोकांनी चार पाच वेळा माघार घेतली. त्यांनी सांगावी ती हरएक गोष्ट

निमूटपणे कार्यकर्ते ऐकून घेत होते. पण एक काडी जास्त झाली असता ज्याप्रमाणे उंटाची पाठ मोडते, त्याप्रमाणे ठरावाला अमान्यता दिल्याने कार्यकर्त्यांचे मत पार खट्टू झाले व आपण आतापर्यंतचे सर्व हुकूम पार पाडले असतानाही हे आधिक ओझे झुगारून देऊन विरोध प्रगट करण्याचा सनदशीर उपाय त्या कार्यकर्त्यांनी योजला व त्यासंबंधी विषय-नियामक समितीत तीन तास कडाक्याचे वादविवाद होऊन एकमताने लोकांनी आपला विरोध सनदशीरपणे दाखविण्याचे नैतिक धैर्य दाखविले. इतकेच नव्हे तर, जाहीर आधिवेशनाने आपला विरोध असल्याचे निदर्शनास आणले, यावरून लोकमत उघडच होत आहे.

**निजामविजय : दि. ७ जून १९३८**

# संक्रमण कालाकडे पाहा

## विचारक्रांतीची लाट

हल्ली हिंदुस्थानात अत्यंत महत्त्वाच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय प्रश्नांसंबंधी विचारक्रांती चालू आहे. ही विचारक्रांती संस्थानी प्रजेच्या सभोवारच काय पण काही प्रगतीपर संस्थानांतही चालू आहे. अशा वेळेस संस्थानातील जनता अशा विचारसंक्रमणापासून दूर राहू शकेल काय? अशा प्रकारच्या विचारांचा लोढा कोणी थांबवू म्हटल्यास थांबणे खात्रीने त्यांच्या आवाक्याबाहेरचे आहे. येथील बहुसंख्य प्रजा इतर प्रांतांप्रमाणे सुशिक्षित नाही. त्यामुळे त्यांना कोणत्याही गोष्टीवर साधकबाधकपणे विचार करून आपल्या मताप्रमाणे कार्य कसे करावे व ते कशा प्रकारे तडीस न्यावे याचा अजून समज आला नाही. आपले म्हणणे बरोबर आहे किंवा नाही याची छाननी ठाम करण्याची शक्तीही अजून आलेली नाही असे म्हटले असता वावगे होणार नाही. आपले आचारविचार सामर्थ्य यांचा इतर प्रांतांशी तुलनात्मक विचार करणे आत्यावश्यक आहे. विचारक्रांतीने कोणती शक्ती उत्पन्न होते व त्याचे गुणदोष काय आहेत आणि ते गुणदोष स्थानिक परिस्थित्यनुरूप तारतम्याने कसे घालविता येतील याचा विचार सर्वांनी करणे आवश्यक आहे. अशा प्रकारचे विचार जर योग्य सनदशीर मार्गांनी प्रकट करण्यास वाव मिळाला नाही तर इतर प्रांतांतील विचारांचा पगडा संस्थानी प्रजेवर होऊन त्यांच्या विचारौघास एक निराळेच वळण लागणे संभवनीय आहे. अशा प्रकारचे वळण न लागण्यासाठी त्यांना शक्य तो सज्ञान करणे व जबाबदारीत अंशतः तरी

भागीदार करणेच योग्य होईल. आम्हाला आमच्या अज्ञानामुळे आणि निष्क्रियतेमुळे शैथिल्य आले आहे, आणि आमचे दोष आमच्या अडचणींचा निरास करण्यासाठी तरी लोकांनी विचार करून योग्य मार्गांनी आपली दाद लावून घेणे न्याय्य होईल.

इतर ठिकाणी सामुदायिक जीवनकलहास तोंड लागले असून आम्ही पुढे न येता 'कसे करावे' एवढेच म्हणत बसलो तर कसे चालेल? जनतेने देशातील पुढारी लोकांच्या मताशी परिचित होऊन त्यांचे अनुभव व मार्ग काय आहेत व तेच मार्ग आपले हिताहित साधण्यास तंतोतंत लागू पडतील की काय याचा सखोल विचार करणे आवश्यक आहे. एकच मार्ग भिन्नभिन्न परिस्थितीत यशदायी ठरतीलच असे नाही. सामाजिक आयुष्यक्रमाची वाढ घडवून आणणे व दूरवर विचार करून पोषक असे उपाय योजणे हे मार्गदर्शकत्वाचे कर्तव्य आहे. आजच्या धकाधकीच्या काळात जर आपण आपल्याकडे लक्ष दिले नाही तर कोण लक्ष देणार?

## आपणच मागे का?

अशा प्रकारे स्वस्थ बसल्यास आपली वाढ होईल की नाही हे कोणी सांगावे? सर्वत्र ज्या घडामोडी चालल्या आहेत त्यांच्याकडे डोळेझाक करणे आता परवडणार नाही. आपले कुजत असलेले बौद्धिक सामर्थ्य योग्य प्रकारे कामास आणले तर मातीचे सोने बनणे अवघड नाही. दुसऱ्या अनेक संस्थानातलि लोकांनी मारलेली आघाडी आपणास हेच दर्शवत आहे की, 'करा काय ते आता करा' हा एक एक क्षण मोलाचा आहे. आपण आपल्या उन्नतीसाठी झटणे हे आपले कर्तव्यच आहे. आपले बंधू पुढे गेले आहेत मग आपण मागे का?

आपणासही शक्य तो वाव मिळत आहे त्याचा फायदा करून घेऊन पुढे सरसावले पाहिजे. कोणतीही गोष्ट कष्टसाध्य असते. तरी आपण आपले अस्तित्व या संक्रमणकालात सनदशीरपणे टिकविले पाहिजे.

**निजामविजय :** दि. २१ जून १९३८

# मोराची पिसे लावलेला डोंबकावळा

## उत्तर देण्यास दिरंगाई

सरकारच्या अन्याय्य निर्बंधांच्या निषेधार्थ लातूर येथील महाराष्ट्र परिषदेने काम बंद ठेवण्याला दोन-तीन आठवडे झाल्यानंतरही तत्संबंधी सरकारी स्पष्टीकरण बाहेर आले नाही. यावरून सरकारने स्वस्थ बसून झालेल्या चुकीची एकप्रकारे प्रामाणिकपणे कबुली देण्याचे ठरविले आहे, असा कित्येकांचा समज झाला होता. कित्येकजण अशी कल्पना करीत की सरकारला तडकाफडकी उत्तर देणे काही विशेष कारणांमुळे कदाचित शक्य झाले नसले तरी चौकशीसाठी उशीर झाला किंवा अशाच काही कारणांचा आधार घेऊन ते आपल्या बाजूचे समर्थन केल्याशिवाय रहाणार नाही. योगायोगाने म्हणा की आणखी काही कारणाने म्हणा, ही दुसरी कल्पना खरी ठरविणारे सरकारी पत्रक गेल्या आठवड्यात बाहेर आले आहे. समाधानाची गोष्ट ही की लातूर किंवा उस्मानाबाद, हैद्राबादेहून चोवीस तासापेक्षाही कमी वेळाच्या रस्त्यावर असून या दोन्ही ठिकाणी तार ऑफिसांची सोय असताना सरकारला आपले उत्तर तयार करावयास इतका उशीर का लागला यासंबंधी पत्रकात मुग्धता स्वीकारली आहे. जेथे दोन दोन तीन तीन वर्षांचे वार्षिक ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट रेंगाळत पडू शकतात तेथील सरकारला एक लहानसे पत्रक प्रसिद्ध करण्यास काही आठवडे लागल्याबद्दल कोणालाच आश्चर्य वाटणार नाही. एखाद्याचा चालता काळ असला म्हणजे त्याने हातात घेतलेल्या मातीचे सोने होते म्हणतात! मग सत्ताधीश सरकारचा दिरंगाई करण्याचा दोष त्यांना असाच नेहमी

फायदेशीर होत असेल अशी कोणी कल्पना केलीच तर ती फारशी चूक ठरण्याचा फार कमी संभव आहे. असो.

## जातिनिष्ठेचा आरोप

हैद्राबाद सरकारच्या राज्यकारभाराचे खरे स्वरूप आकलन करू शकणारांना, सरकारने आपल्या या पत्रकात तीच जुनी-पुराणी, मोडकी-तोडकी जातिनिष्ठेची ढाल पुढे करून आपल्या अन्याय्य कृत्यांना झाकण्याचा वेडगळ प्रयत्न केल्याचे पाहून मुळीच आश्चर्य वाटणार नाही. महाराष्ट्र परिषदेवर, सरकारने या पत्रकाद्वारे जातिनिष्ठ असल्याचा आरोप केला आहे. सरकारने केलेल्या या संतापजनक व खोट्या आरोपाच्या समर्थनार्थ जे दोन मुद्दे पुढे मांडले आहेत त्यावरून सरकारच स्वतः जातिनिष्ठ असून आपली जातिनिष्ठा दुसऱ्यावर लादण्याचा निंद्य प्रयत्न करीत आहे असे कोणालाही सहज दिसून येऊ शकते. सरकारचा हा आरोप महाराष्ट्र परिषदेच्या चालकांना व कार्यकर्त्यांना निरर्थक बदनाम करणारा असल्यामुळे त्यांच्याकडून त्याचा तीव्र शब्दांत निषेध व्यक्त केला गेल्याशिवाय कधीही राहणे शक्य नाही. पत्रकात शेवटी जे वाक्य घातले आहे त्यावरून, सरकार नुसत्या महाराष्ट्र परिषदेलाच बदनाम करून थांबणार आहे असे दिसत नसून आंध्र व कर्नाटक परिषदाही जर सरकारच्या जातिनिष्ठेला उजेडात आणण्याचे साहस करतील तर, त्यांच्यावरही हा प्रसंग आल्याशिवाय राहाणार नाही, असे अनुमान करावयास हरकत दिसत नाही. आज महाराष्ट्र परिषदेची जी गती तीच उद्या आंध्र कर्नाटकाची होणार असल्यामुळे त्यांच्याकडूनही सरकारच्या या कृतीचा निषेध केला जाणे अगत्याचे आहे व तो केला जाईल असा आम्हाला पूर्ण भरवसा आहे. सारांश, सरकारने मराठवाड्यातील जनतेची स्वाभिमानी वृत्ती जागृत होण्यास आणखी एक नवी संधी आणून दिली आहे. त्याबद्दल सरकारी अधिकाऱ्यांचे अभिनंदन न करणे खरोखर कृतघ्नपणाचे द्योतक ठरेल.

## लोकक्षोभाच्या आगीवर तेल

सरकारने आपल्या पत्रकात ज्या दोन मुद्यांच्या आधारावर महाराष्ट्र परिषदेला जातिनिष्ठ ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात एक हा आहे की

महाराष्ट्र परिषदेत भाग घेऊ इच्छिणाऱ्या काही अहिंदूंच्या पत्रांची उत्तरे-देखील परिषदेने दिली नाहीत. या सरकारच्या विधानाला स्वागत मंडळाचे सेक्रेटरी उत्तर देतीलच; पण आम्हाला सरकारला एक असा प्रश्न विचारावासा वाटतो की या 'उदारमतवादी' अहिंदू सज्जनांनी आपल्या चार पैशांची तिकिटे लावलेल्या पत्रांची उत्तरे न मिळाल्याबद्दल सरकारकडे तक्रारी नोंदविल्या आहेत काय? नोंदवल्या असल्यास परिषदेच्या जबाबदार अधिकाऱ्यांचे त्यासंबंधी काय म्हणणे आहे हे सरकारने विचारात घेतले आहे काय? पण ते तसे घेतल्याचे पत्रकात नमूद केलेले नाही. हैद्राबाद सरकारला दोन्ही बाजूंचा समतोलपणे विचार करून मग निर्णय 'देण्याची पद्धती जवळजवळ अपरिचितच आहे. तेव्हा या प्रकरणीही त्यांना आपली इष्ट बाजू सोडून दुसऱ्या विरोधी बाजूचा विचार करण्याची गरज भासलेली दिसत नाही. सरकारला खरोखरच लोकमताची, शांततेची व न्यायाची काही चाड असती तर, सदतीस लक्ष लोकांच्या शेकडो प्रतिनिधींची मने त्यांनी अशा बेदरकारपणे प्रथम दुखवलीच नसती व नंतर कोणातरी सरकारी नोकराच्या बिन आधारी किंवा एकांगी रिपोर्टावर विसंबून अशा प्रकारे त्यावर घाव घातले नसते. लोकक्षोभाच्या अगीवर सरकार हे ज्वालाग्राही तेलाचे थेंब टाकीत असून त्याचा लौकरच भडका उडाल्याशिवाय राहील हे संभवत नाही.

## पोरकट व हास्यास्पद विधाने

सरकारच्या या समर्थनावरून अधिकाऱ्यांची बुद्धि भ्रंश पावली तर नाही ना? असा भास झाल्याशिवाय राहात नाही. सरकारचे म्हणणे क्षणभर मान्य करून परिषदेकडून काही अहिंदूंच्या पत्रांची उत्तरे दिली गेली नाहीत असे गृहीत धरले तरी, पत्रांची उत्तरे न देणे व त्यावरून महाराष्ट्र परिषद जातिनिष्ठ ठरवणे यांतील कार्यकारणभाव कसाकाय जुळवायचा हे एक कोडेच आहे व ते सरकारी अधिकाऱ्यांशिवाय कोणाला सोडविता येईल असे दिसत नाही. सरकारच्या बगलेतील या अहिंदू महाराष्ट्रीयांना परिषदेच्या चालकांनी प्रवेश नाकारल्याचे सरकारजवळ उदाहरण नाही. सरकारचे सारे भांडवल पत्राची उत्तरे न देणे हे आहे आणि या भांडवलावर सरकार महाराष्ट्र परिषदेला दाबू पहाते आहे काय? महाराष्ट्र परिषद अशा फुसक्या

फटाकड्याच्या बाराला बुजण्याची सरकारची अपेक्षा फोल ठरणारी आहे. मराठवाड्यातील प्रत्येक पोर, सरकारच्या 'अहिंदूंच्या पत्रांची उत्तरे दिली नाहीत म्हणून महाराष्ट्र परिषद जातिनिष्ट आहे' या विधानाला पाहून हसल्याशिवाय रहाणार नाही. शहाणे जग, सरकारच्या पदरी असलेल्या महाविद्वान व मुत्सद्दी अधिकाऱ्यांच्या योग्यतेची कींवच करील. ८२ हजार चौरस मैलाच्या विस्तीर्ण प्रदेशावर सत्ता गाजविणाऱ्या पहिल्या प्रतीच्या संस्थानच्या पदरी अशी फोल व पोरकट विधाने करणारे अधिकारी आहेत यावरून तेथील राज्यकारभाराच्या सुव्यवस्थित न्यायीपणाची जगाला चांगलीच कल्पना येऊ शकेल.

## दंग्याशी सरकारचा संबंध

'विशेषत: लातूर येथील व सर्वसाधारण उस्मानाबाद जिल्ह्यातील वातावरणाचा विचार करता हैद्राबादेतील दंग्याचा प्रश्न परिषदेत चर्चिला जाणे सरकारच्या अधिकाऱ्यांना योग्य वाटले नाही' असे सरकारचे म्हणणे आहे. ज्या दंग्यात सरकारच्या अधिकाऱ्यांचे किंवा नोकरांचे अंग होते असा जनतेकडून स्पष्ट आरोप करण्यात येत आहे व ज्यासंबंधी महाराष्ट्र परिषदेच्या अध्यक्षांच्या भाषणात 'हैद्राबादला जो दंगा झाला त्याबद्दल प्रत्यक्ष व अप्रत्यक्षपणे पोलीसांच्या पक्षपाती वर्तनावर आक्षेप घेण्यात येत आहेत. अत्यंत संभावित लोकांवरही खटले करण्यात येत आहेत' असा नि:संदिग्ध उल्लेख करण्यात आला आहे. त्यासंबंधी नि:पक्षपाती मंडळाची नेमणूक करून चौकशी करावी अशी विनंती करणारा ठराव कोणच्या जातीच्या नाजूक भावनांना दुखवण्यास कारण झाला असता व त्यामुळे वातावरण अधिक बिघडले असते? अशी ती कोणती जाती आहे जिला दंग्याच्या चौकशीचे भय वाटते, चौकशी करावी अशी विनंती केल्याने जिच्या सद्भावना(?) प्रक्षुब्ध होतात व सरकारला त्याची मोठी भीती व किंमत वाटते? दंग्याची चौकशी करून दंगेखोरांना शिक्षा द्या अशी विनंती करणारी महाराष्ट्र परिषद म्हणे जातिनिष्ठ आणि जातीय दंग्यावर पांघरूण घालून दंगेखोरांना शिक्षा करण्याची विनंती करणाऱ्या ठरावाला बंदी करणारे सरकार मात्र नि:पक्षपाती, न्यायी, शांतताप्रिय, साम्यवादी वगैरे! वगैरे! आमच्या हैद्राबाद सरकारच्या अधिकाऱ्यांना ब्रह्मदेवाने अकलेची खैरात

केली त्यावेळी सारे जग निजले होते व सारा अकलेचा गड्डा आपल्याच हाती आला असेच वाटत असल्याचे हे द्योतक नाही काय ? सरकारने हवी ती कल्पना करावी पण जग मात्र हेच म्हणणार की 'दंग्याची चौकशी करा व दंगेखोरांना शिक्षा द्या.' अशी विनंति करणाऱ्या ठरावालाही जे सरकार बंदी करते, त्या सरकारचा, लोक आक्षेप घेतात त्याप्रमाणे, खरोखरच दंग्याशी काहीतरी प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध असलाच पाहिजे असे दिसते. एरव्ही त्यासंबंधी एवढी टाळाटाळ करण्याचे कारण काय ?

## सरकारची जातिनिष्ठा

सरकारने या पत्रकात नागरिक हक्काच्या ठरावाला संमती दिल्याची ऐट मारून स्वतःच्या जातिनिष्ठेला लपविण्याचा प्रयत्न केला आहे. सरकारला नागरिक स्वातंत्र्य कशाला म्हणतात याची नीटशी जाणीव झाल्याचे दिसत नाही. सरकारला आज आम्ही नागरिक स्वातंत्र्याची व्याप्ती, जग "The conceptional extent of civil liberties is now clear It embraces the rights of the citizen in regard to security both of his person and dwellings; to freedom of opinion and assembly, thought & organisation; to equal justice and control over the Government and to release from political convictions" ही इतकी मानीत आहे हे दाखवू इच्छितो. तसेच "The standard in regard to freedom of expression by speech or press is the American dictum that no opinion, whatever its revolutionary import, may be punished unless it is accompanied by an over act of revolt. The standard in regard to freedom of assembly and processions is the English doctrine that, unless serious obstructions to traffic can be proved, the police or the executive may not take any action."

कोठे हे भाषण, लेखन, संमेलन व मिरवणुकीचे स्वातंत्र्य– ? आणि कोठे हैद्राबादेतील ? हैद्राबाद सरकारला नागरिक स्वातंत्र्याचा शब्द उच्चारताना खाली मान घालावयास पाहिजे, मग ते प्रजेला दिल्याची भाषा तर दूरच.

## चळवळीची वेळ येऊन ठेपली

एकंदरित हैद्राबाद सरकार साध्यासुध्या विनंत्या अर्जांना व लेखांना किंवा भाषणांना फारशी किंमत देण्याची चिन्हे दिसत नसल्यामुळे महाराष्ट्र परिषदेने आपल्या नागरिक स्वातंत्र्याच्या चळवळीला जोराची चालना देऊन सरकारचे पितळ जगाच्या निदर्शनास आणण्याची वेळ आता येऊन ठेपली आहे. नागरिक स्वातंत्र्यात भाषण, लेखन, संमेलन, मिरवणुकी, मतप्रदर्शन यांबरोबरच राज्यकारभारावर नियंत्रण व राजबंद्यांची मुक्तता इत्यादी गोष्टींचा अंतर्भाव होत असल्यामुळे व हैद्राबदाच्या जुलमी राजवटीत यांपैकी एकही स्वातंत्र्य नागरिकांना नसल्यामुळे त्याच दिशेने चळवळ केल्यास लोकपक्षाचा विजय होण्याची आज आशा आहे. सरकारच्या पत्रकाला नुसत्या पत्रकाने उत्तर न देता महाराष्ट्र परिषद नागरिक स्वातंत्र्याचा लढा अधिक निकराने लढवून महाराष्ट्राचा हा छावा आपल्या पूर्वजांच्या कीर्तीला साजेसाच आहे हे सिद्ध करील अशी आम्हाला खात्री आहे. सरकारला आज आम्हाला एवढेच सुचवावेसे वाटते की अशी मोराची पिसे लावून मराठवाड्याला कोणी डोंबकावळा फसवू शकणार नाही.

मराठवाडा : दि. ७ जुलै १९३८

# हैद्राबाद सरकार व मराठी

## मराठी भाषिकांच्या संख्येत घट

वऱ्हाडचे सुप्रसिद्ध पुढारी व मध्यप्रांत सरकारचे माजी शिक्षण मंत्री श्री. बाबासाहेब खापर्डे यांच्या अध्यक्षत्वाखाली १, २ व ३ ऑक्टोबर १९३७ ला हैद्राबाद येथे निजामप्रांतीय साहित्य संमेलनाचे प्रथम अधिवेशन भरले होते. या अधिवेशनाने पास केलेल्या अनेक ठरावांपैकी दोहोसंबंधीचा हैद्राबाद सरकारने गेल्या आठवड्यात खुलासा प्रसिद्ध केला आहे. हैद्राबाद सरकारने केलेला हा खुलासा सरळ असता तर त्याच्या प्रसिद्धीकरणासाठी दहा महिन्यांचा दीर्घकाल लागण्याचे कारणच नव्हते. शिवाय इतर ठरावांबाबत सरकारने जे मूग गिळले आहेत त्यावरून ते सरकारला मान्य असल्याचे गृहीत धरावयाचे काय ? जर तसे असेल तर सरकारने त्याप्रमाणे व्यवस्था करून प्रामाणिकपणे ठरावांना मान्यता द्यावयास काय हरकत होती ? आणि नसतील तर या दोन ठरावांप्रमाणे त्याची वासलात लावावयास सरकार का कचरले ?

सरकारने ज्या दोन ठरवांबाबत आपल्या पत्रकात स्पष्टीकरण केले आहे त्यांपैकी एक मराठी भाषिकांची लोकसंख्या जी संस्थानात घटत आहे त्यासंबंधी चौकशी करण्यासाठी एका कमिटीची नेमणूक करण्यासंबंधीचा आहे. हैद्राबाद संस्थानातील मराठी भाषिकांची संख्या घटत आहे हेच मुळी सरकारला मान्य नाही. तेव्हा त्यासंबंधी चौकशी करण्यासाठी कमिटी नेमण्याचा प्रश्नच उरत नाही. सरकार आपल्या पत्रकात अगदी स्पष्ट शब्दांत, 'The statement that the

number of Marathi speaking population is decreasing is quite untrue.' अशा प्रकारचे प्रथम विधान करून नंतर हळूच 'The 1931 census however showed that the number of persons, speaking Marathi in every thousand of the population of the Dominion had fallen from 264 to 262' हे कटु सत्य सांगून त्यावर 'The reason being the migration of Telangas in larger numbers than at any time before into the Marathwada districts'. याप्रमाणे भाष्य रचले आहे. मराठी भाषिकांच्या संख्येत होत असलेली घट का होत आहे याची चौकशी करू लागल्यास आणखी बऱ्याच भानगडी बाहेर येण्याचा संभव आहे. म्हणून सरकारने तसे करण्याचे टाळावे हे हैद्राबाद सरकारच्या इस्लाम संस्कृतीच्या प्रेमाला साजेसेच आहे. पण हैद्राबाद सरकारच्या इ. स. १९३१ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टात सेन्सस् कमिशनरच स्वतः "Bir among the Marathwada districts holds the prominant pos tion in the matter of Marathi Language. It is numerically so, but as compared with the previous censas Bir is retrograding as the following marginal figures indicate. A perceptible in fall the number of Marathi spekers is also noticable in Aurangabad, Nander, Parbhani and Osmanabad which are distinctly Marathi districts and the causes for such a steady decline are worth investigating."

याप्रमाणे चौकशीचे समर्थन करीत असल्यामुळे मराठी भाषिकांची भीति त्यामुळे कमी होण्याऐवजी वाढणारीच आहे.

## उर्दू भाषिकांची वाढ

हैद्राबादच्या १९३१ च्या खानेसुमारीतील उर्दू-भाषिकांच्या संख्येतील अनैसर्गिक वाढीचे सरकारी समर्थन विचारात घेतल्यास मराठी भाषिकांची

भीती साधार आहे हे कोणालाही सहज पटण्यासारखे आहे. ते खालील-प्रमाणे आहे :-

" Urdu is not the Mother tongue of Muslims in the sense that Telangi is of Telangas, Marathi of Marathas or Kanarese of Kanadas. A close study of the figures in the columns 3 and 4 of the statement above illustrates the point there are Hindus (including Adi Hindus) and Christians who have written their mothertongue as Urdu and therefor while the Muslim population represent 104 per mille of population, Urdu is the mothertongue of 106 out of a thousand persons. Among other communities we find that there are 89592 Brahmin Hindus, 21001 Adi Hindus, 368 Jains, 1400 Sikhs, 3305 Christians, 3261 Tribals and 234 others whose mothertongue is Urdu. The language as the medium of instruction at all stages of education, general and technical and as one employed in official correspondence has of late received considerable stimulas."

मराठीच्या बाबतीत हैद्राबाद सरकारकडून जो इतर प्रकारचा अन्याय होत आहे त्यांचा विचार करता सरकारचे हे स्पष्टीकरण त्यांच्या इस्लामी संस्कृतीच्या अन्याय्य पुरस्काराचेच द्योतक ठरते.

## लाडक्या उर्दूचे समर्थन

' लोक कल्याणाच्या व सोयीच्या दृष्टीने मराठवाड्यातलि सरकारी कार्यालयाचे व्यवहार मराठीतून चालावेत, या साहित्य संमेलनाने मंजूर केलेल्या ठरावासंबंधीचे सरकारचे स्पष्टीकरणही इतके पोरकट आहे की त्यावरून काही स्पष्ट होतच असेल तर ते मराठी भाषिकांची गैरसोय होत

असूनही सरकार आपल्या लाडक्या उर्दूलाच त्यांच्या डोक्यावर नाचवू पाहत आहे हे होय. सरकार आपल्या या अन्याय्य कृतीचे समर्थन फार पूर्वीपासून चालत आलेल्या प्रघाताच्या आधारे करू पाहत आहे. एखादा अन्याय दीर्घकाल चालू असला म्हणजे तो न्याय होतो हे सरकारचे समर्थन चीड आणणारेच आहे. संस्थानातील 'जबानदानी' च्या परीक्षांचा फोलपणा ज्यांना स्वानुभवाने पटलेला आहे, त्यांना तर सरकारच्या तत्संबंधीच्या समर्थनाचे हसू आल्याशिवाय राहणार नाही. यासबंधी अनेक मौजेची उदाहरणे देता येतील. गतवर्षीच्या महाराष्ट्र परिषदेसंबंधीच्या एका लेखात 'परतूड परिषदेने महाराष्ट्रीयांना परत उडण्याचा संदेश दिला.' असे एक वाक्य होते, या वाक्याच्या भाषांतराच्या आधारावर सिटी कमिशनर ऑफ पोलीसच्या कार्यालयातील एक मराठीचे तज्ज्ञ, या संदेशाची मुद्रित प्रत शोधीत फिरत होते. त्यांची अशी कल्पना होती की, हजार दोन हजार महाराष्ट्रीयांना दिलेला संदेश म्हणजे काहीतरी छापलेले पत्रक असावे. सारांश, लोकांच्या वित्त, अब्रू व जीवाच्या संरक्षणाची ज्यांच्यावर जबाबदारी व ज्यांच्या रिपोर्टवर राज्य कारभाराचे यशापश अवलंबून त्या पोलीस खात्यात, हैद्राबादसारख्या खुद्द राजधानीत, मराठीचे हे असे धिंडवडे निघत आहेत! मराठीच्या ज्ञानाच्या व प्रचाराच्या अभावामुळे मराठवाड्यातील लोकांना कसा धड न्याय मिळू शकत नाही व त्यासाठी साक्षीदारांच्या जबान्यादि कामे मराठीतूनच का होणे अगत्याचे आहे यासंबंधी परिषदेत बरीच अधिकृत चर्चा झाली असल्यामुळे सरकारच्या या स्पष्टीकरणात आपल्या अन्याय्य कृत्याचे समर्थन करण्याचाच प्रयत्न केला असल्याचे स्पष्ट होत आहे.

**मराठवाडा** : दि. १४ जुलै १९३८

# कायदेभंगाला आव्हान

## इस्लामनिष्ठ कारभार

आपल्या इस्लामनिष्ठ व जुलमी राज्यकारभारामुळे आपल्या प्रजेच्या, अर्थात बहुसंख्य प्रजेच्या असंतोषाला व जगाच्या उपहासाला पात्र होत असलेले हैद्राबादचे कुप्रसिद्ध सरकार अवनतीच्या खोल गर्तेकडे प्रतिदिवशी इतक्या वेगाने जात आहे की त्याच्या प्रत्येक हितचिंतकाला 'याची आता शंभर वर्षे खास भरली' अशी शंका आल्याशिवाय राहात नाही. अगोदर अक्कल जाते व मग भांडवल जाते' असा एक सिद्धांत आहे. हैद्राबाद सरकारच्या सध्याच्या वागणुकीत या सिद्धांताचे सत्य स्वरूप स्पष्ट दिसत आहे.

रा. ऑ. सर अकबर हैदरी साहेबांनी मुख्य प्रधानकीची वस्त्रे ज्यावेळी परिधान केली त्या वेळी जनतेला असा विश्वास वाटत होता की आता जुलमाची काळरात्र संपली व सुधारणेचा तेजस्वी सूर्य लवकरच क्षितिजावर तळपू लागेल; पण जसजसे दिवसांमागून दिवस व महिन्यांमागून महिने भराभर जाऊ लागले तसतसे अन्याय, अत्याचार इत्यादींचा लोप होण्याऐवजी त्यांची अकल्पित व अनैसर्गिक वाढच होत असल्याचे अनुभवाला आले व त्यामुळे जनतेच्या इच्छा-आकांक्षांचे मनोरे धडाधड कोसळू लागले. आणि या सर्व गोष्टी समतेच्या व सुधारणेच्या नावावर होत असल्यामुळे कित्येक शतके निश्चेष्ट पडलेल्या जनतेत एक प्रकारच्या सात्विक संतापाची लाट उसळवण्यास कारण झाल्या आहेत. १९ जुलै १९३८ च्या गॅझेटमध्ये प्रसिद्ध करून प्रचलित केलेले सामाजिक सभा

नियंत्रणाचे नवे नियम आजच्या अंकी आम्ही इतरत्र प्रसिद्ध केले आहेत. त्यावरून सहज दृष्टी फिरवल्यास या नव्या नियमांनी जनतेच्या माने-भोवतीची पारतंत्र्याची नि जुलमाची लोहशृंखला सरकारने अधिक आवळून जनतेस, कायदेभंगास प्रवृत्त करण्याइतके चिडविले व संतापविले आहे. आणि आमच्या या विधानाला हैद्राबादसारख्या राजधानीच्या शहरी बार असोसिएशनपुढे होणाऱ्या श्री. भुलाभाईसारख्यांच्या व्याख्यानाला प्रथम बंदी करून, पुष्टी देणारे एक उदाहरण सरकारनेच निर्माण करून ठेवले आहे. सारांश या काळ्या कायद्याने सरकारच्या अगोदरच कलंकित असलेल्या राजवटीला अधिकच डांबर फासले गेले आहे व जनता त्यांचे काळ्या निशाणांनीच स्वागत करील याबद्दल आम्हाला मुळीच संशय वाटत नाही.

## सरकारच्या आव्हानाला उत्तर

हैद्राबाद सरकारचे इस्लामी संस्कृतीविषयक प्रेम इतके उत्कट आहे की त्यांनी आपल्या गॅझेटलाही गोषा पाळण्याची सक्ती केली आहे. त्यामुळे आम्हाला या नव्या नियमान्वये सार्वजनिक सभांच्या सूचना ज्या ठराविक फॉर्म्सवर द्यावयाच्या आहेत त्यासंबंधी आज काही लिहिता येत नाही. ते फॉर्म्स हाती आल्यावर सविस्तर लिहूच. पण आमचे पुढे असलेल्या नव्या नियमांवरून संस्थानात यापुढे खाजगी जागी खाजगी स्वरूपाच्या सभाही सरकारला सूचना दिल्याशिवाय व वाटेल त्या व्यक्तीला तेथे येण्याचा हक्क दिल्याशिवाय भरवण्याची मनाई करण्यात आली असल्यामुळे सरकारने जनतेच्या नागरिक हक्काचा अधिक संकोचच केला आहे व त्याबद्दल सरकारचा अत्यंत तीव्र शद्बांत निषेध करण्यास आम्हास कसलाच संकोच वाटत नाही. शिवाय सामाजिक, वाङ्मयीन, शैक्षणिक व दानधर्म-विषयक सभांच्या, तसेच या व्यतिरिक्त असलेल्या सभांच्या व्याख्याही सरकारने कायद्यात सहेतुकपणे निर्देशिल्या नसून त्या प्रसंगानुरूप ठरविण्याचा अधिकार पोलिस खात्याला (कारण तालुकदार हे जिल्ह्याचे नाजम कोतवाली असतात) दिलेला असल्यामुळे या सुधारणांचे दांभिक स्वरूप अधिकच स्पष्ट होत आहे. या सभांचे चालक व अध्यक्ष संस्थाना-चेच रहिवाशी असले पाहिजेत, लग्न किंवा अंत्य संस्काराचे प्रसंगी इतर

हेतूसाठी उपयोजिल्यास हे नियम त्यांना लागू होतील व या संबंधीचे खटले भरण्याचा अधिकार पोलिसला असेल, इत्यादी कायद्यातील नव्या अटी पाहिल्या म्हणजे सरकारच्या सद्‌हेतूचा विचार करण्यात आता यापुढे कालापव्यय करणे वेडेपणाचे वाटू लागते.

सारांश, हैद्राबाद सरकार आता वर्तमानपत्रातील टीकांना किंवा सभांतून होणाऱ्या भाषणांना किंवा ठरावांना कवडीचीही किंमत द्यावयास तयार नसून जनतेचे हक्क बेदरकारपणे पायाखाली तुडविण्यास व चळवळीच्या नरडीला नख देण्यास बद्धपरिकर होऊन कायदेभंगाच्या चळवळीला एकप्रकारे उघडउघड आव्हानच देत आहे. सरकारच्या या आव्हानाला जनता काय व केव्हा उत्तर देते हे लवकरच दिसून येईल.

**मराठवाडा** : दि. २१ जुलै १९३८

# हैद्राबादचा नाजूक प्रश्न

## पोकळ बडबडीला कोण विचारतो ?

हिमालयापासून विंध्याद्रीपर्यंतचा विस्तीर्ण उत्तर हिंदुस्थान वायूच्या वेगाने व हिंस्रश्वापदांच्या क्रूरतेने ज्या इस्लामी आक्रमणाने पादाक्रांत केला, त्याला थांबवण्याचे, परतवण्याचे व दिल्लीच्या तख्तावर घण घालण्याचे सुयश, महाराष्ट्राने एकेकाळी आपली मुत्सद्देगिरी, त्याग, शौर्य इत्यादी गुणांच्या बळावर, संपादिल्याची आठवण आजही प्रत्येक महाराष्ट्रीय अंतःकरणात असल्याचे आढळते. एवढा उज्ज्वल इतिहास महाराष्ट्राच्या मागे असताना शत्रूच नव्हे तर शत्रूची जनावरेदेखील ज्याच्या स्मृतीने घाबरून पाणी पिईनाशी होत असत, त्या महाराष्ट्रीयांच्या बेफाम बडबडीला आज जगाच्या बाजारात काय मोल आहे ? स्वतःच्या व शत्रूच्या बलाबलाचा अचूक अंदाज करून अत्यंत कुशलतेने औरंगजेबाच्या अफाट सेनासागराला गनीमी पद्धतीने नामोहरम करणारा तो अक्षरशत्रू मावळ्यांचा महाराष्ट्र कोठे, आणि शत्रूच्या तर नाहीच पण स्वतःच्या शक्तीचाही अंदाज न करता भरमसाट शाद्बिक घोषणा करणारा वादविवादपटू व क्रियाशून्य असा आजचा महाराष्ट्र कोठे ? केवळ वक्तृत्वाचे बक्षीस व श्रोत्यांच्या टाळ्या मिळविण्यासाठी एखाद्या अननुभवी पोराने खुशाल आवेशयुक्त विधान करावे "कोण तो ? तो तर आम्ही खडर्याला तीनदा पिटाळलेला आहे." पण आजच्या प्रत्यक्ष व्यवहारात या बालिश बडबडीला शत्रू तर हसेलच हसेल, पण विचारी लोकही हसल्याशिवाय रहणार नाहीत. या नरपुंगवांच्या मते हैद्राबादच्या निजामाचे सरकार म्हणजे पावसाळी

पाण्याने वाढलेली परसातली जणू भाजीच आहे! कोणाही मुलामुलीकडून सहज खुडवावी, शिजवावी व पचवावी! हिंदुमहासभेचा अधिकारीवर्ग याच खुळ्या कल्पनांच्या आहारी तर गेला नाहीना अशी आज जबरदस्त शंका वाटत आहे. अखिल भारतीय हिंदुमहासभेला वीस हजारासाठी झोळी फिरवावी लागते व तीत लोकमान्यांच्या पुण्यतिथीला महाराष्ट्राच्या राजधानीत अवघे शे-पन्नास रुपये पडत नाहीत, यावरूनच महासभा नुसत्या शद्बोच्चाराबरोबर कोट्यवधी रुपये उधळू शकणाऱ्या निजामाच्या सरकारला दरडावून संस्थानातील बहुजन समाजाचे किती हित करू शकेल याचा अंदाज करणे फारसे कठीण नाही.

## दुधारी मार्गाची गरज

हैद्राबादेतलि बहुजन समाजाच्या दुःखाचे मूळ सरकारच्या इस्लामी संस्कृतीवरील अतुल प्रेमात साठवलेले आहे. हैद्राबाद सरकारच्या या इस्लामी संस्कृतीच्या प्रचाराला व प्रसाराला, साम्राज्य सरकारची मूक संमती असून लक्षावधि धर्मवेड्या मुसलमानांचे खडे सैन्यही साहाय्यार्थ सुसज्ज आहे. संस्थानिक व मुसलमान या दोन शस्त्रांच्या साहाय्याने भारतीय स्वातंत्र्य संग्रामाचा चिवडा करण्याचा इंग्रजी मुत्सद्यांचा डाव लक्षात घेतल्यास हैद्राबादेत झालेले संस्थानिक व मुसलमान यांचे ऐक्य तेथील जनतेच्या उन्नतीच्या मार्गात किती अडचणी उत्पन्न करीत असेल व त्या दूर करण्यासाठी किती दूरदर्शित्वाने दीर्घ उद्योग करावयास पाहिजेत याची आमच्या थोरांना अद्याप नीटशी कल्पना आलेली दिसत नाही. हैद्राबादच्या जनतेवर होत असलेले आजचे आक्रमण उघडउघड इंग्रजांच्या मुत्सद्दी व लपून छपून औरंजेबाच्या क्रूर अशा दोन्ही मार्गांनी होत आहे. त्याचा परिणामकारक प्रतिकार करण्यासाठी उपयोजावयाची साधनेही तशीच उघड व गुप्त असावयास पाहिजेत. हैद्राबादेतील समाजाचा आत्मविश्वास ज्यामुळे द्रुतगतीने वाढेल व सरकारच्या नाजूक मर्मस्थानावर कमीत कमी नुकसान सहन करून ज्यामुळे प्राणघातक हल्ले करून त्याची शक्ती क्षीण करता येईल असे दुधारी व तिधारी मार्ग अवलंबिले जाणे आज जरूर आहे. आपल्या दुःख-भाराखाली दबलेल्या हैद्रबादेतील जनतेची शक्ती ज्यामुळे कमी होईल असा एकही बाहेरचा मतभेदाचा प्रश्न तेथे पक्षाभिनिवेशाने

निर्माण न केला जाईल याची बाहेरच्या हितचिंतकांनी आज काळजी घेणे आवश्यक आहे. एवढे दूरदर्शित्व न दाखवल्यास व एवढे आत्मसंयमन न केल्यास हैद्राबादेतील जनतेचे हित साधले जाण्याऐवजी अनहितच अधिक होण्याचा संभव आहे. बाहेरच्या हितार्चितकांनी नुसत्या वर्तमानपत्री बातम्यांवर विसंबून अथवा उफळल्या भावनेच्या भरात केलेल्या भरमसाठ विधानांवर विश्वासून आपल्या अल्प शक्तीचा अपव्यय व त्यामुळे होणारे हैद्रबादेतील जनतेचे नुकसान न होईल याची खबरदारी घेतली पाहिजे. हैद्राबादचा प्रश्न कोणचीही बाहेरची संस्था, पुढाकार घेऊन सोडवू शकत नाही व त्यासाठी हैद्राबादेतील कार्यकर्त्यांनीच बलिदानाची तयारी करून त्याचे नेतृत्व स्वीकारणे अवश्य आहे, ही गोष्ट बाहेरचे हितचिंतक जितक्या लवकर ओळखतील तितक्या लवकर कार्यसिद्ध होऊ शकेल. बाहेरच्या हिताचिंतकांनी श्रीसमर्थाच्या उच्च भूमिकेवर आरूढ होऊन हैद्राबादच्या प्रश्नाला हातभार लावला पाहिजे.

## प्रश्न अधिक बिकट होईल

हैद्राबादचा प्रश्न आज शुद्ध सांस्कृतिक स्वरूपाचा आहे ही गोष्ट जितकी निर्विवाद आहे तितकीच तो सोडवण्याचा मार्ग शुद्ध राजकीयच आहे. हैद्राबादेत झालेले सत्ता व मुसलमान यांचे ऐक्य फोडण्यास धर्माचा किंवा संस्कृतीचा जुनापुराणा व ठिसूळ घण आज उपयोगी पडू शकत नाही. त्यासाठी पोलादी राजकीय घणच पाहिजेत. फेडरेशनला जो भारतीय स्वातंत्र्य संग्रामाने आज ताण दिलेला आहे त्यामुळे हैद्राबादच्या सत्तेला जबरदस्त धक्का बसलेला आहे. या संधीचा पूर्ण फायदा हैद्राबादेतलि जनतेला मिळवून देण्यासाठी बाहेरच्या हिताचिंतकांनी आपल्याला मदत करावी अशी तिची इच्छा आहेही. दीर्घावधीनंतर का होईना हितचिंत-कांनाही हैद्राबादेतील बांधवांना साहाय्य करण्याची उत्कंठा लागलेली दिसत आहे. हे हैद्राबादेतील जनतेचे सद्भाग्यच आहे. पण या बाबतीत दात्यावर फार मोठी जबाबदारी आहे. आजच्या झाकलेल्या सव्वा लाखाच्या मुठीची खरी किंमत जगाला न कळू देता आपली दात्याची उच्च भूमिका त्याने स्थिर ठेवली पाहिजे व आपल्या मदतीने हैद्राबादेतील जनता अधिक परावलंबी, स्वाभिमानशून्य, आत्मविश्वासरहित व बलहीन न बनेल याची

काळजी घेतली पाहिजे. हैद्राबादेतील लोकांची आजची खरी गरज वीस हजार रु. किंवा दहा हजार सैनिक ही नाही. हैद्राबादचा प्रश्न सोडविण्यासाठी वीस लक्ष रुपये कमी पडणारे आहेत. आणि ते खर्च करण्याची शक्ती आज हैद्राबादकरात आहेही. हैद्राबादच्या दीड कोटी लोकसंख्येत पुरेसे सैनिकही आहेत. हैद्राबादेतील कार्यकर्त्यांची गरज आज निराळी आहे. ती दूर करण्याचा आज ते स्वतःच प्रयत्न करीत असल्यामुळे व तत्संबंधी उघड चर्चा करण्याने त्यात विघ्ने उत्पन्न होण्याचा संभव असल्यामुळे आम्ही बाहेरच्या हितचिंतकांना एवढीच विनंती करू इच्छितो की त्यांनी संस्थानातील खऱ्या कार्यकर्त्यांशी विचारविनिमय करून त्यांच्या प्रयत्नाला लवकर यश येण्यासाठी आपल्या शक्तीसर्वस्वाचा उपयोग करावा. हैद्राबादचा प्रश्न आज अनेक कारणांमुळे अत्यंत गुंतागुंतीचा व नाजूक बनलेला असल्यामुळे केवळ भावनेच्या आहारी जाऊन केलेल्या घोषणांनी तो मुळीच सुटू शकत नाही. आर्यसमाज किंवा हिंदुमहासभा यांच्या अंतिम निवेदनांनी तो सुटण्याऐवजी अधिकच बिकट होईल की काय अशी आम्हाला शंका वाटते.

## जातीयतेची भूमिका घेऊ नका

शेवटी जातीयतेच्या भूमिकेवरून हैद्राबादचा लढा लढविण्याची चूक झाल्यास त्यात अपयश येण्याचीच कशी शक्यता आहे हे थोडक्यात दाखवून आज आम्ही वाचकांची रजा घेणार आहो. इंग्रजांच्या भूमिकेहून हैद्राबाद सरकारची भूमिका अत्यंत निराळी आहे. दुर्दैवाने भिन्न भूमिकांवरील या दोन सत्तांची आज गट्टी जमलेली आहे. त्यातच मदांधांच्या पलटणीची त्यांना कुमक मिळालेली आहे. आतापर्यंत हैद्राबाद संस्थानातील जातीय संस्थांची व कार्यकर्त्यांची झालेली दैना विचारात घेता संस्थानात जातीय स्वरूपाच्या चळवळीला यश येण्याची मुळीच शक्यता दिसत नाही. हैद्राबाद सरकारच्या शरीराचा राजकीय विभाग आज अंतस्थ व बाहेरच्या कारणांनी अत्यंत नाजूक बनलेला आहे. त्यावरच जर आज संघटितपणे अचूक मारा केला जाईल तरच हैद्राबादची सत्ता डळमळण्याची शक्यता आहे. हैद्राबाद सरकारची जातीय भूमिका इतकी सबल आहे की त्याला त्याच भूमिकेवरून हलवण्याचा प्रयत्न आजच्या सामाजिक परिस्थितीत

यशस्वी होऊ शकत नाही. असा प्रयत्न, हैद्राबाद सरकार, काही मूठभर वेड्यांच्या साहाय्याने सहज लीलेने हाणून पाडू शकते. संस्थानातील आर्यसमाजाला मुसलमान समाज किंवा सरकार भीत नाही. आर्यसमाजाचा जो आज पाठलाग केला जात आहे तो भीतीमुळे नाही. सरकारचे सिंहासन ज्यामुळे डळमळण्याचा नुसता संभव आहे अशाच चळवळीला सरकार आज भीत आहे व ती चळवळ राजकीयच आहे. इतके दंगेधोपे, मारामाऱ्या, खून व अत्याचार झाले असतानाही जेवढे धार्मिक स्वातंत्र्य संस्थानातील जनतेला दिले आहे त्याच्या एक शतांशही राजकीय स्वातंत्र्य दिलेले नाही, ही गोष्ट काय सिद्ध करते? हिंदी राजकारणातील परिस्थितीचा विचार केल्यानंतरही राजकीय भूमिकेवरून हैद्राबादचा प्रश्न सोडविल्याने जनतेचे अधिकात अधिक हित साधणे शक्य आहे हेच स्पष्ट होते. सारांश हिंदुमहासभा व आर्यसमाज या दोन्ही संस्थांच्या नेत्यांना आमची ही विनंती आहे की, त्यांनी हैद्राबादचा प्रश्न सोडविण्याच्या चळवळीचे नेतृत्व न पत्करता संस्थानातील जनतेला राज्ययंत्र लोकमतानुवार्ती करण्याची चळवळ स्वतः करण्यास जेवढे प्रत्यक्षाप्रत्यक्ष व मुत्सद्देगिरीने साहाय्य देता येईल तेवढे द्यावे व हैद्राबादच्या जनतेच्या उद्धाराचे श्रेय संपादावे; कारण हैद्राबादचा प्रश्न अत्यंत नाजूक बनलेला आहे.

**मराठवाडा** : दि. ४ ऑगस्ट १९३८

# शैक्षणिक सुधारणेची गोगलगाय

## अनैसर्गिक बदल

गेल्या पाच-पंचवीस वर्षांत, हैद्राबाद सरकारला जातीयतेच्या भुताने पछाडल्यामुळे, संस्थानातील इस्लामी संस्कृतीच्या प्रचारा-प्रसारासाठी ज्या काही अनेक गोष्टी करण्यात आल्या त्यात शिक्षणात घडवून आणलेला अत्यंत भयानक, दूरपरिणामी व अनैसर्गिक बदल हा प्रमुख होय. भाषा हे संस्कृती प्रसाराचे फार मोठे साधन असल्यामुळे देशी भाषेच्या गोड नावाखाली उर्दू भाषा मुलांच्या व मुलींच्या प्राथमिक शाळांपासून तो थेट विद्यापीठापर्यंत शिक्षणाचे माध्यम म्हणून सहेतुकपणे ठेवली गेली. प्राथमिक शाळांचे माध्यम उर्दू करण्याचा सरकारचा डाव फारसा यशस्वी झाला नाही. सरकारने लागलीच प्राथमिक शाळांतील शिक्षण विद्यार्थ्यांच्या मातृभाषेतूनच दिले जावे अशी आज्ञापत्रे काढली. व नंतर प्राथमिक शाळांतून विद्यार्थ्यांच्या मातृभाषेतूनच ते दिले जाते अशी जाहीर घोषणाही केली. तथापि या प्रकरणी अद्यापही क्वचित अन्याय होत असल्याचे ऐकण्यात येते. काही ठिकाणी अज्ञान पालकांकडून प्रवेशअर्जावर आंगठे किंवा सह्या घेताना शिक्षणाचे माध्यम कोणते असावे या सदरात, उर्दू हा शब्द लिहिला किंवा लिहविला जातो व लेखी आधारावरच वरिष्ठ अधिकारी, "पालकांनी आपली विशिष्ट इच्छा दाखविली असेल, त्याशिवाय सर्व विद्यार्थ्यांना शिक्षण मातृभाषेतून दिले जाते." असे समर्थन करतात. प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांच्या बाबतीत अज्ञान-पालकांच्या उपरिनिर्दिष्ट प्रकारच्या आधारावर

केलेले सरकारी समर्थन न्याय्य ठरत नाही. कोणीही समंजस पालक आपल्या मुलांना प्राथमिक शाळेतील अभ्यासक्रम परकीय भाषेतून शिकवा असे म्हणणार नाही. ज्यावेळी तो तसे म्हणताना आढळतो त्यावेळी त्याला तसे म्हणण्यास भाग पाडणारी काही विशिष्ट परिस्थिती कारण असली पाहिजे हे उघड आहे. ही परिस्थिती विशेषतः पालकाचे अज्ञान व शिक्षकांची जातीयता या प्रकारची असते.

## उर्दूच्या नावाखाली जातीय प्रचार

प्राथमिक शिक्षण मातृभाषेतून न घेण्यास भाग पाडणारी दुसरी एक बाब उर्दूच्या नावाखाली जातीयतेचा प्रच्छन्न प्रचार करणारांनी निर्माण करून ठेवली आहे. ती ही की, प्राथमिक शिक्षणानंतरच्या वर्गाचे माध्यम सर्वस्वी उर्दू ठेवल्यामुळे मराठी चौथ्या इयत्तेतून आलेला विद्यार्थी उर्दू भाषेच्या अपुऱ्या ज्ञानामुळे गणित, इतिहास– भूगोल वगैरे विषय उर्दूतून घेऊ शकत नाही. प्राथमिक शाळांतील दुसऱ्या इयत्तेपासून मराठी शाळांतूनही उर्दू भाषा जबरीने शिकविली जाते, पण उर्दू मातृभाषा असलेल्या विद्यार्थ्यांसाठी ठेवलेला पाचवीचा अभ्यासक्रम मराठी शाळेतून आलेल्या विद्यार्थ्याला भाषेच्या अडचणीमुळे साहजिकच जड जातो व त्यामुळे त्याला नापास होण्याशिवाय मार्ग नसतो. उर्दू भाषा चांगली नसल्यामुळे मुलगा नापास झाला एवढे कळले की, कित्येक पालक दुसऱ्या मुलांना प्राथमिक शाळांतील मराठीच्याऐवजी उर्दूच्या वर्गात घालण्यास उद्युक्त होतात. परकीय भाषेतून शिक्षण दिल्यामुळे बाल-मनावर कसे विपरीत परिणाम होतात हे पालकांना कळत नाही. त्यांना आपला मुलगा पास कसा होईल एवढाच विचार असतो. अज्ञान क्षम्य न मानणाऱ्या कायदेशीर सरकारला अज्ञान पालकांच्या अज्ञानामागे दडण्याचा अधिकार पोचू शकत नाही. ज्यामुळे मुले पाचवीत नापास होतात ती कारणे सरकारने सहेतुकपणे निर्माण केलेली आहेत व म्हणून या परिस्थितीबद्दल सरकारच जबाबदार आहे.

## मराठी शाळेत उर्दू शिक्षक

प्राथमिक शिक्षणाच्या बाबतीत आणखी एक अशी तक्रार ऐकण्यात

येते की, मराठी मातृभाषा नसलेले मुसलमान शिक्षक या शाळांतून नेमलेले आढळतात. सरकारी रिपोर्टातून मराठीच्या प्राथमिक शाळा किती आहेत हे निराळे दाखविले जात नाही. तसेच प्राथमिक शाळांतील शिक्षकांची संख्या व जातवारीही गुप्तच ठेवण्यात येते, त्यामुळे सरकारने प्राथमिक शिक्षण मातृभाषेतून द्यावयाचे तत्त्व मान्य केल्यानंतर प्रत्यक्ष तपशिलात किती फरक आहे हे नक्की दाखविता येणे शक्य नाही. जनतेला होत असलेल्या अन्यायाचे ज्ञान न व्हावे हाही हेतू हे आकडे न प्रसिद्ध करण्यात असू शकेल कदाचित.

एकदा सरकारी शाळेतील एक शिक्षक चुकून असे बोलून गेले की काही ठिकाणी प्राथमिक शाळांतील वेळापत्रकावर हिंदू शिक्षक-शिक्षकिणींची नावे नोंदविली जातात; पण प्रत्यक्षात शिकविणारे शिक्षक-शिक्षकिणी मुसलमानच असतात व उर्दूतूनच शिकवितात. ही गोष्ट सिद्ध करणे सरकार-अमान्य संस्थेला व व्यक्तीला शक्य नसले तरी हिंदू शिक्षकांची संख्या कमी असल्याच्या ओरडीवरून वरील विधानात अगदीच सत्यांश नसेल असे म्हणवत नाही.

## सरकारी हस्तकांची चळवळ

प्राथमिक शिक्षणातील हे तपशिलातील दोष हैद्राबाद सरकारच्या बड्या शिक्षणाधिकाऱ्यांना धावत पळत-तपासण्या कराव्या लागत असल्यामुळे कदाचित अज्ञात असतील व ते कोणी साधार सिद्ध केल्यास दूर केले जाण्याचे गोड अभिवचनही त्यांच्याकडून मिळेल. पण हे मांजराच्या गळ्यांत घंटी बांधण्याचे काम करणार कोण? ज्या लोकांच्या या तक्रारी आहेत त्यांच्या संस्थांना व राज्यकर्त्यांना तर सरकारने जातीय व राजकीय ठरवून बहिष्कृत केलेले! आमच्या सरकारला जनतेची शैक्षणिक चळवळ देखील 'जातीय' व 'राजकीय' भासते त्याचे कारण सरकार स्वतःचे राजकारण जातीयतेच्या रंगाने रंगवीत आहे हेच होय. या जनतेच्या संस्थांना मान्यता दिली तर कार्यकर्ते ठिकठिकाणच्या शाळांतील दोष साधार पुढे मांडतील व आपल्याला खाली मान घालावी लागेल ही भीतही सरकारला भेडसावीत असावयाचीच. देशातील सरकाराश्रित वर्गाने या

जनतेच्या चळवळींना पाठिंबा देऊ नये म्हणून सरकार आपल्या हस्तकां-करवी विरोधी चळवळी चालविण्याच्या कामी कधीच चुकत नाही. असो.

## कागदोपत्री सुधारणा

उर्दूचे हे ओझे बहुजन समाजाच्या डोकीवर लादल्याला उणीपुरी पंचवीस वर्षे झाली आहेत. या दीर्घावधीत आपल्या दबलेल्या गळ्याने शक्य तेवढी जनता ओरडली आहे. एरव्ही नवाकाळ व चित्रमयजगत् एकत्र वाचणाऱ्या दोन इसमांची नावे अचूकपणे काळ्या बुकात नोंदणाऱ्या सरकारच्या कर्तव्यदक्ष हेरांनी, जनतेची ही ओरड सरकारला कळविली नसेल हे कसे शक्य आहे ? पण जणू काही घडलेच नाही अशा गंभीर भावनेने आमच्या सरकारने पंचवीस वर्षे काढली. विद्यार्थी दशेची आयुर्मर्यादा सरासरीने ५-७ वर्षे निघेल व याप्रमाणे विचार केल्यास या पंचवसि वर्षाच्या काळात विद्यार्थ्यांच्या तीन पिढ्या सरकाच्या सहेतुक बदललेल्या अभ्यासक्रमाच्या चाकोरीतून निघाल्या असे गृहीत धरावयास काहीच हरकत नाही. निघाले एवढे खत आपल्या आयुष्यातील कार्याला पुरेसे आहे म्हणून असो, की जनतेच्या वाढत्या चळवळीच्या दाबामुळे असो सरकारने आता दुय्यम शिक्षणाचे माध्यम विद्यार्थ्यांची मातृभाषा असावी हे तत्त्व नुसते कागदोपत्री मान्य केले असून ते प्रचालित कसे करावे याचा विचार असल्याचे आश्वासनही गतवर्षी देण्यात आले आहे. या आश्वासनाची विभागशः पूर्णता, सरकारने मुलींच्या मिड्ल स्कूल्समध्ये त्यांची मातृभाषा माध्यम असावी, असा नुकताच एक हुकूम काढून केलेली आहे. या ठिकाणी ही गोष्ट लक्षात ठेवावयास पाहिजे की, संस्थानांत मिड्ल स्कूलसची परीक्षा सरकारने नुकतीच बंद केली आहे व शिक्षणखात्याच्या डायरेक्टरांना मुलींच्या हायस्कूलसचे माध्यम त्याची मातृभापा असावी अशी शिफारस केली होती पण वरिष्ठ सरकारला एवढी मोठी सुधारणा एकदम दिल्यास जनतेला अपचन होईल अशी भीती वाटली म्हणून ती मिडलस्कूलपर्यंतच मान्य केली गेली आहे. सर्वसाधारण समाजाला परीक्षा पास होण्याची एक चटक लागलेली आहे. तिचा फायदा या सवलतीला मिळणार नाही. शिवाय ट्रेंड शिक्षकिणींचा अभाव, ही अडचण सरकारने अगोदरच जनतेपुढे

मांडून ठेवली आहे. पुढेमागे कोणी ही सुधारणा फक्त कागदोपत्रीच राहिली अशी तक्रार केली तर काय करता ?

तथापि, शाळा खात्याचे विद्यमान डायरेक्टर मि. जाफरी यांनी डॉ. रासमसूद यांच्या कारकीर्दीत झालेल्या व दीर्घकाल अस्तित्वात असलेल्या या अन्यायाचे अंशतः व स्वसामर्थ्यानुसार परिमार्जन करून स्वतःचा मुलकीपणा सिद्ध करून स्वतःला अभिनंदनास पात्र करून घेतले आहे. आपल्या खात्यातील खालच्या अधिकाऱ्यांच्या व्यवहाराचे व प्रत्यक्ष परिस्थितीचे ते आपुलकीने निरीक्षण करून नियंत्रण करतील तर प्राथमिक शिक्षणासंबंधी लोकांची उरलेली थोडीशी कुरकूर त्यांना नाहिशी तर करता येईलच, पण मुलांच्या हायस्कूलचे माध्यमही त्यांची मातृभाषा केल्याचे श्रेयही संपादिता येईल. याच सुधारणा जनतेच्या पुढाऱ्यांना विश्वासात घेऊन जर सरकार करू लागले तर सरकार व सरकारी अधिकाऱ्यां-संबंधीचा आदर बराच वाढण्याचा संभव असल्यामुळे मि. जाफरी यांनी ती प्रथा पाडावी अशी आमची सूचना आहे. शेजारच्या प्रांतांच्या प्रमाणात हैद्राबाद हे शैक्षणिक दृष्ट्याही अत्यंत मागासलेले असल्यामुळे तेथील सुधारणांची गती गोगलगायीची असून भागणार नाही.

**मराठवाडा :** दि. १८ ऑगस्ट १९३८

# दडपशाहीचे शस्त्र

## पंधरा वृत्तपत्रांना बंदी

ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या भेदनीतीच्या आश्रयाला राहून मस्त बनलेली निजामशाही आपल्या प्रजेवर नानाविध प्रकारे कित्येक वर्षापासून जुलूम करीत आहे. शेजारच्या प्रांतांतून कॉंग्रेस अधिकारारूढ होईपर्यंत हा जुलूम जगाच्या वेशीवर टांगण्याचीदेखील शक्यता नव्हती. ही शक्यता निर्माण झाल्यापासून हैद्राबादेतील प्रजेवर होणारे अन्याय अनेक मुखांनी बाहेर येऊ लागले. मन मानेल तसे स्वैर वागण्यास सवकलेल्या या राज्यातील अधिकाऱ्यांना ही गोष्ट सहन झाली नसेल यात आश्चर्य नाही. आरंभापासूनच त्यांच्या अंगाची नुसती लाही लाही होऊ लागली होती. एक-दोन वेळा पत्रके काढून त्यांना गुरकावण्या देऊनही पाहिल्या; त्याचाही काही उपयोग झाला नाही. संताप न आवरल्यामुळे शेवटी गेल्या आठवड्यात आलाहजरतांच्या फर्मानाद्वारे संस्थानाबाहेरून येणाऱ्या एक-दोन नव्हे पंधरा वृत्तपत्रांना बंदी करणारा हुकूम रा. ऑ. सर अकबर हैदरीसाहेबांच्या अनुज्ञेने काढण्यात आला. सभाबंदीचा कायदा नुकताच सुधारून अधिक कडक केलेला आहेच. आणि आता बाहेरच्या १५ वृत्त-पत्रांना बंदी करण्यात आली आहे. हैद्राबाद जनतेने असह्य वेदना होत असताना नुसते ओरडूही नये म्हणून केवढी ही दक्षता !

सरकारी पत्रकात बंदीचे समर्थन करणारे भाष्य या खेपेला आलेले नाही. तथापि हैद्राबादेतील बहुजन समाजाची गाऱ्हाणी आपुलकीने प्रसिद्ध करणारीच ही सर्व वृत्तपत्रे असल्यामुळे सरकारजवळ जातीयतेच्या

रडगाण्याशिवाय दुसरे कारण असेलच तर ते सरकारची बदनामी करण्याचे असू शकेल. झाले ! सरकार ज्या गोष्टी प्रत्यक्ष करते त्या जगापुढे मांडल्याने जर सरकारची बदनामी होत असेल तर प्रथम सरकारने आपला उद्योग बंद करावा. हा वास्तविक सरळ मार्ग आहे. पण तसे न करता त्याची माहिती जगाला देणारांना दोषी ठरवून आपल्या अधिकारात असलेली शिक्षा देऊनही ते मोकळे झाले आहे. सत्तेच्या मदाने धुंद झालेल्यांची वागणूक ही अशीच आढळते, सत्तेपुढे शहाणपणा चालत नाही ही म्हणही त्यामुळेच प्रचारात आली आहे. सत्तेचा उपभोग सर्वांना सारखा घेता यावा म्हणूनच तिच्या ठिकाणी निसर्गाने धुंदी निर्माण करून ठेवली आहे.

## लोकपक्षालाच विजय मिळेल

हैद्राबाद सरकारने पाजळलेले हे दडपशाहीचे शस्त्र निष्ठावंत कार्यकर्त्यांना अधिक उत्साहित करण्यासच कारण होईल अशी आम्हाला खात्री आहे. कारण त्यांना दडपशाहीच्या अधिक भयंकर शस्त्राचे वार आपल्या छातीवर घ्यावयाचे आहेत याची कल्पना आहे. अर्धवट लोक आरंभीच्या टोल्यातच गडगडतील पण अशा लोकांच्या खोगीरभरतीने कार्याचा नाश होत असल्यामुळे ते अशा प्रकारे गळाले तर त्याबद्दल खेद मानण्याचे कारण नाही. एकंदरित फार थोड्या अवधीत सत्ता बळकावून जुलूम करण्यास सवकलेल्या संपन्न पक्षाचा व लोकपक्षाचा लढा रंगणार अशी चिन्हे दिसत आहेत. 'सत्य तेथे जय' हा त्रिकालाबाधित सिद्धांत असल्यामुळे आज ना उद्या लोकपक्षाला जयश्री माळ घालणार यात वाद नाही. प्रश्न फक्त आज की उद्या हा आहे. या प्रश्नाचे उत्तर लोकपक्षातील श्रीमंतांच्या त्यागावर, तरुणांच्या धैर्यावर व मुत्सद्यांच्या कौशल्यावर अवलंबून राहील. सुदैवाने हैद्राबादेत त्यागी, श्रीमंत, धैर्यवान तरुण व कुशल मुत्सद्दी यांची वाण नाही. या तिघांचा संयोग कसा व्हावा हाच काय तो अवघड प्रश्न आहे. आमच्या कल्पनेप्रमाणे तरुण व मुत्सद्दी हे बरेच जवळजवळ आलेले आहेत. श्रीमंतही लौकरच येऊन मिळतील अशी आशा करू या.

**नागरिक** : दि. २५ ऑगस्ट १९३८

# हिंदुस्थानचाच अविभाज्य भाग

## अधिकारमदाचा दर्प

कायदे मंडळाच्या अधिवेशनारंभी गव्हर्नर किंवा गव्हर्नर-जनरल यांची भाषणे होण्याची पद्धती, ब्रिटिश इंडियात आता जुनी झाली आहे. नोकरशाहीच्या अध्वर्यूंच्या या भाषणातून तिच्या अन्यायी व जुलमी राज्यकारभाराचे समर्थन व त्याला विरोध करणारांना दडपून टाकण्याचा निश्चय हा बहुधा व्यक्त झालेला असावयाचाच. काँग्रेसच्या अधिकार स्वीकारानंतर ही अशी भाषणेच काय पण ती करणारांची नांवेदेखील आता वृत्तपत्रातून फार क्वचित वाचावयास मिळतात. ब्रिटिश हिंदुस्थानातील ही जुनी झालेली प्रथा आता संस्थानांतून प्रसार पावत आहे. गेल्या आठवड्यात हैद्राबाद-कायदेमंडळाच्या अधिवेशनारंभी रा. ऑ. सर अकबर हैदरी साहेबांनी केलेले लाबलचक भाषण हे त्याचे ताजे उदाहरण आहे. सरसाहेबांच्या या भाषणात नोकरशाहीच्या नेहमीच्या संवयीप्रमाणे अधिकारमदाचा दर्प व सत्यापलाप करणारे युक्तिवाद व्यक्त झालेले आहेत. या अशा दर्पोक्तींचा व युक्तिवादांचा सर्वत्र निषेध केला गेलेला आहे. तो यावेळीही केला जाईलच.

## शेतकऱ्याची जात कशाला शोधता?

सर हैदरांनी प्राथमिक औपचारिक चार शब्दानंतर संस्थानातील शेतकऱ्यांसाठी केलेल्या सुधारणांचा पाढा प्रथम वाचला आहे. शेतकऱ्यांच्या उत्कर्षाचा प्रश्न सर्वस्वी आर्थिक स्वरूपाचा आहे. पण हा सोडवताना देखील हैद्राबाद सरकारला आपले जातीयतेविषयीचे प्रेम लपवता आलेले

नाही. शेतकऱ्यांच्या कल्याणासाठी म्हणून केलेल्या तीन सुधारणांपैकी दोन आम्ही अद्याप बारकाईने पाहू शकलो नाही. त्यामुळे त्यासंबंधी आम्ही आज काही लिहू शकत नाही. तथापि या तीन सुधारणापैकी जमिनीच्या देवघेवीशी संबंधित असलेली तिसरी सुधारणा फार महत्वाची आहे. तिची रचना जातीय तत्त्वावर करून संस्थानात जातीयतेच्या विषाला पसरवण्यास सरकारने कशी मदत केलेली आहे याचे स्पष्टीकरण आम्ही गतांकीच केले आहे. हा अर्थशास्त्रांतर्गत प्रश्न सोडविण्यासाठी संरक्षित शेतकऱ्यांची व्याख्या सरळपणे शेतसाऱ्यावरून न ठरविता, हैद्राबाद सरकारला जातीयतेच्या आडरानात शिरण्याचा मोह अनावर झालेला आहे. ही चूक- ही चूक नाही, हा गुन्हा आहे- प्रामाणिकपणे मान्य करून सुधारण्याऐवजी त्यावर मखलाशी करणारी भाष्ये केली जात आहेत. शेतकऱ्यांना संरक्षण देताना त्यांच्या जातीचा प्रश्न विचारात घेण्याची सरकारला का गरज भासावी हे कोडे, सरकारची जातिनिष्ठा मान्य करण्या-शिवाय सोडविण्यास दुसरा मार्गच सापडत नाही. सारांश, शेतकऱ्याच्या कल्याणाच्या उदात्त हेतूखाली हैद्राबाद सरकारची जातीयता लपवण्याचा सरसाहेबांनी आपल्या भाषणात आरंभापासून प्रयत्न केला आहे.

## चळवळ अधिक उसळेल

संस्थानातील मुसलमान समाज नेहमीच ओरडत असतो की, या बहुजन समाजाच्या चळवळी बाह्य उत्तेजनामुळेच निर्माण झालेल्या आहेत. या मताशी सरसाहेब व हैद्राबादचे सरकार सहमत असल्याचा पुरावा या भाषणात सापडत आहे. हैद्राबादेतील मुसलमानांना, हैद्राबाद संस्थान पूर्णपणे स्वतंत्र आहे असे वाटते व संस्थानाबाहेरच्या जगाशी आम्हाला संबंध ठेवण्याची आवश्यकता नाही असेही ते प्रतिपादन करतात. पण त्यांचे हे वाटणे व प्रतिपादन सर्वस्वी स्वार्थमूलक व अन्यायकारक आहे. गेल्या पाच पंचवीस वर्षांत संस्थानात जी जातीयतेची जोपासना झाली ती अलीगढ व इतर ठिकाणांहून मुद्दाम आणवलेल्या लोकांच्या कर्तृत्वामुळे. हा प्रश्न बाजूला ठेवला तरी, अनेक सुधारणा करण्याच्या निमित्ताने इंग्रज सरकारकडून अधिकारी घेतले गेलेले आहेत व खुद्द सर हैदरी हे त्यापैकीच एक होत. इंग्रजी राज्यात झालेल्या अनेक सुधारणांच्या

नकला आमच्या येथे केलेल्या आहेत. मग बाहेरच्या लोकपक्षीय चळवळीचे परिणाम संस्थानातील लोकांवर होऊन त्यांनी चळवळी आरंभल्याबद्दल एवढा आक्रोश करण्याचे कारण काय? चांगल्याचे अनुकरण नेहमीच केले जाते. शेजारच्या प्रांतांतील लोकांना स्वराज्याचे थोडेफार हक्क चळवळ केल्यामुळे मिळालेले पाहून संस्थानातील जनतेला चळवळ करावीशी वाटल्यास त्यात अनैसर्गिक असे काहीच नाही. संस्थानातील चळवळी, बाहेरच्या चळवळीचे अप्रत्यक्ष परिणाम आहेत हे आम्हाला मान्य आहे. पण केवळ त्यावरून त्यांचा प्रत्यक्ष संबंध बाहेर जोडणे व त्या कारणाधारे त्यांचा गळा दाबणे सर्वस्वी अन्यायाचे आहे. बाहेरच्या चळवळीचे धक्के संस्थानातील जनतेला बसल्याशिवाय राहू शकत नाहीत. हैद्राबाद हा हिंदुस्थानचाच एक अविभाज्य भाग आहे व राहील. तो स्वतंत्रपणे राहू शकत नाही. ही विभागणी कृत्रिमतेच्या पायावर उभारलेली असल्यामुळे ती टिकू शकत नाही. हैद्राबादेतील जनता भारतीय स्वातंत्र्य संग्रामापासून दूर राहू शकत नाही ही गोष्ट सरसाहेबांना ज्ञात नाही काय? मग संस्थानातील चळवळी बाह्योत्तेजनामुळे होत आहेत म्हणून त्या बंद झाल्या पाहिजेत या म्हणण्यात काय अर्थ? असलाच तर, तो मुसलमानांचा स्वार्थ हाच असू शकतो. त्याचे रक्षण करणे हे हैद्राबाद सरकारला आपले ब्रीद वाटत आहे असाच निष्कर्ष, सरकारच्या या चळवळी दडपण्याच्या प्रयत्नांतून निघतो. लोकांच्या चळवळी सत्याधिष्ठित असतात व म्हणून त्या दडपणाने दडपल्या जाण्याऐवजी अधिकच उसळत असतात. सर साहेबांनी हे ओळखण्याची आता वेळ आली आहे.

यावर कदाचित असा युक्तिवाद केला जाण्याचा संभव आहे की, सर हैदरीच्या मंत्रिमंडळाला फक्त बाहेरच्या जातीय चळवळीच्या प्रसाराला आळा घालावयाचा आहे. वस्तुस्थिती जर अशी असती तर आम्ही सर्वांच्या अगोदर मंत्रिमंडळाचे अभिनंदन केले असते. दुर्दैव आहे आमचे की, वस्तुस्थिती याहून निराळी आढळते. अगदी अलीकडे घडलेली उदाहरणे विचारात घेतली तरी ही गोष्ट अगदी स्पष्ट होऊ शकते. दे. भ. वीर नरीमन यांना धंद्यासाठी संस्थानात येण्याची करण्यात आलेली मनाई

घ्या की दे. भ. पट्टाभी सीतारामय्यांना केलेली मनाई घ्या. काय हे जातीयतेचे प्रचारक आहेत ? याच्या उलट मौ. शौकत अल्लीना दोनशे रुपयांचा तनखा हैद्राबाद सरकार देत आहे व बॅ. जीना यांचे स्वागत करण्यास सदा सिद्ध आहे. ही दृश्ये दिसत आहेत. याचा इत्यर्थ एवढाच की जनतेने राजकीय चळवळ करून लोकमताला जबाबदार अशी राज्य पद्धती मागू नये. सरकारने एकवेळदेखील राजकीय सभेला परवानगी दिलेली नाही.

## आर्य समाजावर आक्रमण

सर साहेब आपल्या भाषणात पुढे म्हणतात की, पूर्वापार फर्मानांच्याद्वारे धार्मिक स्वातंत्र्य संरक्षणाची दिलेली हमी आजही खरी व जिवंत असलीच पाहिजे. सर साहेबांच्या धार्मिक स्वातंत्र्याची व्याप्ती; मुसलमानांच्या धर्मांतराच्या सशस्त्र व इतर अनेक मार्गांनी चाललेल्या चळवळीपर्यंतच असावी अशी आम्हाला साधार भीती वाटते. कारण या चळवळीचा प्रतिकार करून आपल्या धर्मबांधवांना धर्मांतर करण्यापासून परावृत्त करणारा आर्यसमाज सरकारला जातीयता प्रसारक व म्हणून ठार मारण्यास योग्य असा वाटत आहे. हैद्राबादेतील आर्य समाजावर आज मुसलमान व सरकार यांचे सांघिक व वैयक्तिक तसेच उघड व लपून इतके आक्रमण होत आहे की, त्याला काही मर्यादा नाही. एखाद्या प्लेगच्या उंदराप्रमाणे आर्यसमाजियांकडे आज बघण्यात येत आहे. आजच्याच अंकात आम्ही जनगावची एक बातमी हैद्राबादेतील एका उर्दू पत्रावरून दिली आहे. मि. भरूचा यांच्या अध्यक्षतेखाली भोंगीर येथे जिल्ह्यातील सावकारांची सभा भरणार होती. तिला हजर राहण्यासाठीं जनगावच्या तहसीलदारांनी तेथील सावकारांना सूचना दिल्या होत्या. हे सावकार भोंगीरला जाण्यासाठी स्टेशनवर जाऊन पुनः घरोघर परतले. याच्या मुळाशी आर्यसमाजच असावा असा तेथील पोलीसला संशय असून ते त्या संबंधी चौकशी करीत असल्याचे या बातमीत सांगितले आहे. सावकारी नियंत्रणाची माहिती देण्यासाठी बोलावलेली सभा व तिला हजर न राहण्याचा प्रचार करण्याचा संशय आर्यसमाजावर ! अशी अनेक

उदाहरणे देता येतील. त्यावरून सर साहेबांचे धार्मिक स्वातंत्र्य संरक्षण म्हणजे आज संस्थानांत धुडगूस घालीत असलेल्या गुंडगिरीचे संरक्षण आहे काय? असा संशय उत्पन्न होतो.

## धर्मांतराची चळवळ

सर साहेब म्हणतात की, धर्म व जातीयता आणि राजकारण व जातीयता यांच्यात भेद करण्याची आता वेळ आली आहे. ठीक आहे. फार उत्तम गोष्ट आहे. पण तो भेद कोठे, कसा व कोणी करावयाचा यासंबंधी सर साहेबांनी काहीच स्पष्टीकरण केलेले नाही. धर्म व जाती या परस्परावलंबी आहेत व त्यात निराळेपणा आणणे शक्यतेतील नाही असे आमचे मत आहे. इस्लाम धर्माचा अनुयायीच फक्त मुसलमान जातीचा घटक असू शकतो. इस्लाम धर्माला न मानणारा, मुसलमान कधी असू शकतो काय? असला तर त्याची गणना 'काफीर' मध्ये केली जाईल. मुसलमान जाती याचा अर्थ इस्लामप्रणीत धर्माच्या अनुयायांचा संघ किंवा गट असाच करावा लागतो व आहेही. मग धर्म व जातीयता यांच्या विभक्तीकरणाच्या भाषेत काय अर्थ आहे? संस्थानात चालू असलेली मुसलमानांची धर्मांतराची चळवळ ही धार्मिक व आपल्या भ्रष्ट झालेल्या बांधवांना शुद्ध करणारी व इतरांना धर्मांतरापासून परावृत्त करणारी आर्यसमाजाची चळवळ ही जातीय असाच भेद सरकार करू इच्छिते काय? धार्मिक स्वातंत्र्याच्या नावाखाली मुसलमानांच्या आक्रमक चळवळींना संरक्षण देण्याची सरकारची इच्छा असलीच तर याच चळवळीला याच मराठवाड्यात जे एकेकाळी उत्तर दिले गेले तेच आताहि मिळेल असे अनुमान करण्यात फारशी चूक होईल असे आम्हास वाटत नाही. एकंदरित सरकारच्या या विभक्तीकरणाच्या भाषेत 'इस्लामच्या आक्रमक चळवळीचे संरक्षण व तिच्या विरोधकांना कडक शासन' हाच अर्थ भरलेला जाहे असे आम्हास वाटते.

जी स्थिती धर्म व जातीयता यांच्यात भेद कण्याची तीच स्थितीं राजकारण व जातीयता यांच्यात भेद करण्याची आहे. मुसलमान जाती ही अल्पसंख्य असून राज्यकारभार ८५ टक्के तिच्या स्वाधीन आहे. फेडरेशनच्या आगमनाने राज्यकारभार लोकमतानुवर्ति झाल्यास आपल्याला

१५ टक्क्यावर यावे लागेल व ७० टक्के जागा सोडाव्या लागतील अशी तिला साधार भीती वाटत आहे. तिला वाटणारे भय सर्वस्वी राजकीय स्वरूपाचे आहे पण त्यावर जातीची संख्या भल्याबुऱ्या मार्गाने वाढविणे हा शुद्ध जातीयच उपाय आहे. आणि तो आज प्रत्यक्ष करीत आहे. परंतु ही चळवळ सरकारला धार्मिक व म्हणून संरक्षणाला योग्य वाटत असल्याचे दिसत आहे.

सरकारला मुसलमानांची धर्मांतराची आक्रमक चळवळ धार्मिक म्हणून कशाही स्थितीत संरक्षावयाची आहे, पण सरकारचा शेकडा ८५ असलेला मुसलमान नोकरवर्ग या धर्मांतराच्या चळवळीला काहीसुद्धा मदत करीत नाही असेही म्हणावयाचे आहे. सरकारचा हा सेवकवर्ग अस्सल ‘ कर्मयोग्यांचा ’ संघ आहे. सरकारी सत्तेचा उपयोग करताना त्याला आपल्या जातीचा, धर्माचा किंवा भावी पिढ्यांच्या ऐषारामाचा कधी चुकून विचार येत नाही, असे सरकारचे म्हणणे आहे. आपण पिढ्यान् पिढ्या उपभोगीत आलो ती सत्ता भावी पिढ्यांना उपभोगावयास मिळणार नाही हे कळून सवरून धार्मिक स्वातंत्र्य रक्षणाची हमी सरकारने दिली असून व पुरावा निर्माण होऊ न देता संख्या वाढवण्याच्या चळवळीला मदत करणे सत्ता हाती असल्यामुळे शक्य असता तो ती करत नाही हे म्हणणे कितपत खरे असू शकते ?

## दांभिक आश्वासन

सर्व जातीच्या एखाद्या संघटित संस्थेने आपली काही दु:खे मांडल्यास ती सरकार अवश्य दूर करण्याचा प्रयत्न करील, असे गोड आश्वासन देण्यास सरसाहेब विसरलेले नाहीत. लोकांच्या पुढे हे आश्वासनाचे मृगजल ठेवताना सरसाहेबांची लोकांच्या बाबतीत काय कल्पना होती ? वेड्या व अज्ञ हरिणांच्या कळपाप्रमाणे ते त्यांच्या मागे धावतील असे वाटले काय? संस्थानातील धर्मवेड्या मुसलमानांच्या मते काँग्रेस ही जातीयच आहे. सरसाहेब या मताशी सहमत होणारे आहेत की नाही हे अद्याप स्पष्ट झालेले नाही. तथापि त्या काँग्रेसला मुस्लिम-लीगला आपलेसे करता आलेले नाही हे सरसाहेबांना सांगण्याची गरज नाही. जे काँग्रेसला अशक्य झाले ते हैद्राबादेतील संस्थानी जनतेला शक्य करून दाखविण्याची अट पुढे

मांडताना सरसाहेबांना तिच्या पूर्ततेची अशक्यता दिसत असल्यामुळेच त्यांनी ती मांडलेली आहे याबद्दल संशयच नाही. संस्थानातील मुसलमान अगोदरच ८५ जागा घेऊन बसलेले आहेत. मि. जीनांनी महात्माजींना बंगल्यात येऊ देऊन बोलण्याचे सौजन्य तरी दाखवले. एवढे सौजन्य दाखविण्याचीही संस्थानातील मुसलमानांना आज गरज नाही. त्यांना आज काही मिळवावयाचे नाही. त्यांच्यापुढे लुटीच्या मालाचे सरक्षण करण्याचा प्रश्न आहे. जे एकाला औषध ते दुसऱ्याला विष होत असल्यामुळे आज तरी सर्व जातींची संघटित संस्था संस्थानात निर्माण होणे अशक्य आहे व म्हणूनच सरसाहेबांचे आश्वासन म्हणजे नुसती भुलावणी आहे. ही गोष्ट लोकमतानुवर्ती सरकार-संस्थानात स्थापन होईल तेव्हाच फक्त शक्य आहे. पण त्यावेळी लोक सरसाहेबांच्या या आश्वासनाचे भुकेलेले असणार नाहीत.

पण सरसाहेबांच्या या गोड आश्वासनात आणखीही खोल अर्थ भरलेला आहे. तो हा की, मुसलमानांच्याशिवाय असलेल्या सर्व संस्था जातीय अतएव राजद्रोही ठरवून बंद करणे व त्यांच्या कार्यकर्त्याकडून "Highest penalty" वसूल करणे. मुसलमानांना एकीकडे डोक्यावर घ्यावयाचे व दुसरीकडे हिंदूना जातीय ठरवावयाचे! त्याशिवाय बहुजन समाजाला मारण्यास दुसरा उपायच काय?

पण एक प्रश्न असा उत्पन्न होतो की, "जातीयतेसारखा सरकारविरुद्ध दुसरा गुन्हा नाही" असे ओरडणारे सरकार, आपल्यापुढे येणाऱ्या तक्रारी कोणच्या जातीच्या लोकांनी मांडल्या आहेत; त्या तक्रारी-अर्जावर अमक्या जातीच्या लोकांच्या सह्या आहेत की नाहीत या गोष्टींचा तरी प्रथम का विचार करते? तक्रारी मांडणारात काही मुसलमान आहेत की नाहीत हे प्रथम पाहणारे सरकार स्वतःला/कितीही 'जातीयतेपासून दूर' म्हणवीत असले तरी ती त्याच्या हाडात, मांसात, रक्तात भिनलेली आहे हे जगाला कळू शकते. तक्रारीचा विचार, तक्रार करणाराची जात विचारात घेतल्याशिवाय करणे शक्य नाही काय? निदान आज तरी ते हैद्राबाद सरकारला शक्य आहे असे दिसत नाही.

## लढ्यानेच प्रश्न सुटेल

सारांश सरसाहेबांचे हे भाषण म्हणजे जातीयतेचे विकट हास्य व संस्थानातील नागरिकांच्या नागरिकत्वाला उघड-उघड आव्हान आहे. या आव्हानाचा त्वरित स्वीकार न केला जाईल तर जातीयतेचे अधिक भीषण तांडव सुरू झालेले त्यांना पाहणे भाग पडणार आहे. बहुजन समाजाला नाना प्रकारे आज चिडवले जात आहे. या परिस्थितीवर फक्त एकच उपाय आहे व तो म्हणजे नागरिकत्वाच्या हक्काचा लढा ताबडतोब सुरू करणे. मुसलमान लोक या लढ्यात भाग घेणार नाहीत, सरकार या लढ्याला जातीय ठरवण्याचा अट्टाहास करील, कार्यकर्त्यांना जबर शिक्षा ठोठावील, त्यांचा अनन्वित छळ करील, बातम्या बाहेर जाऊ देणार नाही वगैरे गोष्टी अगदी खऱ्या ठरणाऱ्या आहेत, पण त्या घडल्या म्हणजेच. सारांश संस्थानातील प्रत्येक नागरिकाने नागरिकत्वाच्या हक्काचा लढा लढविण्यासाठी आपापल्या परीने मदत करावयास अहमहमिकेने पुढे येण्याची आता वेळ आलेली आहे. या लढ्यानेच लोकमताला जबाबदार असे सरकार स्थापन होऊ शकेल. ते जोपर्यंत स्थापन होणार नाही तोपर्यंत हैद्राबाद सरकारच्या जातीयतेचा नंगा नाच बंद होऊ शकत नाही. महाराष्ट्र परिषदेने नागरिक-स्वातंत्र्य-संपादन समिती नेमलेली आहेच. सुदैवाने तिचे अध्यक्षपद श्री. काशीनाथरावजी वैद्य यांच्यासारख्या सुयोग्य व्यक्तीने मंडित केलेले आहे. आम्हाला आशा आहे की समिती समयोचित कार्य करून दाखवील.

**नागरिक** : दि. १ सप्टेंबर १९३८

# संग्राम सुरू झाला

## असंतोषाचा अग्नी

आपल्या प्रजेची गाऱ्हाणी, सहानुभूतिपूर्वक ऐकून ती दूर करणे हे प्रत्येक सरकारचे आद्य कर्तव्य आहे. हे कर्तव्य तत्परतेने पालन करणारे सरकार, प्रजेतील प्रत्येक घटकाला प्रिय असते. जेव्हा याच्या उलट परिस्थिती असते, प्रजेची गाऱ्हाणी ऐकण्याऐवजी ती पुढे मांडण्यासच बंदी करण्याचा जुलूम जेव्हा सरकार करते तेव्हा प्रजेच्या अंतःकरणात सरकारविषयी आपुलकीची भावना असत नाही. बहुजन समाज हा नेहमीच उदासीन व अज्ञ असल्यामुळे या आपुलकीच्या अभावाचे प्रदर्शन आरंभी फारसे स्पष्ट होत नाही. पण समाजातील काही तेजस्वी व्यक्तींच्या दिव्य त्यागाने, सर्व आकाश मेघमंडळाने व्यापून सर्वत्र गडद अंधःकार पसरला असताना ज्याप्रमाणे विद्युल्लतेच्या क्षणैक चकाकण्याने जगाचे अस्तित्व भासमान होते त्याप्रमाणे, या आपुलकीच्या अभावाचे असंतोषाचे दर्शन मधून मधून होत असते. हा असंतोषाचा अग्नी भडकण्यास सरकारचे जुलूमच कारण होऊ शकतात. आणि एकदा का हा अग्नी भडकला म्हणजे मग तो कसल्याही जबरदस्त सत्तेची राखरांगोळी केल्याशिवाय राहात नाही. पौराणिक कालातील रावण-कंसाची, ऐतिहासिक कालातील ग्रीक-रोमन इत्यादी व विद्यमान कालातील झारशाहीसारखी राज्ये अशीच नामशेष झाली आहेत. इंग्रजांचे साम्राज्य एवढे मोठे असतानाही थोड्याफार प्रमाणात आपल्याच देशबांधवांनी वाकवलेले आपण आज पाहतच आहो की नाही ?

आपल्या बहुसंख्य प्रजेची गाऱ्हाणी न ऐकण्याचा हैद्राबाद सरकारने निश्चयच केला आहे. अन्याय होत असतानाही त्यासंबंधी ब्रसुद्धा प्रजेने काढू नये म्हणून सरकार आपल्या हाती असलेल्या सत्तेचा दुरुपयोग करण्याच्या हट्टाला पेटले आहे. सरकारच्या या जुलमी वागणुकीचा परिणाम प्रजेतील असंतोषाच्या ठिणग्या एकत्र होण्यातच होऊ शकतो. प्रजेतील असंतोष कोणच्याही जुलमी सत्तेला आजपर्यंत दाबता आलेला नाही. कार्यकर्त्यांच्या छळाने तो अधिकांत अधिक भडकत असतो. जनतेच्या असंतोषाला व्यक्त होण्यास परवानगी नाकारून हैद्राबाद सरकारने प्रथम अडथळा केला. सरकारचा हा प्रयत्न काही काळ यशस्वी झाला असे वाटले, पण अनुकूल संधी सापडताच शेजारच्या प्रांतांचे साहाय्य घेऊन असंतोषाचा अग्नी व्यक्त झाला, भडकला. सरकारने दटावण्या देणारी पत्रके काढून पाहिली पण त्याचाही काही उपयोग झाला नाही. शेवटी लाजलज्जा गुंडाळून सरकारने १५ वृत्तपत्रे बंद केली. ज्या पत्रांचे मूळ क्रीडांगण हैद्राबाद संस्थान नाही त्यांचीच या १५ त बहुसंख्या असल्यामुळे सरकार हा असा अपमानास्पद डाव पुन्हा खेळणार नाही असे काही जणाना वाटत होते पण सारासार विचाराचे वाटोळे झालेले सरकार शेवटी तोही खेळलेच. सरकारने आणखी ६ वृत्तपत्रांना बंदी घालणारा, बंदी करणारा हुकूम काढला आहे. लोकपक्ष आणि सरकार यांच्यात संग्राम सुरू झाला आहे.

## लोकपक्षाचाच विजय होईल

संस्थानातील अरेरावी राज्यकारभाराची यथार्थ कल्पना जगाला फार पूर्वीच आलेली आहे. हिंदुस्थानातील सत्ताधिष्ठित कॉंग्रेसला तिची चांगली ओळख आहे. म्हैसूर, त्रावणकोर वगैरे संस्थानांतील स्वातंत्र्य संग्रामात कॉंग्रेसने अप्रत्यक्ष भाग घेतलेला आहे. हैद्राबादेतील जनतेने, कार्यकर्त्यांना आपली त्यागाची शक्ती जगापुढे मांडण्यासाठी पुरेसे द्रव्य साहाय्य केल्यास व त्याप्रमाणे ती जगापुढे आल्यास कॉंग्रेस व इतर संस्था आपापल्यापरीने हैद्राबादेतील संग्रामात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष भाग घेतल्याशिवाय रहाणार नाही. हैद्राबाद सरकार आपल्या राज्य मर्यादेबाहेरील लोकांना "आऊट साईडर्स" म्हणून संबोधित असले तरी ह आऊट

साइडर्स संस्थानातील लोकांना आपलेच बांधव समजत आहेत. अशावेळी संस्थानातील जनतेने व विशेषतः श्रीमंतांनी आपापल्या सामर्थ्यानुरूप कार्यकर्त्यांना वीर मरण मरण्यासाठी भरपूर द्रव्य-साहाय्य करणे जरूर आहे. त्यांनी लोकपक्षाला अपयश येईल अशी शंकादेखील घेण्याचे कारण नाही. सत्य हे त्रिकालाबाधित व नेहमी विजयीच असते. याच सत्याच्या पायावर लोकपक्ष उभा असल्यामुळे या संग्रामात विजयश्री त्यालाच माळ घालील हे निर्विवाद आहे. प्रश्न फक्त कालाचा आहे. त्याचे उत्तर जनतेच्या त्यागावर आहे.

**संग्राम : दि. ८ सप्टेंबर १९३८**

# हैद्राबाद काँग्रेसला बंदी

## सरकारची अमानुषता

गेल्या आठवड्यात हैद्राबादेतील जात्यंध सरकारने फर्मानांची एक फैर झाडून आपली जात्यंध व अन्यायी वृत्ती अधिक स्पष्टपणे जगाच्या निदर्शनाला आणली आहे. सरकारच्या या जुलमी वागणुकीचा संस्थानाबाहेरील स्वतंत्र विचारसरणीच्या बहुतेक वृत्तपत्रांनी तीव्र निषेधच केला आहे. ज्या हैद्राबादेतील जनतेवर जुलमाचे असह्य आघात होत आहेत ते तिला बोलून अथवा लिहून दाखवण्याचे साधे माणुसकीचे हक्कही या अमानुष सरकारने ठेवले नाहीत. संस्थानातील जनतेने बाहेरून या दुःखांना वाचा फोडण्याचा प्रयत्न केला तर तोही, सरकारला खपत नसून एखाद्या गिधाडाप्रमाणे, एखादे पत्र निघाले रे निघाले की पोलीस खाते त्याच्यावर तुटून पडते व सरकार त्याच्यावर डोळे झाकून शिक्कामोर्तब करते ! सारांश, प्रजेची दुःखे सहानुभूतिपूर्वक ऐकून ती दूर करण्याचा राजधर्म हैद्राबाद सरकारने पूर्णपणे सोडला आहे. सरकारने आपला प्रजापालनाचा धर्म सोडून प्रजेला अनंत प्रकारे छळण्याचा विडा उचलल्यानंतर अशा कर्तव्यच्युत व अकर्तव्यप्रधान सरकारविषयी राजनिष्ठा बाळगण्याचे प्रजेला प्रयोजनच उरत नाही. अशा विपरीत प्रसंगी बेजबाबदार व अरेरावी सरकारच्या कायद्यांचा सविनय भंग करून आपल्या दिव्य त्यागाने त्याला वठणीवर आणणे हाच प्रजेचा खरा धर्म ठरतो. हैद्राबाद सरकारच्या अविचारांची गाडी, संस्थानातील कार्यकर्त्यांना कारागृहात डांबण्याच्या, हद्दपार करण्याच्या व इतर अनेक प्रकारे छळण्याच्या दगडी भिंतीवर आपले

डोके आपटून घेतल्याशिवाय थांबणे शक्य दिसत नाही. सर हैदरी-साहेबांनी काढलेली सध्याची सिमल्याची वारी पुढील योजनांना संमती मिळविण्यासाठीच असावी असा व्यक्त होत असलेला संशय फारसा चुकीचा ठरणार नाही अशी आमची कल्पना आहे. कुंभाराचे लाडके बाळ एक दिवस उकिरड्यावर दिसेलच.

## लोकांना फसवणारा बागुलबुवा

गेल्या आठवड्यात काढलेल्या फर्मानात हैद्राबाद स्टेट काँगेसच्या स्थापनेला बंदी करणारे एक कलम आहे. हैद्राबाद सरकारच्या या फर्मानाचा अर्थ सांगावयाचा झाल्यास तो "सरकारने बाह्यतः काहीही कारणे दाखविली असली तरी सरकारचा हे फर्मान काढण्यातील अंतस्थ हेत् जनतेची जबाबदार सरकार स्थापन करण्याची चळवळ अत्यंत निराधार व खोडसाळ आरोपाधारे नेस्तनाबूद करण्याचाच आहे याबद्दल फर्मानातील शब्दाधारेच कोणाचीही खात्री पटू शकते" असा सांगावा लागेल. याची साक्ष "Apart from the fact of the resolve of the Indian National Congress itself that the internal struggles in the states should not be associated with its name, Government objects to its use, not only becaus it is being utilised for communal ends but also because it inevitably suggests association in the public mind with an organisation which has acquired a definite connotation in the light of the special conditions of British India which have no parallel in the state." हे फर्मानातील शब्द स्पष्टपणे देत आहेत. या संस्थेचा उपयोग जातीय हेतू साधण्यासाठी केला जाईल म्हणूनच नव्हे तर शब्द सादृशामुळे लोकांच्या मनात बाहेरील अशा संस्थेच्या संबंधाची कल्पना अपरिहार्यतेने येते की ज्याला ब्रिटिश हिंदुस्थानातील विशेष परिस्थितीच्या उजेडात काही निश्चित अर्थ प्राप्त झालेला आहे, म्हणूनही सरकार आक्षेप घेत आहे. बाहेरची संस्था म्हणजे इंडियन नॅशनल काँग्रेस होय हे उघड आहे. या संस्थेला बाहेरच्या विशेष वातावरणात जो अर्थ

प्राप्त झाला आहे तो हा आहे की, काँग्रेस हीच एक अखिल हिंदुस्थानां-तील जनतेची खरीखुरी व सर्वांत मोठी प्रातिनिधिक संस्था आहे, काँग्रेस जातीयतेची, अरेराव्याची, अन्यायांची शत्रू असून शांतता, असीम त्याग, स्वाभिमान इत्यादींचा मित्र आहे, हिंदुस्थानातील जनतेला जबाबदार असलेले व तिनेच निवडलेले सरकार येथे राज्य करू शकेल व इतरांना ती राज्य करू देणार नाही हा तिचा बाणा आहे. हैद्राबाद सरकारला जबाबदार सरकार स्थापन करण्यास बद्धपरिकर झालेल्या संस्थेच्या नावातील शब्दाचे देखील भय वाटत आहे ते याचसाठी की या शब्दाबरोबर लोकांच्या मनात जबाबदार सरकार स्थापन करण्याची कल्पना बळावेल व सध्याचे बेजबाब-दार सरकार बदलण्याचा प्रयत्न होईल. जनतेत अशांतता पसरवणाऱ्या जातीय संस्था संस्थानात आनंदाने नांदू शकतात. त्यांच्या स्पष्ट जातीय ध्येयाबद्दल सरकारला मुळीच भय वाटत नाही. याबद्दल पुराव्याचे कारण नाही. सरकारने काँग्रेसवर जो जातीयतेचा शिक्का मारला आहे तो "केवळ लोकांना फसवण्यासाठी" उभा केलेला बागुलबोवा आहे. ज्या समूहात मुसलमान नाहीत तो समूह नागरिकांचा नाही व त्याला नागरिकत्वाच्या हक्कासाठी चळवळ करण्याचा अधिकारच नाही, ही सरकारची विचार-सरणी सरकारच्या जात्यंधतेची साक्ष पटवीत आहे. चळवळीत मुसलमान भाग घेत नाहीत याचाच अर्थ जात्यंध सरकारने त्यांना त्यांच्या न्याय्य हक्कापेक्षा अधिक हक्क दिले हा आहे.

## मुळावरच घाव घाला

या अशा परिस्थितीत हैद्राबादेतील जनतेने किरकोळ मतभेद विसरून बेजबाबदार सरकारच्या धमक्याच नव्हेत तर अमानुष अत्याचार शांतपणे सहन करीत कायदेभंगाचा लढा लढविणे हाच एकमेव मार्ग आहे. 'राजा कालस्य कारणं' या सुभाषिताप्रमाणे आजच्या सर्व प्रकारच्या अन्यायाचे खरे व मूळ कारण सध्याचे बेजबाबदार सरकारच आहे ही गोष्ट लक्षात घेऊन या मुळावरच घाव घालणे आजच्या प्रसंगी सर्वतोपरी हिताचे आहे. तप-शिलात अनेक प्रकारचे भेद असू शकतील व अनेकांना अनेक प्रकारच्या सुधारणांचे वैशिष्ट्य वाटत असेल पण त्यासाठी सर्व संग्राहक जबाबदार सरकारची मागणी सर्वांनी एकत्र होऊन आपले बल वाढवून करणे या-

शिवाय दुसरा परिणामकारक मार्ग नाही. प्रत्येकाने आपापले वैशिष्ट्याचे घोंगडे स्वतंत्रपणे पसरल्यास आमची शक्ती दुभंगेल व सरकारला सर्वांनाच दडपणे व वस्तुस्थितीचा विपर्यास करणे फार सुलभ होणारे आहे. प्रसंग ओळखून तरुणांनी आपल्या प्रिय भावना क्षणभर बाजूला सारून या लढ्यात अहमहमिकेने भाग घेतला पाहिजे. आम्हाला आशा आहे की निदान मराठवाड्यातील तरुण वर्ग वादविवादाच्या जाळ्यात यावेळी आपले हातपाय अडकवून न घेता राष्ट्रीय उत्थानाच्या या प्रसंगी छातीचा कोट करून जुलमी सरकारच्या अत्याचाराचे गोळे तीवर आनंदाने घेऊन आपल्या पूर्व परंपरेला अधिक उज्ज्वलता आणील.

## कायदे मोडून तुरुंग भरा

संस्थानी सरकार यावेळी हिंदुस्थान सरकारपुढे गुडघे टेकून आपल्या अत्याचारी राजवटीला प्रत्यक्ष नाहीतर निदान स्वस्थ बसून आशीर्वाद मागण्याचा प्रयत्न करणार हे निश्चितच आहे. हिंदुस्थान सरकारचे "आम्ही आमच्या प्रजेला जेवढे हक्क दिले आहेत तेवढे तरी तुम्ही आपल्या प्रजेला दिलेच पाहिजेत" असा सल्ला देणे हेच कर्तव्य आहे. इंडियन नॅशनल कॉंग्रेसही, संस्थानातील अंतर्गत लढ्यात प्रत्यक्ष भाग न घेण्याचे तिचे आज जाहीर धोरण असले तरी, व्यक्तिशः व अप्रत्यक्षपणे या लढ्याला शक्य ते साहाय्य केल्याशिवाय राहणार नाही अशी आमची पूर्ण खात्री आहे. हैद्राबादेतील प्रजेने लखलखीत त्याग जगाच्या निदर्शनाला मात्र आणला पाहिजे. तसे जोपर्यंत होणार नाही तोपर्यंत कॉंग्रेस काय किंवा हिंदुस्थान सरकार काय, काहीच करू शकणार नाही. दिव्य त्याग जगापुढे येण्याचा मार्ग म्हणजेच सरकारचे जुलमी कायदे शांतपणे मोडून तुरुंग, हद्दपारी, गोळीबार इत्यादी अत्याचार करावयास उत्सुक झालेल्या सरकारला ते करावयास भाग पाडणे. हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसची फेरविचार करण्याची विनंती सरकारने फेटाळल्यास जनता सत्याग्रहाला आरंभ करील अशी आम्हाला आशा आहे.

## स्फूट सूचना– अशांतता उत्पादन

हैद्राबाद सरकारने शांतता-संरक्षक कायदा नुकताच फर्मानाद्वारे प्रचलित केला आहे. 'भित्या पाठीमागे ब्रह्मराक्षस' या म्हणीप्रमाणे आपल्या

जुलमी राजवटीला धक्का बसतो की काय अशी सरकारला रात्रंदिवस भीती वाटू लागली आहे. भीतीच काय पण आपली ही कारकीर्द फार दिवस टिकणे शक्य नाही अशीही सरकारच्या अंतरात्म्याला (तो असलाच तर?) खात्री पटली आहे व म्हणूनच त्याला हा काळा कायदा काढून आपल्या तोंडावरील उरली सुरली पांढुरकी काढून टाकण्याची कुबुद्धि सुचली आहे. मनुष्याच्या बुद्धीचा तोल सुटला म्हणजे दुसऱ्यासाठी तयार केलेल्या खड्ड्यात तो स्वतःच जाऊन पडत असतो. राजकीय हक्काची चळवळ दाबून टाकण्यासाठी केलेला हा कायदा सरकारच्या छातीवर जबरदस्त आघात करील अशी आम्हाला खात्री वाटते. या कायद्याने बाहेरच्या जनतेला चिडविण्याचे श्रेय मात्र सरकारच्या पदरात टाकले आहे. याचा परिणाम बाहेरच्या जनतेने, संस्थानात येण्याचा आपला हक्क सिद्ध करण्यासाठी सत्याग्रह करण्यात न झाला तर सरकारचे भाग्यच म्हणावयाचे. पण सरकारला हे भाग्य लाभेल असे आम्हाला वाटत नाही. त्याचे कारण महाराष्ट्राच्या सत्यवादी सेनापतीने यापूर्वीच जाहीर घोषणा केली आहे व सेनापतीच्या मागे त्याचे सैन्य जाणे अपरिहार्य आहे. 'विनाशकाले विपरीत बुद्धि' या न्यायाप्रमाणे सरकारला बाहेरच्या लोकांना चिडविण्याची दुर्बुद्धी झाली आहे. संस्थानातील प्रजेने आतून व बाहेरच्या लोकांनी बाहेरून हैद्राबाद सरकारवर मारा करावयास आरंभ केल्यानंतर काय परिस्थिती उत्पन्न होईल याची हैद्राबाद सरकारच्या अदूरदर्शी अधिकाऱ्यांना कोठून कल्पना येणार? हैद्राबाद सरकारच्या या काळ्या कायद्याने आत व बाहेर अशांततेच्या उत्पादनालाच मदत होईल याबद्दल शंका नको.

**समरभूमी** . दि. १५ सप्टेंबर १९३८

## कायदेभंगाकडे

### स्थापनेपूर्वीच बंदी

हैद्राबाद स्टेट काँग्रेसला, तिच्या रीतसर स्थापनेपूर्वीच सरकारने बेकायदेशीर ठरवून व तत्पूर्वी एकच दिवस शांतता-संरक्षक-कायदा प्रचलित करून संस्थानातील जनतेत चैतन्य संचरवण्यास फार मोठी मदत केली आहे. ही जुलमी फर्माने निघाल्यापासून हिंदुस्थानातील बहुतेक वृत्तपत्रांनी संपादकीय लेख लिहून हैद्राबाद सरकारचा तीव्र शब्दात निषेध केला आहे. हैद्राबाद स्टेट काँग्रेसने सरकारच्या आक्षेपांना स्पष्ट उत्तर दिले असून फेरविचार करण्याची विनंती केली आहे. गेल्या आठवड्यात पुणे येथे जी खाजगी व गुप्त चर्चा झाली तीवरून सरकार, संस्थानातील भडकत असलेल्या लोकमताला अधिक चिडविता काही पद्धतशीर मार्गाने शांतवील अशी आशा उत्पन्न झालेली होती, पण मुंबईहून आलेल्या ताज्या बातमीने ती समूळ नष्ट करून टाकली आहे. सरकारला आपल्या दडपशाहीचा फार विश्वास वाटत असून जगाने केलेल्या छी:थूची फारशी फिकीर वाटत नसावी असे स्पष्ट दिसत आहे. तथापि या गुप्त व खाजगी घटनेने लोकपक्षाची बाजू अधिक सबळ केली असल्यामुळे तत्संबंधी लोकपक्षाला विषादाऐवजी आनंदच होणार आहे. सरकार आपली अरेरावी वृत्ती यत्किंचितही सोडावयास तयार नाही ही गोष्ट बाहेरच्या जवाबदार लोकनायकाच्या प्रत्यक्ष अनुभवाला आली ही गोष्ट सर्वतोपरी उत्तमच झाली आहे. काँ. वर्किंग कमिटी व ऑ. इं. काँ. कमिटीच्या दिल्ली येथील बैठकीत येणाऱ्या हैद्राबाद सरकारच्या निषेधाच्या ठरावाला त्यामुळे चांगलीच बळकटी येण्यास मदत होणारी आहे.

## दंडुकेशाहीवर फाजील विश्वास

हैद्राबादेतील जनतेला जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीची सनदशीर चळवळ करण्यास भाषण स्वातंत्र्य, लेखन स्वातंत्र्य, संघ स्वातंत्र्य सरकारने नाकारले असून प्रजेत एक प्रकारचे भीतीचे वातावरण निर्माण करून ठेवले आहे. या परिस्थितीतून बाहेर पडण्यास आता या जुलमी कायद्यांना शांतपणे पायाखाली तुडविणे व त्याबद्दल कारागृहवासाच्या शिक्षा जाणून बुजून, आनंदाने, अभिमानाने व कर्तव्य म्हणून स्वीकारणे हाच मार्ग उरलेला आहे. सर हैदरी व त्यांच्या सहकारी मंत्र्यांचा आपल्या दंडुकेशाहीच्या सामर्थ्यावर फार फाजील विश्वास आहे व ते त्याचा उपयोग करून आपली अमानुषता जगापुढे मांडण्यास मुळीच संकोच करणार नाहीत, याबद्दलही शंका वाटत नाही. परंतु याचा परिणाम मात्र हैद्राबाद सरकारची बाजू अधिक निर्बल बनण्यात तसेच लोकपक्ष अधिक सबल होण्यातच होईल याबद्दलही शंका वाटत नाही.

## धैर्य दाखविण्याची वेळ

हैद्राबाद सरकारने प्रचलित केलेल्या नवीन कायद्यात कायदेभंग करणाऱ्या राजबंद्यांना चोर, डाकू वगैरे गुन्हेगारांहून निराळेपणाने वागवण्याची काही तरतूद केलेली दिसत नाही. परकीय इंग्रज सरकारजवळ अशा कैद्यांना ‘अ’ व ‘ब’ वर्गात ठेवण्याची माणुसकी होती. तिचा आमच्या स्वकीय सरकारजवळ गंध उरलेला दिसत नाही. लोकांनी चळवळीपासून परावृत्त व्हावे म्हणून सरकारने कितीही जुलूम करण्याचा निश्चय केलेला असला तरी त्याचा परिणाम लोकांत जागृती होण्यात व त्यांनी अधिक मोठ्या प्रमाणात तीत भाग घेण्यातच होऊ शकेल हे निर्विवाद आहे. आपल्या आप्तेष्ट, मित्रांना सरकार विनाकारण छळीत असलेले पाहून व ऐकून जनतेत तीव्र असंतोषाच्या ज्वाला भडकणे अपरिहार्य आहे. जे लोक आजपर्यंत सरकारच्या विरुद्ध ब्र काढावयास तयार नसत तेच लोक उद्या सरकारच्या जुलमी कायद्यांचा शक्य त्या शांत मार्गाने निषेध केल्यावाचून राहू शकत नाहीत. इंग्रज सरकारजवळ हैद्राबाद सरकारपेक्षा फार मोठे व अद्यावत सैन्य होते. पण त्यालाही शेवटी हार खावी लागलेली आहे. ब्रिटिश हिंदुस्थानातील जनतेलाही प्रारंभी अपयशाचे चटके बसलेले

आहेत व तसेच हैद्राबादेतील लोकांनाही ते कदाचित बसतील. पण हे अपयश लोकपक्षाची सुकीर्ती करणारे, त्याचा आत्मविश्वास वाढविणारे त्याची भिरुता— काही शिल्लक असल्यास— नष्ट करणारेच ठरणार आहे. आणि याचमुळे हैद्राबादेतील जनता सरकारच्या कसल्याही जुलमाला न भीता सविनय कायदेभंग करून जबाबदार सरकार स्थापन करण्याची आपली चळवळ निर्भयतेने सुरू केल्याशिवाय राहणार नाही. हैद्राबादेतील जनतेला आपला अभ्युदय आपल्या त्यागावर अवलंबून आहे ही गोष्ट जितक्या अधिक प्रमाणात व लौकर कळेल तितक्या अधिक प्रमाणात तिला बाहेरच्या जगाचे सर्वतोपरी साहाय्य मिळणार आहे; कॉंग्रेस व इतर संस्था तिच्या या लढ्यात शक्य तेवढे साहाय्य निश्चित करतील याबद्दल तिळमात्र संशय बाळगण्याचे कारण नाही. स्वातंत्र्याची योग्य किंमत दिल्याशिवाय ते आजपर्यंत कोणालाच मिळालेले नाही. त्यासाठी नानाप्रकारचे कष्ट सहन करणे भाग आहे, त्याग करणे अवश्य आहे. हैद्रबादेतील जनता प्रसंगाला अनुरूप असे धैर्य व त्याग अविलंबेकरून दाखवील अशी आम्हाला आशा आहे.

रा. ऑ. सर हैदरीसाहेब यांचा सहकारी वर्ग महात्माजींनी केलेल्या सूचना विचारात घेऊन आपला चुकीचा मार्ग बदलील काय? आम्हाला त्यासंबंधी फारशी आशा वाटत नाही. सरकारच्या पापाचा घडा भरण्यासाठी त्या जुलमी मार्गाचा अवलंब करावा हेच जनतेच्या दृष्टीने अधिक हिताचे ठरणारे आहे. आणि म्हणजेच जनता कायदेभंगाकडे वळणे शक्य आहे.

**रणदुंदुभी :** दि. २२ सप्टेंबर १९३८

# कारागृहाचे दरवाजे उघडा

## जातीयतेची घाण

आलाहजरत निजाम साहेबांच्या आधिपत्त्याखाली जबाबदार राज्य-पद्धती सुरू करण्याच्या सर्वस्वी व स्पष्ट राजकीय उद्देशाने हैद्राबाद स्टेट कॉंग्रेस या संस्थेच्या स्थापनेचा अत्यंत न्याय्य व सनदशीर प्रयत्न, अगदी आरंभापासूनच विध्वंसण्याचा सरकारने अनेकविध मार्गांनी कसा प्रयत्न चालविला आहे, संस्थानातील जनतेला जातीयतेच्या घाणीतच डांबून ठेवून अरेरावी व अन्याय्य राज्यपद्धती पूर्वीप्रमाणेच चालू ठेवण्याचा कसा अट्टाहास करण्यात येत आहे व जातीयतेच्या घाणीने हात व डोके बरबटलेले असताना राजकीय संस्थेच्या स्थापनेला सरकारची हरकत नाही हे व अनेक खोटी विधाने करून सरकार जगाच्या डोळ्यांत धूळ फेकण्याचा कसा प्रयत्न करीत आहे याची खात्री पटवणाऱ्या घटना हैद्राबादेतील वातावरणात दोनचार आठवड्यापासून विशेषत्वाने घडत आहेत. पुणे-मुंबई येथे झालेल्या खाजगी चर्चेचा जो आम्ही गतांकी अत्यंत संक्षेपाने उल्लेख केला आहे त्यासंबंधी 'हिंदू' च्या मुंबई येथील बातमीदाराने अधिक स्पष्ट शब्दांत स्फोट केला आहे. आमच्या माहिती-प्रमाणे 'हिंदू' च्या बातमीदाराने प्रसिद्ध केलेली बातमी बरीचशी दिशाभूल करणारी आहे. 'रहबर' कारांनी या बातमीला ठळक मथळा देऊन जी प्रसिद्धी दिली आहे त्यावरून आमचा समज अधिकच दृढ झालेला आहे. हैद्राबादेतील पत्रे सरकारच्या हातातील कळसूत्री बाहुलीच आहेत हे अनेक वेळा सिद्ध झालेले आहे. गेल्या आठवड्यात सेनापती बापटांचे हैद्राबाद

येथे झालेले आगमन, त्यांना तेथे गेल्यावर केलेली हद्दपारी इत्यादी गोष्टींचा या उर्दू पत्रांनी बातम्यांच्या सदरातदेखील उल्लेख केलेला नाही; हा या प्रकरणी ताजा पुरावा आहे. आमचेकडे आलेल्या विश्वसनीय माहिती-प्रमाणे असे कळते की रा. ऑ. सरसाहेब सिमल्यास जाताना पुण्यास मुद्दाम उतरले व त्यांनी ना. नुरी व ना. मुन्शी यांच्या भेटी घेतल्या. या भेटीत श्री. शंकरराव देव हैद्राबादेस येणार असल्याची बातमी कितपत खरी आहे यासंबंधी माहिती काढण्याचा प्रयत्न केला. श्री. देव येणार असल्यास त्यांनी सरकारची बाजू विचारात घ्यावी अशीही इच्छा सर साहेबांनी व्यक्त केली. सर साहेबांच्या बोलण्यात बराच समंजसपणा व समतोलपणा आहे असे ना. मुन्शींना वाटल्यावरून त्यांनी सर साहेबांना सिमल्याहून परत आल्यानंतर आपल्या मुंबई येथील निवासस्थानी जेवण्याचे निमंत्रण दिले व त्यावेळी श्री. देवही हजर असतील असे सांगितले. सर साहेबांनी निमंत्रणाचा आनंदाने स्वीकार केला व ठरल्याप्रमाणे हा कार्यक्रम पार पडला. दुर्दैवाची गोष्ट ही की सर साहेबांच्या वृत्तीत पुण्यातील भेटीच्या प्रमाणात मुंबईच्या भेटीत कमालीचा प्रतिकूल फरक झालेला आढळला व यजमान आणि पाहुण्यांची मने अधिक जवळ येण्याऐवजी ती अधिकच फाटली. या प्रसंगी ना. मुन्शी, ना. नुरी, श्री. देव, रा. ऑ. सर-साहेब व मि. अलियावर जंग बहादूर ही मंडळी हजर होती.

## हिंदु-मुसलमान 'ऐक्याचे' जुने भूत

मुंबईस झालेल्या या भेटीत रा. ऑ. सर साहेबांच्या भाषणात व्यक्त झालेल्या विचारावरून हैद्राबाद सरकार, हैद्राबाद काँग्रेसला विध्वंसण्यासाठी हिंदु-मुसलमान ऐक्याचे जुने भूत पुन्हा पुनरुज्जीवित करून, नौकऱ्या व इतर किरकोळ प्रश्नांना फाजील महत्त्व आणून, निराश बनलेल्या लोकांना मृगजलामागे धावण्याचा मोह उत्पन्न करून व जुलूम-जबरदस्तीच्या धमक्या देऊन प्रयत्न करणार आणि एवढ्यानेही काम न भागल्यास त्रावणकोर वगैरे संस्थानांत घडत असलेल्या गोष्टींच्या वाढवलेल्या आवृत्त्या काढणार हे जवळ जवळ स्पष्ट झाले होते. सर साहेबांच्या हैद्राबादेस पोचल्यानंतर हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याविषयीच्या प्रयत्नांच्या बातम्या बाहेर आलेल्या असल्यामुळे वरील अंदाज किती अचूक होता हे स्पष्ट

होते. या बातम्यांबरोबर हैद्राबाद स्टेट काँग्रेसवरची बंदी उठणार अशीही बातमी प्रसिद्ध झाली होती. स्टेट काँग्रेसच्या पुढाऱ्यांना जी परवा मि. अलियावरजंग बहादूर यांनी मुलाखत दिली तीत सरकारचे खरे धोरण स्पष्ट झाले असून काँग्रेसने मुसलमानांना खूष न केल्यास व चळवळ केल्यास कार्यकर्त्यांची व पुढाऱ्यांची धरपकड केली जाणार असा तर्क व्यक्त केला जात आहे. या सर्व गोष्टी मुंबईत व्यक्त झालेल्या विचारसरणीच्या अंदाजाला बळकटी आणणाऱ्या आहेत.

## आमचा निकडीचा प्रश्न

हैद्राबादेतील आजचा अत्यंत निकडीचा प्रश्न लेखन-भाषण-संघ-स्वातंत्र्य इत्यादी नागरिकत्वाच्या मूलभूत हक्काचा असून त्याचा शेवट लोकमताला जबाबदार असलेले सरकार स्थापन करण्यात व्हावयाचा आहे. कोणचीही दुःखे मग ती राजकीय असोत, सामाजिक असोत की आणखी कसली असोत, दूर करण्याचा प्रयत्न करण्यासाठी समाजाला लेखन-भाषण-संघ स्वातंत्र्य अगोदर पाहिजे. ते प्रथम दिल्यास तडजोडीने मिळणाऱ्या सवलती कमी असल्या तरी एकवेळ चालतील पण त्यांच्या अभावी मिळणाऱ्या फाजील सवलतीही परिणामी कुचकामाच्या ठरणाऱ्या आहेत. अन्यायाने मिळवलेले हक्क अरेरावीच्या व तरवारीच्या बळावर उपभोगणारे सरकार ते स्वखुषीने व पवित्र मानवी रक्त सांडल्याशिवाय कधीच सोडीत नसते; हा सिद्धांत आहे. हैद्राबाद सरकार जो एवढा उपद्व्याप करीत आहे तो संस्थानातील जनतेत लेखन, भाषण व संघ स्वातंत्र्यामुळे जनतेत विचार-जागृती होऊ नये, त्यांना आपल्या न्याय्य हक्कासाठी चळवळ करणे अशक्य व्हावे यासाठीच आहे. शेकडा १० च्या जवळपास असलेल्या समाजाशी शेकडा ८५ असलेल्या समाजाला, स्वाभिमान राखून तडजोड करणे सर्वस्वी अशक्य आहे. काही स्वार्थी लोक सरकारच्या कृपेमुळे समाजाचे पुढारी ठरून सामाजिक स्वाभिमानाचे वाटोळे करूनही तडजोडीला तयार होतील कदाचित, पण त्यामुळे समाजात शांतता नांदणे अशक्य आहे.

## तडजोडीचा देखावा

हैद्राबाद स्टेट काँग्रेस सर्वस्वी राजकीय संस्था असल्यामुळे तिच्यावर

बेकायदेशीरपणाचा शिक्का मारला गेल्यामुळे निर्माण झालेली परिस्थितीही राजकीयच आहे हे उघड आहे. या परिस्थितीत मुसलमानांच्यासाठी किती जागा राखीव असाव्या या प्रश्नाचा विचार करण्याची आमच्या मते गरज नाही. प्रस्तुत परिस्थितीत काहीच किंमत नसलेल्या या प्रश्नाला जे फाजील महत्त्व दिले जात आहे त्याच्या मुळाशी जनतेचा बुद्धिभेद करण्याचाच डाव आहे. कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना या प्रश्नांकडे ढुंकून पाहण्याचे कारण नाही. 'तडजोड यशस्वी होण्यासाठी शांत वातावरण पाहिजे' म्हणणारांनी जातीय संस्थांच्या पुढाऱ्यांशी हवी तेवढी बोलणी करावयास कसलीच हरकत नाही. कॉंग्रेसवरचे बंधन दूर करण्याची सरकारला विनती करण्याचे व कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना हातपाय जोडून आशाळभूतामारखे 'मला काय मिळेल?' हे पाहण्यास सांगण्याचे व समाजात कॉंग्रेसवर झालेल्या अन्यायामुळे निर्माण झालेली जागृती वाया घालवण्यास भाग पाडण्याचे काहीच कारण नाही. तथापि सरकारच्या या आवडत्या लोकांनी काय करावे आणि काय करू नये हे सांगण्यास सरकार समर्थ आहे. कॉंग्रेस ही जनतेच्या कल्याणासाठी निघालेली असल्यामुळे व तिचे ध्येय राजकीय व जातीयता-विरोधी असल्यामुळे तिच्या अधिकाऱ्यांनी या जातीय तडजोडीकडे ढुंकूनही पाहण्याचे काही कारण नाही. खरं लोककल्याण असीम त्यागाशिवाय होणे शक्य नसल्यामुळे सरकारने निर्माण केलेल्या परिस्थितीचा पूर्ण उपयोग तिने समाजात स्वावलंबन, निर्भयता वगैरे गुण वाढविण्यासाठीच करणे जरूर आहे. स्वतःच्या कष्टाने मिळविलेली भाजी भाकरी, भीक म्हणून मिळालेल्या तूपसाखरेपेक्षा हजारपट अधिक मोलाची असते. कॉंग्रेस कमिटीच्या सभासदांना आमची नम्र सूचना आहे की त्यांनी आपला स्वावलंबनाचा आखलेला मार्ग या मृगजलामागे धावण्यासाठी सोडून समाजाचा विश्वास-घात करू नये. संस्थानातील जबाबदार लोकावर मोहाला शह देण्याची व कठोर कर्तव्याचरणाची आज फार मोठी जबाबदारी आहे. ती ओळखून ते न वागतील तर बाहेरच्या जगात त्यांची अपकीर्ती झाल्याशिवाय रहाणार नाही. सेनापती बापटांनी हैद्राबादेहून परत आल्यानंतर काढलेल्या पत्रकापासून हैद्राबादेतील जनता योग्य बोध घेईल व तिच्या उद्धारासाठी

बाहेरचे लोक सत्याग्रह करीत असता ती स्वस्थ बसलेली आहे या अपमानास्पद दृश्याऐवजी बाहेरचे लोक सत्याग्रह सुरू करण्यापूर्वी संस्थानातील कमीत कमी दोन-तीनशे लोक सरकारचा पाहुणचार घेत असलेले दृश्य दिसेल अशी आम्हाला आशा आहे.

रणदुंदुभी : दि. २९ सप्टेंबर १९३८

# तरुण वर्ग काय करणार ?

## चळवळ कशासाठी थांबविणार ?

गेल्या आठवड्यात, हैद्राबाद सरकार काँग्रेसवरची बंदी उठवावयास तयार नाही, मि. नरसिंगराव व सरकारी अधिकारी यांच्यातील तडजोड फिसकटली व जातीय तडजोडीला आवश्यक शांतता लाभावी म्हणून काँग्रेस आपली चळवळ तूर्त पुढे ढकलण्यास तयार असल्याचे पत्र काँग्रेसने काढले. अशा तीन महत्त्वाच्या बातम्या हैद्राबादेहून आल्या आहेत. मि. नरसिंगराव व न. बहादूरयारजंग यांच्यात चालू असलेली हिंदु-मुसलमान ऐक्याची बोलणी खाजगी व व्यक्तिगत होती. मि. नरसिंगराव यांच्या प्रामाणिकपणाविषयी कोणालाच या प्रसंगी संशय घेण्याचे प्रयोजन नाही; पण आमच्या माहितीप्रमाणे ते हिंदू जातीचे किंवा हिंदूंच्या एखाद्या जातीय संस्थेचे सर्वमान्य पुढारीही नाहीत, तसेच त्यांचा स्टेट काँग्रेसशी कसलाच संबंध नाही. अशा स्थितीत मि. नरसिंगराव यांच्या तडजोडीच्या वैयक्तिक प्रयत्नाला काँग्रेसने एवढे फाजील महत्त्व देण्याचे कारण काय ? हा एक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. हिंदु-मुसलमानांच्या तडजोडीचा प्रश्न म्हणजे हिंदु पुढाऱ्यांना किती जागा द्यावयाच्या व मुसलमान पुढाऱ्यांना किती याच प्रश्नांच्या वाटाघाटी होत. त्यात सामान्य जनतेला लेखन-भाषण-संघ स्वातंत्र्य देण्याचा प्रश्न नाही व लोकमताला जवाबदार असे सरकार स्थापन करण्याची तर भाषाच नाही आणि असे असताना जवाबदार राज्य पद्धती सुरू करण्याचे ध्येय असलेली काँग्रेस श्री. नरसिंगराव यांच्या प्रामाणिकपणाची खात्री देऊन आपला कार्यक्रम तात्पुरता बंद ठेवते हे पाहून कुणीही विचारी मनुष्य साशंक होणे साहजिक आहे. काँग्रेसवरची बंदी उठवावयास सरकार तयार

नाही हे कळूनही जेव्हा जातीय तडजोडीला वाव देण्याचे कारण पुढे करून काँग्रेस नेते चळवळ तात्पुरती तहकूब करताना दिसतात तेव्हा तर ही शंका अधिकच बळावते. काही त्याग न करता होईल तेवढा फायदा पदरात पाडून घेऊ इच्छिणारांचे संख्याबल काँग्रेसमध्ये अधिक तरी असावे किंवा मुसलमानांना अगाऊ आश्वासने देऊन चळवळीत ओढण्याची उत्कट इच्छा असणारांचे तरी, असा तर्क केल्यास तो फारसा चूक ठरेल असे वाटत नाही. पहिली गोष्ट खरी असल्याम त्यासारखे समाजाचे दुसरे दुर्दैव असू शकत नाही. कोणचीही गोष्ट खरी असली तरी काँग्रेसच्या जातीयता विरोधी धोरणाला कमीपणा आणणारी असून काँग्रेस या नावामुळे जी त्यागाची व स्वाभिमानाची कल्पना उभी राहाते तिला काळिमा जरी नाही तरी मलिनता खास आणणारी आहे.

## काँग्रेसची विसंगत भूमिका

नागरिक हक्काशिवाय शंभर टक्के जागा हिंदूंना देण्याचे आश्वासन सरकारने व मुसलमानांनी दिले तरी त्याचा सामान्य जनतेला कवडीचाही उपयोग होऊ शकत नाही. आज एकही जागा अधीक न देता जनतेला लेखन, भाषण, संघ इत्यादी नागरीक हक्क दिले तरीहि पुरे आहे. या हक्कांच्या बळावर जनतेला स्वतःला काय पाहिजे व काय नको हे स्वतःच ठरविता व मिळविता येईल. याच्या उलट सरकारी नोकरीत गेलेले लोक, सरकारवर लोकमताचा दाब नसल्यामुळे आजच्या अधिकाऱ्यांप्रमाणेच बेगुमानपणे वागताना आढळतील व जनतेला आपली दुःखे दूर करून घेणे आजच्या इतकेच कठीण होऊन बसेल. सरकार काँग्रेसवरची बंदीच उचलावयास जेथे तयार नाही तेथे तडजोडीने नागरीक हक्क मिळण्याची आशा करणे म्हणजे एक प्रकारे महंमदी मनोराज्य करणेच आहे. काँग्रेस मध्ये एकही मुसलमान नसला तरी ती जातीय होऊ शकत नाही असा निर्वाळा बाहेरच्या जगाने एकमताने दिलेला असल्यामुळे तडजोड होऊन मुसलमान लोक काँग्रेसला मिळतील या आशेवर काँग्रेसने आपला कार्यक्रम बंद ठेवण्याचे काहीच कारण कारण नाही. मुसलमानांची अडचण दूर झाल्यानंतर सरकार काँग्रेसला सहजासहजी जगू व वाढू देईल हे संभवत नाही. शिवाय ही तडजोडीची बोलणी कोठवर लांबतील व ती सरकारकडे

गेल्यानंतर त्याची त्याला मान्यता मिळण्यास किती वर्षे लागतील हे एखाद्या पटाईत भविष्यवाद्यालाही सांगणे कठीण आहे. याशिवाय सरकारचा काँग्रेस या शब्दावरच दात आहे तो निराळाच. सारांश काँग्रेसने स्वीकारलेली आजची भूमिका तिच्या धोरणाला व तिच्या नांवाच्या कीर्तीला विसंगत अशी असल्यामुळे ती ताबडतोब बदलणे जरूर आहे.

## भ्याडवृत्ति लपविण्याचा प्रयत्न

ज्याप्रमाणे जीवनाला हवा पाण्याची गरज आहे त्याचप्रमाणे मनुष्य-त्वाला लेखन भाषणादी नागरिक हक्कांची गरज आहे. या हक्काशिवाय मनुष्यत्व जगू व वाढू शकत नाही. जगात मनुष्यच मनुष्यत्वाचा मोठा शत्रू असल्यामुळे सत्ताधीश व त्यांचा साहाय्यक वर्ग, त्याने सहेतुक घातलेली ही बंधने तो सहजासहजी दूर करील हे संभवत नाही. तड-जोडीला माणसाने नेहमी तयार असावे याबद्दल आमचा मतभेद नाही. पण तडजोडीच्या नावाखाली आपली भ्याड वृत्ती कोणी लपविण्याचा प्रयत्न करील तर तो आमच्या मते गुन्हा आहे. जर या पुढे काँग्रेस आपली जबाबदारी टाळण्याचा प्रयत्न करील तर तिच्या छत्राखाली आलेले कार्यकर्ते यापुढे व्यक्तिशः चळवळीला तोंड पाडल्याशिवाय रहाणार नाहीत अशी आम्हाला भीती वाटते. ज्यांना फुरसतीच्या वेळी देशसेवा करावयाची असेल त्यांचा प्रश्न निराळा आहे. पण सर्वकाळ सार्वजनिक कार्य करू इच्छिणारांना नागरिक स्वातंत्र्यावरील बंधने दूर झाल्याशिवाय कोणतेच कार्य करण्याची शक्यता नसल्यामुळे स्वस्थ बसणे शक्य नाही. हैद्राबादेतील जनतेचा स्वाभिमान मारण्याचा गेली पंचवीस वर्षे एवढा दीर्घ प्रयत्न झाला आहे की, आज बायको पळवल्याने, घर लुटल्याने किंवा देवतांची शकले केल्यानेही समाज प्रतिकाराला तयार होत नसल्याची रोज शेकडो दृश्ये दिसत आहेत. अशा स्थितीत समाजाचा स्वाभिमान पुनरुज्जीवित कर-ण्याचा, त्याची भीती घालविण्याचा, त्याला त्यागाला सिद्ध करण्याचा तेजस्वी कार्यक्रम आंखणे व आचरणे अत्यंत जरूर आहे. माणसाचे शरीर एक नाही हजारवेळा गुलाम बनले तरी चालेल पण त्याचे मन गुलाम न बनले पाहिजे. स्वतंत्र व जिवंत मनाचा मनुष्य लोहशृंखलांनी बद्ध असला त्यातून सुटण्याचा विचार करील व त्याचे ते विचार जेलच्या

दगडी भिंती लीलेने ओलांडून वायुमंडळाच्या मध्यस्थीने अनेक समानधर्मीय अंतःकरणांना चेतना देऊ शकतील याच्या उलट मुर्दाड मनाचा मनुष्य अनेक होतकरू मने आपल्या स्वार्थी विचाराने जाळण्यास कारण होतो. कायकर्त्यांचे व पुढाऱ्याचे कर्तव्य, सामाजिक मनाला चेतना देण्याचे असते. स्वार्थाच्या घाणीत लोळण्याचा कुणाला उपदेश करण्याचे कारणच नसते. लोकांना उपदेश व उदाहरण त्यागाचे दिले पाहिजे.

## सेनापती बापटांचे अभिनंदन

हैद्राबादेतील लोकनायकांनी त्यागाच्या बाबतीत आजपर्यंत नेहमीच माघार घेतलेली आहे. म्हैसूर, त्रावणकोर इत्यादी लहान लहान संस्थानांनी स्वातंत्र्याच्या स्थंडिलावर अनेक आहुत्या दिल्या आहेत. हैद्राबादेतील परिस्थिती इतर ठिकाणांपेक्षा अधिक बिकट आहे यांत वाद नाही. पण त्यामुळेच तर हैद्राबादेतील लोकांवर सर्वांपेक्षा अधिक त्याग करण्याची जबाबदारी येते. सेनापती बापटांनी हैद्राबादेतील कार्यकर्त्यांना जागे करण्याचा स्तुत्य व अभिनंदनीय प्रयत्न केलेला आहे. त्यांच्या प्रयत्नाला यश येईल की अपयश हा प्रश्न गौण आहे. 'मराठ्या' चे संपादक श्री. केतकर यांनी सांगितल्याप्रमाणे जर सेनापती बापट व स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या शब्दानेही महाराष्ट्राचे अंतःकरण हालणार नसेल तर ते कधीच कुणाला हलविता येणार नाही. कोणी येवो अथवा न येवो सेनापती आपल्या निश्चयापासून आता ढळणे शक्य दिसत नाही व तेच हैद्राबाद सरकारच्या कारागृहाचे दरवाजे उघडून दाखवतील असे स्पष्ट दिसत आहे. आमचे पुढारी तडजोडीकडे डोळे लावून बसतील कदाचित्; पण तरुण वर्ग काय करणार ?

काँग्रेसच्या नेत्यांना आमची अशी नम्र विनंती आहे की त्यांनी काँग्रेसवरील बंदीच्या प्रश्नांबाबत पंतप्रधानांची मुलाखत घेऊन एकदाचा सोक्षमोक्ष करून घ्यावा व आपल्या आखलेल्या तेजस्वी मार्गाने पुढे जाण्याच्या कामी मुळीच दिरंगाई करू नये. असे न झाल्यास तरुणांनी झेंडा उभारून व्यक्तिशः लढ्याला तोंड पाडणे जरूर आहे. केंव्हाना केंव्हा

या दिव्यातून समाजाला जाणे अपरिहार्य आहे. सरकारने निर्माण करून दिलेल्या परिस्थितीचा जास्तीत जास्त फायदा करून घेणे आमचे कर्तव्य नाही काय ?

रणदुंदुभी : दि. ६ ऑक्टोबर १९३८

# हुकूम लपविण्याची लाजीरवाणी प्रथा

## बेबंदशाहीचे पुरावे

हैद्राबादेतील बेबंदशाही राज्यकारभाराचे पुरावे प्रत्येक आठवड्याला जगापुढे येत आहेत ही अत्यंत समाधानाची तशी जनतेच्या दृष्टीने अतिशय हितकारक अशी गोष्ट आहे. गेल्या वर्षापासून संस्थानात माजलेली, नव्हे माजवलेली बेबंदशाही जगाच्या निदर्शनाला येऊ नये व आलीच तर ती विपरीत स्वरूपात यावी यासाठी हैद्राबाद सरकारच्या जुलमी अधिकाऱ्यांनी संस्थानातील कार्यकर्त्यांवर अनेक खोटे-नाटे खटले भरून त्यांना त्रस्त करण्याचे सत्रच सुरू केले आहे. संस्थानातील राज्य-कारभार अगदी साध्या शिपायापासून तो थेट वरिष्ठ अधिकाऱ्यांपर्यंत एका विशिष्ट वर्गाच्या हाती बहुंशाने असल्यामुळे जनतेला या न्यायाचा फार्स करणाऱ्या खटल्यात न्याय मिळण्याची मुळीच आशा वाटत नाही. त्यामुळे कित्येक आरोपींनी जमानती देण्याचे नाकारून कारागृहवास पत्करण्याची प्रथा रूढ केल्यासारखी दिसत आहे. काही जणांनी पोलिसांच्या जुलमाला कंटाळून कारागृह हीच अधिक सुरक्षिततेची जागा ठरवली आहे. तथापि कारागृहात डांबल्याने या हुकूमशाहीचे समाधान होत नाही म्हणूनच की काय त्यांचा तेथे अनन्वित छळ होत असल्याच्या हृदयविदारक बातम्या बाहेर येत आहेत. या व इतर अनेक अन्यायांना वाचा फुटू नये म्हणून सरकारने गेल्या एक-दोन महिन्यांत एक, दोन, तीन, चार असे लागोपाठ हुकूम काढून जवळ जवळ पंचवीस वृत्तपत्रांना संस्थानात येण्याची बंदी केली आहे. जगातील मोठे-मोठे तत्त्ववेत्ते 'जुलूम हा जुलमाने

लपवण्याचा प्रयत्न कधीच यशस्वी होत नाही, उलट तो दुप्पट जोराने उसळून जगापुढे येतो', असे सांगत आले आहेत व सांगतही आहेत. पण आपल्या सत्तेच्या व सहकाऱ्यांच्या पाशवी बळाची फाजील घमेंड मिरवणाऱ्या हैद्राबाद सरकारला ते कळूनही वळण्याची इच्छा दिसत नाही. सरकार जे सांगेल तेवढीच वृत्तपत्रे जनतेने वाचावी, परवानगी देईल तेव्हाच सभा भरवाव्या व वागवील तसे वागावे असे सरकारला वाटत आहे. जनता म्हणजे निर्बुद्ध मेंढरांचा जणू एक कळपच आहे, अशी सरकारची कल्पना दिसते. सरकारचे अधिकारी सांगतील तो न्याय हा त्यांचा दंडक आहे. या सरकारच्या वागणुकीची जनमनावर जितकी वेगाने प्रतिक्रिया होत आहे तितक्याच वेगाने सरकार आडमार्गांचा अवलंब करू लागल्याचे दिसत आहे. पण आपल्या बेकायदेशीर किंवा अरेरावी वागणुकीने आपण जनसमाजात अधिक तीव्र असंतोष निर्माण करून त्यांना कायदेभंग करण्यास एक प्रकारे अप्रत्यक्ष असे उत्तेजन देत आहो हे कळत नाही.

## वृत्तपत्रांना बंदी करणारे हुकूम

हैद्राबाद सरकारने आठवड्या-आठवड्याच्या अंतराने वृत्तपत्रांना बंदी करणारे जुलमी व संतापजनक हुकूम अनेकवेळा काढले असताना एकाही वृत्तपत्राने किंवा जनतेने त्या हुकमाचा भग करण्याचा कधीच प्रयत्न केलेला नाही. यापूर्वी सरकारला न आवडणाऱ्या वृत्तपत्रांना बंदी केल्याचे हुकूम, सरकारी हुकूमांना प्रसिद्धी देण्याच्या उद्देशाने मुद्दाम स्थापन केलेल्या प्रसिद्धीखात्याकडून प्रसिद्ध केले जात असत. या प्रघातामुळे जनतेला व वृत्तपत्रांच्या चालकांना सरकारी आज्ञेची जाणीव होण्यास फार मोठी मदत मिळत असल्यामुळे तिचा अनिच्छापूर्वक भंग केल्याचे पाप त्यांना लागत नसे. परंतु हैद्राबाद सरकारला आपल्या आज्ञेचा भग न झाल्यामुळे एक प्रकारे वैशम्य वाटल्यामुळेच की काय कोण जाणे त्यांनी गेल्या खेपेपासून वृत्तपत्रांना बंदी करणारे हुकूम अधिकृतरीत्या प्रसिद्ध न करण्याचा नवा सांप्रदाय रूढ करण्याचा विचार ठरवल्यासारखा दिसत आहे. पूर्वपद्धती-प्रमाणे सरकारी अधिकृत हुकूम प्रसिद्ध झालेला न आढळल्यामुळेच गेल्या आठवड्यात 'रणदुंदुभीचा' चा अंक हैद्राबादेत पाठविला गेला.

आश्चर्याची गोष्ट ही की, ता. ६ ऑक्टोबरचा अंक प्रत्यक्ष हैद्राबादेत ता. ६ ला कोणच्याही अडथळ्याशिवाय मिळाला व वाटला जाऊ शकला. पण कित्येक ठिकाणी पोलिसांनी परभारेच पोस्टातून पार्सले जप्त केली. कित्येक ठिकाणी करोडगिरीत अर्डाविली जाऊन पोलिसाकडे रवाना केली गेली. औरंगाबादेस तर १००-१२५ अंक वाटले गेल्यानंतर जप्त केले गेले असं कळते.

## पोलिसखात्याचा गुप्त हुकूम

रणदुंदुभीच्या व्यवस्थापकांनी औरंगाबाद येथे अव्वल तालुकदार साहेबांना, अंक कोणच्या हुकमाधोर जप्त केल्याची विचारणा तारेने केली असतांही त्यांच्याकडून अद्याप उत्तर मिळू शकलेले नाही. हैद्राबादेहून आलेल्या एका बातमीवरून असे कळते की तेथील वृत्तपत्रांच्या एका एजंटाला पोलिस खात्याचा एक गुप्त हुकूम दाखवण्यात आला. हैद्राबाद-सारख्या पहिल्या प्रतीच्या संस्थानात राज्यकारभाराची असलेली ही विचित्र तऱ्हा पाहिली म्हणजे संस्थानात कायद्याचे- मग ते जुलमी का असेनात- राज्य नसून केवळ बेबंदशाही आहे असे म्हणणे अत्यंत समतोल माणसाला देखील भाग पडते. ज्या सरकारला आपल्या हुकमाच्या प्रसिद्धीची लाज वाटते, जनतेची इच्छा नसतानाही जे सरकार चोरटे हुकूम काढून जनतेच्या हातून कायदेभंग होण्यास मदत करते व जी गोष्ट आज ना उद्या जगापुढे येऊन सरकारची बदनामी झाल्याशिवाय राहू शकत नाही, ती लपविण्याचा वृथा व इभ्रतीला कमीपणा आणणारा प्रयत्न करते, ठिकठिकाणच्या सरकारी अधिकाऱ्यांना व नौकरांना विनाकारण जप्तीच्या आगाऊ भानगडी करण्यास भाग पाडते व जनतेत एक प्रकारचा सात्विक संताप निर्माण करण्यास साहाय्य करते, त्याच्या जुलमी वृत्तीचा काल समीप आला आहे असे अनुमान करणे चूक ठरेल काय ? आम्हाला आशा आहे की हैद्राबाद सरकार हुकूम लपविण्याची अशी लाजिरवाणी प्रथा ताबडतोब बंद करतील.

**हैद्राबाद स्वराज्य** : दि. १३ ऑक्टोबर १९३८

*

# सत्याग्रह सुरू झाला

## श्री. नानल यांचे नेतृत्व

गेल्या सोमवार ता. २४ ऑक्टोबर १९३८ ला दिवाळीच्या पाडव्याच्या शुभ मुहूर्तावर दुपारी १२ वाजता हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्या कार्यकारी मंडळाचे प्रथमाध्यक्ष श्री. गोविंदराव उर्फ दाजीसाहेब नानल यांनी स्टेट काँग्रेसच्या स्थापनेला बंदी करणारा सरकारी हुकूम मोडून सत्याग्रहाची चळवळ सुरू केली. हैद्राबाद संस्थानातील जीवनाशी थोडासा परिचय असणाऱ्या प्रत्येकाला श्री. दाजीसाहेबांच्या उज्ज्वल चारित्र्याची, स्वाभिमानी, करारी व निर्भय वृत्तीची तसेच सत्यनिष्ठेची ओळख करून देण्याचे कारण नाही. परंतु सस्थानातील जनतेत ते सहकार्याचे कट्टे पुरस्कर्ते म्हणूनच विशेषतः प्रसिद्ध आहेत. संस्थानातील विद्यमान पुढारी-वर्गात सरकारशी समनेच्या नात्याने सहकार्य केलेला व करू इच्छिणारा त्यांच्यासारखा दुसरा पुढारी फारच क्वचित दाखविता येईल. वयाची ६० वर्षे अशाप्रकारे सरकारशी सहकार्य करून निरलसपणे लोकसेवा करणाऱ्या या लोकनायकावर सत्याग्रहाच्या चळवळीचे नेतृत्व स्वीकारण्याची पाळी यावी यावरूनच हैद्राबाद सरकारच्या जुलमी राजवटीने आपली अंतिम सीमा गाठली असे विधान करणे भाग पडते. राजकीय संस्था स्थापन करण्यास आपली हरकत नाही असे सरकारने कितीही कंठशोष करून सांगितले तरी, स्टेट काँग्रेससारख्या शुद्ध राजकीय संस्थेच्या स्थापनेलाच सरकारने प्रत्यक्ष बंदी केली असल्यामुळे सरकारच्या बोलण्यात व प्रत्यक्ष कृतीत ताळमेळ नाही ही गोष्ट लहान मुलाला देखील न सांगता कळू शकते.

तथापि सरकारला हिंदुस्थानातील असंख्य जबाबदार वृत्तपत्रांनी केलेल्या टीकेवरून बोध घेण्यास व आपली चूक सुधारण्यास संधी लाभलेली असताही त्याने तिचा उपयोग तर केला नाहीच पण उलट अधिक जुलूम करावयास प्रारंभ केलेला आहे. या चुकीच्या धोरणामुळे संस्थानातील प्रजेत निर्माण झालेला असंतोष वाढण्यास उत्तेजन मिळाले असल्यास नवल नाही. सरकारने अशा प्रकारे आपला हट्टाग्रह चालू ठेवण्याचा निश्चय केल्यानंतर त्याची प्रतिक्रिया जनमनावर होऊन सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली आहे व त्याची जबाबदारी सरकारकडे जात आहे.

## स्वातंत्र्य संग्रामात उडी

या चळवळीचे नेतृत्व श्री. दाजीसाहेब नानल यांच्यासारख्या साठीत पदार्पण केलेल्या व सहकार्याविषयी नावाजलेल्या व्यक्तीने स्वीकारले असल्यामुळे हैद्राबाद सरकारची राज्यपद्धती अत्यंत संतापजनक बनली असल्याबद्दल संशयच उरत नाही. आयुष्य-रवी अस्ताचलाकडे झुकला असता श्री. दाजीसाहेबांनी सत्याग्रहाचे नेतृत्व स्वीकारण्यात जे अलोट धैर्य दाखवले त्याबद्दल त्यांचे व त्यांच्या सहकाऱ्यांचे सर्वत्र हार्दिक अभिनंदन केले जाईलच. साठीत पदार्पण केलेल्या आपल्या वृद्ध लोकनायकांनी सुरू केलेली सत्याग्रहाची चळवळ त्यांनी दिलेल्या सूचनेनुसार यश मिळेपर्यंत चालवणे हे संस्थानातील आबालवृद्ध स्त्रीपुरुषांचे कर्तव्य आहे. सध्या फेडरेशनचा प्रश्न धसाला लागलेला असल्यामुळे यावेळी केलेल्या त्यागाचे भरपूर फळ फारच थोड्या अवधीत पदरात पडण्याची शक्यता आहे. ब्रिटिश हिंदुस्थानातील जनतेने केलेल्या असीम त्यागामुळे संस्थानातील जनतेला पर्वणी लाभली आहे. हैद्राबादेतील हजारो नागरिकांनी आपले सर्वस्व अर्पण करून जबाबदार राज्यपद्धति मिळवण्याचा लढा अत्यंत निकराने लढवला पाहिजे. लेखन, भाषणासारखे साधे हक्क नसताना 'मुकी बिचारी कुणी हाका' असे मेंढराचे जीवन जगण्याची आम्हाला लाज वाटली पाहिजे. स्वतःची दुःखे, स्वतःच्या भावना व्यक्त करण्याचेही स्वातंत्र्य नसलेले स्वाभिमानशून्य जिणे जगण्यापेक्षा, स्वातंत्र्य मिळविण्या-साठी येणारे सन्माननीय मरण मरण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणे हजारपट गौरवास्पद आहे. हैद्राबाद संस्थानच्या हद्दीबाहेर काही सोन्याचा पाऊस

पडत नव्हता. तेथील लोकांना स्वातंत्र्याच्या चळवळीत भाग घेण्यास जर परिस्थिती आड येऊ शकली नाही तर ती आमच्या मार्गातच आडवी पडण्याचे काही कारण नाही. कसल्याही परिस्थितीचा पाश ताडकन तोडून आम्ही या स्वातंत्र्य संग्रामात उडी घेतली पाहिजे. आपल्याला प्रत्येकाला एकवेळ निश्चित मरावयाचे आहे आणि मरताना येथील पसारा येथेच टाकायचा आहे. हे त्रिकालाबाधित सत्य असताना सत्यासाठी त्याग करण्याची, न्याय्य हक्कासाठी लढण्याची व स्वातंत्र्यासाठी मरण्याची आलेली संधी वाया घालवणे यासारखे दुसरे कोणचे दुर्दैव असू शकेल? हैद्राबादेतील जनता कॉंग्रेसच्या निशाणाखाली एकत्र येऊन तिने दिलेल्या सूचनेनुसार सत्याग्रहात हजारोंच्या संख्येने भाग घेईल व तो यशस्वी होईल अशी आम्हाला आशा आहे.

सत्याग्रह : दि. २७ ऑक्टोबर १९३८

# हैद्राबादेतील स्वातंत्र्य संग्राम

## चळवळ का निर्माण होऊ नये?

जवळ जवळ दीड कोटीची लोकसंख्या व ८२ हजार चौरस मैल क्षेत्रफळ असलेले पहिल्या प्रतीचे असलेले हैद्राबादचे संस्थान, शेकडो वर्षे जात्यंध, एकतंत्री, अरेरावी व जुलमी राजवटीच्या वरवंट्याखाली अमानुषपणे भरडले जात असता; तेथील प्रजेच्या मनावर प्रतिक्रिया होऊन तेथे जगाचे लक्ष वेधण्यासारखी प्रचंड चळवळ का निर्माण होऊ नये? असा एक प्रश्न ब्रिटिश हिंदुस्थानातील अनेक सुविद्य कार्यकर्ते व नामवंत पुढारी नेहमी विचारीत असत. अन्याय अथवा जुलूम यांची प्रतिक्रिया होणे हे नैसर्गिक सिद्धांताला धरून असल्यामुळे प्रतिकारात्मक प्रचंड चळवळीच्या अभावी वरील प्रश्नाचे समाधानकारक उत्तर देणे फारच कठीण होत असे. गेल्या २५-३० वर्षात ब्रिटिश हिंदुस्थानातील जनतेने मनुष्य व द्रव्यबलाच्या रूपाने योग्य किंमत देऊन परकीय अशा सुधारलेल्या इंग्रज सरकारकडून स्वातंत्र्याचे अनेक हक्क मिळवलेले दिसत असता, मोंगलाईतील असंघटित कार्यकर्त्यांनी तेथील जुलमाची केलेली वर्णने, प्रतिकारात्मक चळवळीच्या अभावी असत्य जरी वाटली नाही तरी दुर्लक्षणीय खास वाटली. संस्थानातील बहुसंख्य जनतेचे साक्षरतेचे प्रमाण शेकडा ३ च्या जवळपास घुटमळत असता लेखन-भाषण-संघ इत्यादी प्रकारच्या लोकजागृतीला आवश्यक असलेल्या स्वातंत्र्याचा पूर्ण अभाव असता व सरकारी राज्यकारभार अत्यंत बेजबाबदार, बेसनदशीर, जुलमी व अरेरावी असता तेथे सार्वजनिक जीवनाची जोपासना व वाढ होणेच

शक्य नव्हते. प्रत्येक समाजात संकुचित व्यक्तित्वाची मर्यादा ओलांडून समाजाच्या व्यापक व विस्तृत सुखदु:खांशी समरस होण्यात आनंद मानणाऱ्या व्यक्ती सदासर्वकाळ निपजत असतात व त्याप्रमाणे त्या हैद्राबाद संस्थानातही निपजल्या. पण त्यांच्या जोपासनेला व वाढीला संस्थानांतील अथवा बाहेरील जनतेने यत्किंचितही साहाय्य केले नाही व आतील व बाहेरच्या सरकारांनी त्यांच्या नैसर्गिक वृत्तींना शब्दश: जाळण्याचे सहेतूक व पद्धतशीर प्रयत्न केले. दीर्घकालीन अशा कटू अनुभवामुळे संस्थानी जनतेच्या मन:पटलावर निराशावाद व दैववाद यांची जबर पकड बसून भीती, स्वार्थ, अज्ञान इत्यादींची भरमसाट वाढ व्हावी व निर्भयता, त्याग, ज्ञान यांचा सर्वस्वी अभाव आढळावा यांत काहीच आश्चर्य नाही. ‘ हिंदुस्थान हा अविभाज्य आहे ’, ‘ अखिल हिंदुस्थानला संपूर्ण स्वराज्य मिळाले पाहिजे ’, अशा शाब्दिक घोषणा मधून मधून ऐकू येत. पण त्यामुळे हैद्राबादेतील निराशाजनक व अमानुष परिस्थितीत वर्षापूर्वीपर्यंत मुळीच फरक पडला नाही. हैद्राबादेतील जनता म्हणजे एक मुक्या मेंढरांचा कळपच होता.

## आशेची कोमल किरणे

बदलणे हा जगाचा निसर्ग आहे. हताश बनलेल्या मनाला नैसर्गिक नियमावर विश्वासून कर्तव्यरत असणे फारसे जमत नाही. हैद्राबादेतील जनता परिस्थितीच्या असह्य दाबामुळे अत्यंत निराश बनून अशीच कर्तव्यच्युत झाली होती. आत्मविश्वास तर जवळजवळ नष्ट झाल्यासारखा दिसत असे. “ सरकार म्हणजे आपल्याचसारख्या माणसांचा एक लहानसा गट आहे, त्यांत संघटनेच्याद्वारे बदल करणे शक्य आहे, त्याची शक्ति बहुजन समाजाकडून वसूल होणाऱ्या करावर व त्याच्या इच्छेवरच आधारलेली आहे, हा आधार काढून त्याला शक्तिहीन निर्बल बनविणे व आपल्या इच्छेनुसार वांकवणे हा आपल्या हातातील खेळ आहे ”. असे बोलणाराला परवा परवापर्यंत ‘ वेडा ’ संबोधण्यात येत असे व सरकारवर लेखातून टीका करणाराला प्लेगच्या उंदराप्रमाणे दूर केले जात असे. परंतु निसर्गाच्या अबाधित नियमानुसार म्हणा की ब्रिटिश हिंदुस्थानांतील जनतेने असीम स्वार्थत्यागाच्या बळावर लढवलेल्या अंशत: यशस्वी

लढ्यामुळे म्हणा, की ब्रिटिश मुत्सद्यांच्या अचूक अथवा चूक डावामुळे म्हणा, संयुक्त राज्य घटनेच्या कल्पनेचा जन्म झाला व संस्थानांतील वातावरणांत दीर्घकाल नांदत असलेली निराशा क्षीणबल होत असलेली व आशेची कोमल किरणे जनतेला उत्साहित करीत असलेली दिसू लागली. फेडरेशनच्या कल्पनेला जसजसे मूर्त स्वरूप येऊ लागले तसतसा संस्थानातील जनतेचा उत्साह वाढत गेला. कॉंग्रेसने प्रांतिक स्वायत्तता राबविण्याचे ठरवून सात प्रांतातील सत्ता काबीज केल्यामुळे संस्थानी जनतेवर पसरलेला निराशेचा अंधकार पार लयाला गेला. तिच्या खुरटलेल्या इच्छा-आकांक्षांना नवी पालवी फुटू लागली. संयुक्त मध्यवर्ति मंडळाच्या सदोष घटनेमुळे कॉंग्रेसला तिचा धिक्कार करणे व इच्छा आणि सामर्थ्य आहे की नाही याचा नुसता शाब्दिक वाद न करता संस्थानांतील लोकपक्षीय चळवळीकडे नाही नाही म्हणत प्रत्यक्ष लक्ष देणे अपरिहार्य होऊन बसले. संस्थानी प्रजेची बाजू उचलणे फेडरेशनच्या सदोषत्वामुळे कॉंग्रेसला भाग झाले आहे व ती आता त्या प्रश्नाकडे कानाडोळा करूच शकत नाही. हे सूर्य-तेजाइतके स्पष्ट झाल्यानंतर संस्थानातील जनतेच्या दीर्घकाल दाबलेल्या इच्छा-आकांक्षा आश्चर्यकारक वेगाने उसळत असलेल्या दिसाव्या यात आश्चर्य कसले? विजयशाली सत्ताधीश कॉंग्रेस आपल्या मागे उभी आहे याची खात्री पटल्यानंतर, ज्या हैद्राबादेतील सुविख्यात पुढारी सरकारला विरोध न करण्याचे व्रत घेऊन बसले होते, ते त्यांनी क्षणार्धात झुगारून देऊन कायदेभंगाचे शस्त्र सरकारवर उगारावे व चालवावे हा कॉंग्रेसच्या शक्तीचा व ती ज्यासाठी झगडत आहे त्या स्वातंत्र्याचाच प्रभाव नव्हे काय?

## जातिपंथनिरपेक्ष भूमिका

अखिल भरतखंडात कॉंग्रेसइतकी प्रातिनिधिक व बलवान संस्था दुसरी नाही, यासंबंधी आता दुमत उरलेले नाही. महत्त्वाच्या सात प्रांतात तिला बहुमताने अधिकारारूढ केलेले आहे. तिने आपल्या सशास्त्र व परिणामकारक कार्यपद्धतीने, सत्य व अहिंसा यांवरील अढळ निष्ठेने तसेच अमर्याद आत्मक्लेश व अपरिमित देह-धन-मान-दंड सहेतूकपणे सहन करून अद्ययावत शस्त्रास्त्रांनी सुसज्ज असा सेनासागर शब्दाबरोबर हवा

तसा नाचवून, हिंदुस्थानसारखा प्रचंड देश अल्पावधीत निर्मनुष्य करण्याचे सामर्थ्य असणाऱ्या इंग्रज सरकारला थोड्याफार प्रमाणात वाकवून स्वतःचे सामर्थ्य, स्वतःची योग्यता सिद्ध केली आहे. अशा काँग्रेसच्या साहाय्याशिवाय संस्थानी प्रजेचा लढा- मग तो कोणत्याही संस्थानातील असो- यशस्वी होणे शक्य नाही हे एखाद्या लहान मुलाला सहज कळू शकेल. काँग्रेसच्या साहाय्याची अपेक्षा करणारांनी तिने अगणित वेळा जाहीर केलेल्या जातिपंथ निरपेक्ष व शुद्ध राजकीय भूमिकेवरून व सत्य आणि अहिंसेच्या सात्विक तेजात आपल्या स्वातंत्र्याचा लढा लढविणे जरूर आहे हे उघड आहे. काँग्रेसच्या तत्त्वाविरुद्ध वागणाराना तिजकडे साहाय्याची याचना करण्याचा हक्क नाही व ती त्याना मदत करण्यास बाधलेली नाही. हैद्राबाद स्टेट काँग्रेसने ही गोष्ट ओळखून, आपली भूमिका सध्याच्या धूसर वातावरणातही सुस्पष्ट व्हावी म्हणून अनेक पत्रके काढून आपला सत्याग्रहाचा लढा सुरू केला आहे.

## पक्षाभिनिवेश अनिष्ट ठरेल

हैद्राबाद स्टेट काँग्रेसचे ध्येय आसफजाही घराण्याच्या व आलाहजरत निजाम साहेबांच्या आधिपत्याखाली लोकमताला जबाबदार असणारे सरकार स्थापन करणे हे आहे. राजा हा कालाचा कारक असतो. हे त्रिकालाबाधित तत्त्व समजू शकणाऱ्या प्रत्येकाला आजच्या आमच्या परिस्थितीचे मूळ राजसत्तेतच आहे व ती लोकहितकारक बनविण्यासाठी राजकीय सत्तेच्या मुळालाच आम्ही प्रथम हात घातला पाहिजे हे सहज कळू व वळू शकते. सत्ता लोकमतानुवर्ती करण्याचा प्रयत्न यशस्वी झाला म्हणजेच आमची दुःखे- मग ती कोणत्याही प्रकारची असोत- दूर होऊ शकतात. हैद्राबादेतील जनतेची दुःखे अनेक प्रकारची आहेत व ती अनेकांच्या भावनांनुसार त्यांना कमी-अधिक जाचक होत आहेत ही गोष्ट खरी आहे. पण म्हणून प्रत्येकाने स्वतंत्रपणे एकाच सत्तेवर आघात करणे परिणामाच्या दृष्टीने योग्य ठरत नाही. यावर कोणी असे म्हणतील की सत्तेवर चोहोबाजूने हल्ला केल्यानेच ती अधिक लवकर नमण्याचा संभव आहे. पण कोणचीही सत्ता सर्व बाजूंनी कमजोर असू शकत नसल्यामुळे तिच्या नाजूक भागावरच एकजुटीने जास्तीत जास्त जोरदार प्रहार करणे हेच परिणामाच्या दृष्टीने

अधिक योग्य ठरणारे आहे व म्हणून सामाजिक शक्ती दुभंगण्याचा मार्ग योग्य ठरत नाही. सर्वांचे हेतू एका सत्तेच्या प्राप्तीनंतर फलद्रूप होणार असताना तिच्या प्राप्तीचे प्रयत्न एकमेकांना मारक असे होणे निश्चितपणे सर्वांच्याच हिताला बाधक होणारे आहेत. हा पक्षाभिनिवेश, हैद्राबादच्या अगोदरच ढगाळलेल्या वातावरणात अत्यंत अनिष्ट ठरण्याचीच आम्हाला भीती वाटते. हैद्राबादेतील जनतेने परिस्थितीचा व परिणामाचा नीट विचार केल्यास तिला ही गोष्ट कळून येईल की आपला लढा यशस्वी करण्यास आपण हैद्राबाद स्टेट काँग्रेसच्याच निशाणाखाली एकत्र आले पाहिजे व तरच भारतीय काँग्रेसचे आपल्याला साहाय्य मिळू शकेल व आपण विजयी होऊ.

## भारतीय काँग्रेसचे साहाय्य

भारतीय काँग्रेस स्टेट काँग्रेसला साहाय्य करील यात मुळीच शंका नाही, पण या साहाय्याचे प्रमाण स्टेट काँग्रेसच्या शक्तीवर अवलंबून राहणारे आहे. जगात दुर्बलाला कोणी मित्र मिळत नाहीत. सबलाशी आपले संबंध जोडण्यासाठी प्रत्येकजण उत्सुक असलेला दिसतो. भारतीय काँग्रेसच्या साहाय्याची ज्याप्रमाणात आम्ही अपेक्षा करतो त्याप्रमाणात आम्ही त्याग केला पाहिजे, शिस्त पाळली पाहिजे व निष्ठावंत राहिले पाहिजे. हैद्राबाद स्टेट काँग्रेसचा लढा हा हैद्राबादेतील जनतेचा असल्यामुळे या लढ्यातील मुख्य भूमिका हैद्राबादकरांची आहे. अर्थात या लढ्यासाठी हैद्राबादकरांनी जास्तीत जास्त त्याग करण्याची तयारी दाखविली पाहिजे. भारतीय काँग्रेसची भूमिका साहाय्यकाची राहणार आहे व ती तशीच राहणे इष्ट आहे. भारतीय काँग्रेस आपल्याला मदत करणार आहे, या आशेवर हैद्राबादेतील जनता आळशाप्रमाणे पायावर पाय टाकून नुसते मनोराज्य करील तर ती आपल्या नाशाला स्वतःच कारण होईल. सारांश हैद्राबादेतील जनतेने प्रथम आपल्या त्यागाची अंतिम सीमा गांठली पाहिजे. सत्य व अहिंसा तसेच जातिपंथनिरपेक्षता यांवरील अढळ श्रद्धा काया-वाचा-मनेकरून कायम ठेवली पाहिजे व एवढे तिने केले म्हणजे नुसती काँग्रेसच काय पण सर्व जग तिच्या साहाय्यासाठी धावून येईल व तिचा लढा यशस्वी होईल यांत तिळमात्र शंका नको. जो स्वतःला मदत करीत

नाही त्याला कुणीच मदत करीत नाही. जो स्वतःला मदत करतो त्यालाच सर्व जग मदत करते.

## हैद्राबाद संस्थान : एक प्रचंड तुरुंग

हैद्राबादेतील सरकारवर आज लोकमताचा मुळीच दाब नसल्यामुळे तेथील जनतेला निर्बुद्ध पशूंचे जिणे जगावे लागत आहे. अगदी ८-१० रुपये मिळविणाऱ्या शिपायापासून सर्व सरकारी नोकर आपण स्वतः सर्वाधिकारी आहो अशा भावनेने हवे ते कायदे करून किंवा असलेले कायदे खिशात गुंडाळून ठेवून मन मानेल तसे दीर्घकाल वागत आहे. त्यामुळे हैद्राबाद संस्थान हा एक प्रचंड तुरुंग बनला आहे. तेथील प्रजेला आपली दुःखे बोलून दाखविण्याचे, लिहून सांगण्याचे किंवा अन्य प्रकारचे नागरिक स्वातंत्र्याचेही हक्क नाहीत. शाळा काढावयाची घ्या परवानगी, वृत्तपत्र काढावयाचे घ्या परवानगी, व्यायामासाठी आखाडा सुरू करावयाचा घ्या परवानगी, मिरवणूक काढावयाची घ्या परवानगी, उत्सव करावयाचा घ्या परवानगी; अशा एक ना दोन, अनेक बाबींना परवानगींच्या शृंखला घालून हैद्राबाद सरकारने आपल्या प्रजेला पशू करून ठेवले आहे. ही बंधने पाळणे, ती तोडण्याचा, झुगारण्याचा प्रयत्न न करणे म्हणजे स्वतः पशू असल्याचे मान्य करणेच आहे. आपले शेजारी असलेले आपलेच बांधव स्वपराक्रमाने प्रांतिक स्वायत्तता मिळवून ती उपभोगीत असलेले पाहूनही हैद्राबादेतील जनतेला या पशू जीवनाचा तिरस्कार न वाटावा व तिने 'आम्ही माणसे आहोत व माणसांप्रमाणेच जगू इच्छितो' अशी घोषणा व मागणी न करावी तरच आश्चर्य होते. तथापि हैद्राबादचे जात्यंध व बेजबाबदार सरकार जनतेला हे माणुसकीचे साधेसुधे हक्क द्यावयास तयार नाही हे एखाद्या संस्थेच्या स्थापनेपूर्वीच तिच्या नरडीला नख लावणाऱ्या सरकारच्या जुलमी कारभाराचा व कायद्याचा धिक्कार करून त्याला दिवसा उजेडी भर रस्त्यावर पायाखाली तुडविणे व त्या प्रीत्यर्थ घडतील ते क्लेश आनंदाने सहन करणे याशिवाय त्या संस्थेच्या स्थापकांना स्वाभिमानाचा असा दुसरा मार्गच उरत नाही. साठीच्या घरात गेलेल्या व आयुष्यभर सरकारशी सहकार्य करणाऱ्या श्री. गोविंदराव उर्फ दाजीसाहेब नानल यांच्या सारख्याने काँग्रेसचे प्रथमाध्यक्ष होऊन सत्याग्रहासारखा निर्वाणीचा

उपाय अमलात आणावा या एका गोष्टीवरूनच सरकारचा कारभार किती कमालीचा असह्य व संतापजनक बनला आहे याची यथार्थ कल्पना येऊ शकते. ज्या लढ्याचे नेतृत्व हैद्राबादेतील एक सुविख्यात कायदेपंडित व लोकमान्य व राजमान्य पुढारी वयाच्या साठाव्या वर्षी स्वीकारण्यास सिद्ध होतात त्या लढ्यात संस्थानातील आबालवृद्ध स्त्री-पुरुष हजारोंच्या संख्येने भाग घेतील याबद्दल मुळीच शंका नको.

## सर्व प्रांताचे, सर्व थरांचे सत्याग्रही

सुदैवाने या लढ्यात आंध्र व कर्नाटक भागांतील लोक, तसेच मारवाडी, लिंगायत, हरिजन इत्यादी समाजही अहमहमिकेने भाग घेतल्याचे दिसत आहे. प्रथमारंभापासून श्री. रामकिशनजी धूत यांनी कॉंग्रेसचे संचालन अत्यंत निर्भयपणे आपल्याकडे घेऊन व पहिल्या तुकडीत युद्ध मंडळाचे चिटणीस या नात्याने राहून कारागृहवास पत्करण्यास फारच अलोट धैर्य दाखविले आहे. कर्नाटकाचे लोकप्रिय पुढारी व हैद्राबादेतील एक मान्यवर वकील श्री. जनार्दनराव देसाई यांनी तसेच श्री. नारायण रेड्डी अध्यक्ष हरिजन सेवक संघ हैद्राबाद व आंध्र विभागाचे एक लोकप्रिय तरुण पुढारी यांनी पहिल्या तुकडीत राहून या चळवळीला सर्व प्रांतांचे व सर्व प्रकारच्या लोकांचे साहाय्य असल्याचे दाखवून दिले आहे. श्री. श्रीनिवासराव बोरीकर या नवतरुण व होतकरू वकिलाने पहिल्या तुकडीत भाग घेतला नसता तरच आश्चर्य होते. त्यांच्या पूज्य वडिलांचा खून अमानुषपणे करण्यात आलेला होता. हृदयाच्या नाजूक भागावर असह्य जखम झालेल्या या तरुण वकिलाने परभणी जिल्ह्यात किंवा जवळपास सत्याग्रह सुरू होण्याची वाट न पाहाता हैद्राबादकडे धाव घ्यावी व पहिल्या तुकडीत प्रवेश करावा हे त्यांच्या वीर घराण्याला व तारुण्याला साजेसेच आहे. सारांश हैद्राबादेतील अखिल जनता आता खडबडून जागी झाली आहे. ती आता कारागृहवासच काय पण पोलिसाच्या लाठ्या व बंदुकीच्या गोळ्या आपल्या उघड्या छातीवर अत्यंत शांतपणे व आनंदाने घ्यावयास व प्रसंगी मरणाला कवटाळण्यासही सिद्ध झालेली आहे. स्वामी रामानंदतीर्थ यांच्यासारख्या पदवीधर, त्यागी पुण्य-पुरुषाने पहिले सर्वाधिकारित्व पत्करून या चळवळीला एक प्रकारचा

शृचिर्भूतपणाच आणला आहे. त्यांच्या बरोबरही चार वीर-कार्यकर्ते पकडले गेले आहेत. हा लेख लिहीत असताना स्टेट कॉंग्रेसची तिसरी तुकडी चंचलगुड्याच्या सत्याग्रहाश्रमात दाखल झाली असेल. फार थोड्या अवधीत या आश्रमात जागा अपुरी पडत असल्याचे सरकारच्या निदर्शनाला येईल अशी आमची पूर्ण खात्री आहे. मराठवाड्यातील तरुण आपल्या वीर पूर्वजांचा इतिहास अद्याप विसरला नसल्यामुळे व त्याला देशासाठी मरण्याचे खेळ खेळण्याची नेहमीच हौस असल्यामुळे तो हजारोंच्या संख्येने या लढ्यात शिस्तीने भाग घेईलच घेईल पण महाराणी लक्ष्मीबाईंचा पोवाडा मोठ्या अभिमानाने ऐकणाऱ्या व गाणाऱ्या शेकडो महाराष्ट्रीय व इतर प्रांतीय महिलाही या लढ्यात भाग घेतल्याशिवाय राहाणार नाहीत असे स्पष्ट दिसत आहे.

## जात्यंध शिष्टांची चिथावणी

हट्टाला पेटलेले हेकेखोर हैद्राबाद सरकार वाढत्या प्रमाणात जुलूम करण्याची स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. त्यांच्या पापाचा घडा भरत आला असल्याशिवाय जनतेची नागरिक हक्कांची साधी मागणी अमान्य करण्याचा, उलट पुढाऱ्यांना व कार्यकर्त्यांना कारागृहात डांबून ठेवण्याचा व सर्व जगात आपला धिक्कार करण्यास संधी देण्याचा वेडेपणा कसा करील ? हैद्राबादेतील काही जात्यंध शिष्टांनी जे परवाच एक पत्रक काढून दंगे होण्याची भीती व्यक्त केली आहे, गेल्या शुक्रवारी गौळीगुड्यात जो लाठीहल्ला झाल्याचे ऐकण्यात आहे व इतरही ज्या अनेक कंड्या उठविण्यात येत आहेत, त्यावरून हैद्राबाद सरकारचे अधिकारी व त्यांचे साहायक हा लढा दाबण्यासाठी बऱ्याच संतापजनक उपायांच अवलंब करणार असे कित्येक ठिकाणी भाकीत करण्यात येत आहे. चळवळ नसताना ज्या संस्थांना जातीय दंगे म्हणजे नुसता हातचा मळ ठरलेला आहे तेथे ते अशा प्रसंगी न केले गेले तरच आश्चर्य आहे! शिवाय त्यांचे उत्तरदायित्व कोणावर असल्याचे सरकारी पत्रक सांगेल याबद्दलही आम्हाला पूर्ण कल्पना आहे. वस्तुतः स्टेट कॉंग्रेसचा लढा शुद्ध राजकीय स्वरूपाचा असल्यामुळे जातीय गुंडांना मुद्दाम उद्युक्त केल्याशिवाय जातीय दंगे होण्याचे काहीच कारण नाही. नाजूक जातीय भावना असणारांना जागे करण्याचे प्रयत्न

पत्रके काढून व लेख लिहून होऊ लागल्याचे स्पष्ट दिसत आहे. अशा स्थितीत रा. ऑ. सर साहेबांनी आपल्या पोलिसांच्या रिपोर्टावर विशेष विसंबून न राहता या गोष्टीला योग्य प्रकारे आळा घालणे जरूर आहे. वरिष्ठ सरकारने आपली बाजू सुरक्षित राखण्यासाठी काही विशेष हुकूम काढल्यानंतरही त्यांची अंमलबजावणी कितपत होईल याबद्दलच्या आजपर्यंतच्या अनुभवामुळे शंका वाटते. परंतु या सर्व संभवनीय संकटांचे मूळ असलेला स्टेट काँग्रेसवरील बंदीचा हुकूम ताबडतोब रद्द करणे व नागरिक हक्कांचा जाहीरनामा काढणे शहाणपणाचे नाही काय? पण एवढी सद्‌बुद्धी सरकारला झाल्यास मग हैद्राबादचे वैशिष्टय ते काय राहणार? हैद्राबाद सरकारचा जगभर होत असलेला दुर्लौकिक त्याशिवाय कसा वाढेल? व स्टेट काँग्रेसच्या लढ्याला वाढती सहानुभूती मिळून तो कसा यशस्वी होईल?

## स्वातंत्र्य संग्रामात उडी घ्या

म्हैसूर, त्रावणकोर वगैरे संस्थानात जवाबदार राज्यपद्धतीसाठी चळवळी सुरू झाल्यानंतर तेथील सरकारने लाठीहल्ले, गोळीबार इ. प्रकार केलेले जगजाहीर आहे. हैद्राबादेतील सरकारही या प्रकारांच्या आवृत्त्या काढण्याच्या बाबतीत अपवाद ठरेल असे म्हणावयास आज पुरावा नाही. तथापि जनतेने स्टेट काँग्रेसच्या व सत्याग्रहाच्या द्रष्टयांच्या सूचनेनुसार सत्य व अहिंसा तसेच जाती, पंथ, निरपेक्षता यांची कास कदापिही सोडू नये. दुसऱ्याच्या चिडविण्याने चिडू नये व आपल्या लोकनायकाने स्वीकारलेल्या सत्याग्रहाच्या मार्गाने स्वराज्याश्रमाकडे अखंड तुकड्या पाठवाव्यात, अशी आमची कळकळीची विनंती आहे. भारतीय काँग्रेस आज आपल्या मागे उभी असल्यामुळे स्वातंत्र्य संपादनाची चळवळ जर आम्ही तिच्या तत्त्वानुसार केली व संस्थानातील सर्व कारागृहे सत्याग्रहींनी भरली तर आम्ही यशस्वी होऊच होऊ याबद्दल शंका घेण्याचे कारण नाही. हा लढा यशस्वी करण्याची जवाबदारी विशेषतः तरुणावर व श्रीमंतांवर आहे. आमच्या संस्थानात २० ते ४० वयाच्या तरुणांची संख्या तेवीस लक्षाहून अधिक आहे. संस्थानातील नुसत्या तरुणांची एवढी प्रचंड संख्या जर सरकारवर तुटून पडेल तर सरकारला फार लवकर

हार खावी लागेल. पण जर आमचा तरुणवर्ग देशात स्वातंत्र्ययुद्ध सुरू असतांना परीक्षांचे व परिस्थितीचे रडगाणे गात बसेल तर त्याच्या कपाळी गुलामीचा काळा टिळा तर लागेलच पण अनंत भावी पिढ्या त्याला दूषण देतील! तरुणांनो, 'जिंकाल तर राज्य व मराल तर मोक्ष' अशी ही सुवर्ण संधी तुमच्या आयुष्यात सुदैवाने प्राप्त झाली आहे. कसलाही मोह ताडकन तोडून स्वातंत्र्य संग्रामात उडी घ्या. शेकडो वर्षे गुलामगिरीच्या घाणीत खिचपत पडलेल्या आपल्या देशाला स्वातंत्र्य प्राप्त करून देणे केवळ तुमच्या हाती आहे. कोणाचाही सल्ला न घेता तुम्ही देशाच्या हाकेला ओ दिली पाहिजे. देशाच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नापुढे व्यक्ती अथवा कुटुंबाचे प्रश्न गौण असतात हे लक्षात ठेवा व हजारोंच्या संख्येने कॉंग्रेसच्या निशाणाखाली एकत्र येऊन हा स्वातंत्र्याचा लढा जिंका.

संस्थानांतील तरुण व श्रीमंत वर्ग मनुष्य व द्रव्यबळाची कमतरता पडू देणार नाही व हा हैद्राबादचा स्वातंत्र्य संग्राम लवकरच यशस्वी झालेला दिसेल अशी आम्हाला आशा आहे.

**कायदेभंग : दि. ३ नोव्हेंबर १९३८**

# सत्याग्रहाचा वाढता जोर

## पाशवी शक्तीचे प्रदर्शन

बलिप्रतिपदेच्या शुभमुहूर्तावर श्री. गोविंदराव नानल प्रभृतींनी हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसच्या विद्यमाने आरंभिलेला स्वातंत्र्य-संग्राम, संस्थानातून व बाहेरून आश्चर्यजनक मदत व सहानुभूती मिळू लागल्यामुळे रंगत चालला आहे. गेल्या आठवड्यात श्री. रामचंद्रराव नांदापूरकर, बी. एससी., एलएल. बी., हायकोर्ट वकील, यांच्या सर्वाधिकारत्वाखाली, पाचव्या कॉंग्रेस सत्याग्रहींच्या तुकड्यांनी सत्याग्रह केला व वाचकांच्या हाती हा लेख पडेपर्यंत कदाचित सहाव्या तुकडीनेही सत्याग्रह केलेला असेल. चौथ्या तुकडीत श्री. कामटीकर व श्री. रामळू हे जनरल सेक्रेटरी होते. पाचव्या तुकडीचे खममचे श्री. पेब्बराजू रंगराव व श्री. कळूर नरसिंहम आणि अलवंडीचे श्री. व्ही. एन. पत्की व श्री. सी. व्ही. पुरोहित हे ऑर्गनायझिंग सेक्रेटरीज होते. पहिल्या व दुसऱ्या तुकडीचे खटले चालून या आठवड्यात त्यांचे निकाल देण्यात आले. श्री. गोविंदराव नानल प्रभृतींच्या आरोपपत्रकांत पोलिसच्या नजरचुकीने नव्या काळ्या कायद्याचे (पब्लिक सेफ्टी रेग्युलेशन) कलम नमूद करण्याचे राहिले. त्यामुळे पहिल्या तुकडीला फक्त एक महिन्याची साधी कैद व २०० रु. दंड ही १६४ असफिया पीनल कोडमध्ये सांगितलेली जास्तीत जास्त शिक्षा देऊनच सरकारला समाधान मानावे लागले आहे. तथापि एवढ्यावरून सरकार आपल्या पाशवी शक्तीचे अमानुष प्रदर्शन करण्याचे टाळीत आहे असे म्हणता येणार नाही. उलट दुसऱ्या तुकडीचे नायक स्वामी रामानंद-

तीर्थ यांना एकूण १८ महिन्यांची सश्रम कारावास व ५० रु. दंड या प्रमाणे कडक शिक्षा दिली गेली असल्यामुळे व सरकारच्या वतीने जनतेच्या मनात भीती उत्पन्न होईल अशा कडक शिक्षेची मागणी, जातीय दंगे होण्याच्या निश्चित संभावाधारे केली गेली असल्यामुळे, तसेच इतर निरपराधी लोकांना पकडणे, लाठीमार करणे, घरात घुसणे इत्यादि प्रकारही वाढत्या प्रमाणात घडत असल्यामुळे निजामसाहेबांचे सरकार आपल्या ऐतिहासिक परंपरेला व 'मोगलाई' या विशेषणाला अनुरूप असाच अनन्वित जुलूम करून चळवळ दडपून टाकण्यास बद्धपरिकर झाल्यासारखे दिसत आहे. आसेतुहिमाचल एखाद्या झंझावाताप्रमाणे देशभर पसरलेली स्वातंत्र्य संपादनाची चळवळ अशा प्रकारे दडपण्याचा प्रयत्न यशस्वी होऊ शकत नाही. उलट दडपशाहीमुळे सामान्य जनतेत सरकारच्या जुलमी वृत्तीसंबंधीचा अनादर असह्य होण्यास व त्यामुळे लोकपक्षीय चळवळ अधिक बलवान होण्यासच मदत होऊ शकते. केवळ लोककल्याणाच्या तीव्र इच्छेने सहेतुकपणे पण नाइलाज म्हणून अरेरावी सरकारच्या कायद्यांना पायाखाली तुडविणाऱ्या थोर लोकनायकांना व कार्यकर्त्यांना अशा कडक शिक्षा दिल्याने व त्यांना राजकीय कैदी म्हणून इतर चोर डाकूपेक्षा निराळ्या पद्धतीने न वागवण्याने जनतेच्या अंतः-करणात भीती उत्पन्न होण्याऐवजी सरकारविषयी असंतोष मात्र उत्पन्न होऊ शकतो. तथापि सत्तेच्या मदाने मस्त झालेले अरेरावी सरकार प्रजेच्या असंतोषाच्या खडकावर आपले डोके आपटल्याखेरीज राहणार नाही व ते तसे आपटल्याखेरीज त्यात सुविचाराचा प्रवेश होणे शक्य नाही. सारांश, सरकारच्या जुलमी वागणुकीने सत्याग्रहाच्या चळवळीला वाढता जोर चढणार, लोक भिण्याऐवजी अधिक मोठ्या संख्येने तीत भाग घेणार हे उघड दिसत आहे.

## जातीयतेची भुतावळ

पण सरकार, लोकनायकांना व कार्यकर्त्यांना जबर शिक्षा देऊन किंवा वर वर्णन केलेल्या काही गोष्टी करून समाधान मानील असे दिसत नाही. काँग्रेस सत्याग्रहींच्या दुसऱ्या खटल्यात सरकारच्या वतीने जातीय दंग्याची पुनरावृत्ती निघण्याच्या संभवाचे भविष्य सांगण्यात आले आहे.

सत्याग्रहाची चळवळ सुरू झाल्यापासून प्रत्यक्षाप्रत्यक्ष सरकाच्या मदतीवर चालणाऱ्या हैद्राबादेतील जातीय उर्दूपत्रांनी व मुसलमान जातीय चळवळे व संस्था यांनी चालवलेल्या क्षोभकारक प्रचाराची ज्यांना माहिती आहे त्यांना सरकारच्या या भविष्याबद्दल फारसा संशय वाटणार नाही व आश्चर्य तर नाहीच नाही. डॉ. लतीफ या महाशयांनी गेल्या आठवड्यात जे पत्रक प्रसिद्ध केले आहे त्यातील भाषा व विधाने इतकी असभ्य आहेत की त्यामुळे चांगल्या चांगल्या जितेंद्रियांची डोकी फिरू शकतात. जातीयतेची भुतावळ जागवण्यासाठी अशा एक ना दोन अनेक प्रकारांचा अवलंब केला जात आहे असे दिसते. सरकार या प्रकारांना आळा घालू इच्छित नाही. जातीय संस्था व कार्यकर्ते यांच्या व सरकारच्या विचारात फारसा काय पण मुळीच फरक दिसत नसल्यामुळे व अनेक प्रसंगी सरकारी पत्रके व संस्थानातील जातीय पत्रांच्या व संस्थानच्या धोरणानुसार व जातीय संस्थांचा व प्रचारकांचा प्रचार सरकारच्या धोरणानुसार होत असल्यामुळे या दोन गटांत अंतस्थ ऐक्य असल्याचा दाट संशय येणे अपरिहार्य आहे. अशा परिस्थितीत जातीय दंगे उत्पन्न होतील, हे सरकारचे व मुसलमानांचे भविष्य खोटे ठरविणे एका हिंदुस्थान सरकारशिवाय कोणालाही शक्य नाही. चालू किंवा पुढील आठवड्यात हैद्राबादचे पंत-प्रधान ना. व्हाईसरॉय साहेबांची भेट घेणार असल्याची बातमी खरी असल्यास त्यानंतरच याप्रकरणी काही निश्चित अंदाज करणे योग्य ठरणार आहे.

## लोकपक्षात दुफळी

हिंदुस्थान सरकार व हैद्राबाद सरकार यांच्या वाटाघाटीतून काय निष्पन्न होईल यासंबंधी तर्कवितर्क करण्याचे आज कारण नाही. त्यावरच सर्वस्वी अवलंबून असलेल्या मुसलमानांच्या जातीय चळवळीचा आज विचार करणे अप्रस्तुत आहे. तथापि हिंदु-जातीनिष्ठांच्या बाबतीत आज विचार न करणे आमच्या मते अनर्थावह आहे. हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसने सत्याग्रहाचे रणशिंग ता. २४ ऑक्टोबरला फुंकण्याचे निश्चित ठरविले असताना ‘ हिंदू नागरिक हक्क संरक्षक मंडळाने ’ कै. धर्मवीर वामनरावजी नाईक यांच्या पुण्यतिथीच्या दिवशी म्हणजे फक्त तीन दिवस अगोदर

ता. २१ ऑक्टोबरला वरील मंडळाच्या स्थापनेची पत्रके वाटून स्वतंत्र सत्याग्रहाला आरंभ केला आहे. आर्यन डिफेन्स लीगच्या विद्यमानेही ता. २७ ला, म्हणजे काँग्रेसनंतर फक्त ३ दिवसानंतर, तिसरी सत्याग्रहाची चळवळ सुरू करण्यात आली आहे. अशाप्रकारे लोकपक्षात राजकीय व धार्मिक अशी दुफळी व पुन्हा धार्मिक गटात हिंदू आणि आर्य असे पोटभेद झालेले आहेत. काँग्रेस पक्ष जातिपंथनिरपेक्ष व शुद्ध राजकीय असल्याबद्दल हैद्राबाद सरकारप्रमाणे या दोन पंथांच्या संचालकांना संशय नाही. काँग्रेस पक्षाची भूमिका जाति-पंथ-निरपेक्ष असल्यामुळेच दोन जातीय गट त्यापासून निराळे झालेले आहेत हे स्पष्ट आहे. हैद्राबाद सरकारला या वस्तुस्थितीची जाणीव नाही असे म्हणणे शक्य नाही. या वस्तुस्थितीला अधिक घाणेरडे स्वरूप प्राप्त व्हावेत, लोकपक्षातच अनेक पक्ष उत्पन्न होऊन तो क्षीणबल व्हावा, अशा क्षीणबल लोकपक्षाच्या एखाद्या गटावर पिसाळलेली कुत्री सोडल्यामुळे बहुजन समाजाला असह्य चटके देणारे भीषण दंगे निर्माण व्हावे व त्या निमित्ताने सर्वच लोकपक्षांना एका जात्याखाली भरडून काढावे अशी सत्ताधीश राजनीतिज्ञांची इच्छा असावी असा यावरून तर्क करणे चूक ठरणार नाही. ही गोष्ट लोकपक्षातील सर्व पक्षांना पटणारी आहे पण दुर्दैव हे की ही अनिष्ट गोष्ट कळून सवरूनही आम्ही ती पक्षाभिनिवेशामुळे टाळावयाचा काही प्रयत्न करू शकतनासे झालो आहो. हैद्राबादेतील प्रत्यक्ष परिस्थितीचे यथार्थ ज्ञान असणाराला लोकपक्षातील या तीन गटांच्या बलाबलाची जशी कल्पना असेल तशी ती इतरांना असणे शक्य नाही आणि त्यातच पक्षाभिनिवेशाने भारावलेल्या दूरस्थांना ती कदापि येऊ शकत नाही. दीर्घकाल निस्त्राण अवस्थेत पडून असलेला हैद्राबादेतील समाज थोडासा हालचाल करू लागल्याचे दिसताच बाहेरच्या प्रत्येक पक्षाने आपल्या औषधाच्या बाटल्या त्याच्या नरड्यात एकाच वेळी ओतण्याचा अट्टाहास करणे व त्यापासून होणाऱ्या परिणामांचा विचार न करणे म्हणजे सरकारपक्षाला सबल व लोकपक्षाला निर्बल करणेच आहे. बाहेरच्या पक्षभेदाचे भूत संस्थानात अप्रतिहतपणे संचार करून लोकपक्षाला निर्बल बनविण्याचा दीर्घ प्रयत्न करीत आहे हे कटुसत्य कोणालाही आज अमान्य करता येणे शक्य नाही.

त्यामुळे सर्वच दूरस्थ हितचिंतकांना दूर राहून नुसते हितचिंतन करण्याची विनंति करणे प्राप्त होत आहे. ही विनंति मान्य न केली गेल्यास हैद्राबादचा प्रश्न सुटणे तर दूर, पण तो अधिक चिघळण्याचीच आम्हाला साधार भीती वाटत आहे. हे संकट टाळण्यासाठी हैद्राबाद स्टेट काँग्रेसने आपल्या बाहेरच्या हितचिंतकांना प्रत्यक्ष सत्याग्रह करण्यास न येण्याची स्पष्ट विनंति केल्यास त्याचा संस्थानातील इतर लोकपक्षीय गटावरही बराच परिणाम होईल अशी आम्हाला आशा वाटत आहे.

## काँग्रेसविरोधकांच्या हालचाली

भारतीय काँग्रेसचे धोरण संस्थानी लढ्यात प्रत्यक्ष भाग न घेण्याचे असल्यामुळे ती हैद्राबादेत सत्याग्रह करण्यासाठी तुकड्या पाठवणार नाही हे निश्चित आहे. तिने आपल्या सभासदांना ठेवलेल्या व्यक्तिस्वातंत्र्याचा दुरुपयोग काँग्रेसनिष्ठांचे मंडळ करणार नाही अशी आम्हाला खात्री आहे. स्टेट काँग्रेसने तसे स्पष्टीकरण केल्यानंतरही आशा निश्चितपणे फलद्रूप होईल. त्यानंतर हिंदुनिष्ठ व आर्यसमाजिस्ट यांचे प्रश्न उरतात. संस्थानातील या पक्षाच्या चालकांनी आपल्या चळवळी स्वतःच्या शक्तीवरच चालविण्याचे व बाहेरून येणाऱ्या सत्याग्रहींना स्पष्ट शब्दांत 'नको' म्हणण्याने लोकपक्षाला फारशी मदत न होऊ शकली तरी नुकसानीचे प्रमाण बरेच कमी होऊ शकेल. पण निजामाला दाती तृण धरण्यास लावण्याची स्वप्ने पाहणारांना व विशेषतः काँग्रेसला विरोध करण्यातच धन्यता मानणारांना या हैद्राबादच्या प्रश्नाच्या निमित्ताने काँग्रेस सरकार व हिंदुस्थान सरकार यांच्यात बेबनाव उत्पन्न करून त्या आधारावर आपला काँग्रेसविरोधाचा लढा लढवून समाधान मानण्याचीही संधी वाया घालविणे कितपत शक्य होईल हे सांगणे कठीण आहे. हैद्राबाद सरकार शेजारच्या प्रांतिक सरकारवर हिंदुस्थान सरकारचे दडपण आणण्याचा प्रयत्न करीत आहेच. या त्यांच्या प्रयत्नाला यश येण्यासाठी बाहेरच्या जातीय व काँग्रेसविरोधी संस्था आपल्या कृतीने आज मदतच करीत आहेत. हैद्राबाद सरकारला वरील प्रयत्नात यश मिळणे म्हणजेच काँग्रेस विरोधकांना हैद्राबादच्या प्रश्नाच्या निमित्ताने एक सुवर्ण संधी प्राप्त होणे आहे. एका पुण्याच्या जातिनिष्ठ पत्रात हे भीषण भविष्य पूर्वीच

प्रसिद्ध झालेले आहे. हे भीषण भविष्य खरे ठरून हैद्राबादच्या निमित्ताने मुंबई-मध्य प्रांतांतील काँग्रेस सरकारविरुद्ध सत्याग्रह सुरू झाल्यास त्यासारखे दुर्दैव कोणचे असू शकेल?

अशाप्रकारे हैद्राबादचा प्रश्न बाजूला राहून बाहेरच्या दोन हितचिंतकांची लठ्ठालठ्ठी सुरू होण्याचा बराच संभव असल्यामुळे काँग्रेस सरकारने व काँग्रेस हायकमाडने हिंदुस्थान व हैद्राबाद सरकारवर जास्तीत जास्त वजन घालून स्टेट काँग्रेसच्या स्थापनेवरील बंदी उठवण्याचा प्रयत्न करणे जरूर आहे. हा प्रयत्न यशस्वी झाल्यास स्टेट काँग्रेस आपला सत्याग्रह, तिच्या कार्यकर्त्यांची बिनशर्त मुक्तता करण्याचा व इतर तडजोडीच्या सामान्य अटीवर बंद करील असा आमचा अंदाज आहे. आणि असे झाले म्हणजेच उपरिनिर्दिष्ट भीषण भविष्ये खोटी ठरतील. हैद्राबादचे सरकार राजकीय संस्था स्थापन करण्याच्याविरुद्ध नसल्याचे हैद्राबादच्या पंतप्रधानांनी घोषित केले असल्यामुळे व महात्माजींनी स्टेट काँग्रेस जातीय युद्ध ठरू शकत नसल्याचे स्पष्ट मत दिले असल्यामुळे कॉंग्रेस सरकार व वर्किंग कमिटी स्टेट काँग्रेसच्या स्थापनेवरील बंदी दूर करण्याचा मनःपूर्वक प्रयत्न करील तर यशस्वी होईल अशी आमची पूर्ण खात्री आहे.

## स्टेट काँग्रेसवरील बंदी

महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीने हैद्राबादच्या सत्याग्रहाला सहानुभूती दर्शविणारा ठराव मान्य केला आहेच. तिने वर्किंग कमिटीचे व वर्किंग कमिटीने कॉंग्रेस सरकारचे या प्रश्नाकडे विशेषत्वाने लक्ष वेधून वरील प्रकारे तो सोडविण्याचा नेटाने प्रयत्न करणे जरूर आहे. पुण्यास स्थापन झालेले काँग्रेसनिष्ठांचे साहाय्यक मंडळ या दिशेने प्रयत्न करील तर हैद्राबाद स्टेट काँग्रेसला जास्तीत जास्त साहाय्य होणारे आहे.

जातीय व राजकीय किंवा धार्मिक व राजकीय चळवळीच्या सीमारेषा आंखण्यास हैद्राबाद सरकारला ही सुवर्ण संधि प्राप्त झालेली आहे. स्टेट काँग्रेसच्या स्थापनेवरील बंदी उचलून राजकीय व धार्मिक चळवळी व कार्यकर्ते यांचे स्पष्ट पृथक्करण करणे सरकारला फारच सुलभ आहे. पण ही संधी वाया घालवून सरकार जर जातीयतेचा सर्रास शिक्का मारण्याचा

फाजील हट्ट धरील तर त्यांना संस्थानांतील सर्व प्रजेच्याच नव्हेतर बाहेरील सहानुभूतिला मुकावे लागेल. कारण त्यामुळे हैद्राबादचे सरकार आपल्या प्रजेला राजकीय हक्क मिळविण्यासाठी सनदशीर मार्गाने तयार नाही व खोट्या जातीयतेच्या नावावर त्यांना नामशेष करू पहात आहे असे सिद्ध होईल. आम्हाला आशा आहे कीं रा. ऑ. सरसाहेब संस्थानांतील परि-स्थितीची तीव्रता कमी करण्यास व हैद्राबाद सरकारची तशीच स्टेट कॉंग्रेसची भूमिका स्पष्ट करण्यास कॉंग्रेसच्या स्थापनेवरील बंदी दूर करून अवसर देतील व आपल्या कीर्तीत भर घालतील.

कायदेभंग : दि. १० नोव्हें. १९३८

# स्टेट कॉंग्रेस दिन

## हा दिन कसा साजरा करणार ?

हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसच्या स्थापनेस ता. १९ दय सन १३४८ फसली रोजी (२३ नोव्हेंबर १९३८) एक महिना होत आहे. स्टेट कॉंग्रेसला जन्मताक्षणीच आपल्या अस्तित्वाकरिता सरकारशी लढाई सुरू करावी लागली; आणि म्हणूनच आज आपण 'प्रथम स्टेट कॉंग्रेस-दिन' साजरा करीत आहोत. सरकारशी जोपर्यंत स्टेट कॉंग्रेस लढत आहे तोपर्यंत दर महिन्यास हा 'स्टेट कॉंग्रेस-दिन' साजरा करण्यात येणार आहे. जन्मताक्षणीच स्टेट कॉंग्रेसवर लढाईचा प्रसंग आला हे मोठे भाग्याचे लक्षण समजले पाहिजे, कारण लढाईतूनच नेहमी नवचैतन्य निर्माण होत असते. स्टेट कॉंग्रेस अखेर विजयी होऊन आपले भावी आयुष्य निर्वेधपणे व सुखाने व्यतीत करणार, एवढेच या लढाईतून निष्पन्न होणार नसून ही लढाई अखिल हैद्राबाद संस्थानाला नवजीवन देणार आहे. 'नवीन हैद्राबाद' या लढाईतून निर्माण होणार आहे. मागासलेले, अडाणी, अशिक्षित, दरिद्री, गुलाम असे हैद्राबाद संस्थान या लढाईत नामशेष होऊन नवीन विचाराचे व स्वतंत्र असे हैद्राबाद संस्थान या लढाईतून निर्माण होणार आहे. नवविचाराने भारलेली व स्वातंत्र्याचा संपूर्ण उपभोग घेणारी संस्थानी जनता आपले दुःख, क्लेश, दारिद्र्य, अज्ञान यांचा नायनाट करून आपल्या सर्वांगीण उत्कर्षाचा गड द्रुतगतीने चढू लागेल. म्हणून स्टेट कॉंग्रेसच्या लढाईने आपला भाग्याचा दिवस उजाडला असेच आपण म्हटले पाहिजे. न लढणाऱ्या व सामान्य जगाच्या रीतीने वाढत जाणाऱ्या

मुलाचा जन्मदिन वर्षाने साजरा करतात. पण आपले स्टेट काँग्रेसचे बालक असामान्य आहे. जन्मताक्षणीच आपल्या शत्रूचा नायनाट करण्याचा चंग त्याने बांधला आहे. अशा पराक्रमी मुलाचा वाढदिवस दर महिन्यास करीत असतात. कारण लढाईत त्याचे शरीर, त्याची शक्ती जलदीने वाढत असते. ही लढाई सुरू झाली नसती तर स्टेट काँग्रेसची वाढ इतकी जलद झाली नसती. सरकार ती दडपून टाकण्याचा प्रयत्न करीत आहे म्हणूनच ती जोराने वाढत आहे व अखिल हैद्राबाद संस्थानात नवजीवन निर्माण करीत आहे. म्हणून अशा काँग्रेसचा जन्मदिन आपण मोठ्या थाटाने साजरा करणे अवश्य आहे. शूर व निर्भय मुलाचा जन्मदिन शौर्याने व निर्भयपणे साजरा करावा लागतो. सरकारच्या दडपशाहीस अगर धाकदपटशास न भिता प्रत्येकाने हा काँग्रेस दिनाचा कार्यक्रम पार पाडला पाहिजे, या दिवशीच्या कार्यक्रमात प्रत्येकाने चढाओढीने भाग घेतायेण्यासारखा आहे.

काँग्रेसचे सत्याग्रही या दिवशी सकाळी प्रभातफेरी काढतील. तीत काँग्रेसची बॅजेस लावून सर्वांनी सामील झाले पाहिजे. तसेच संध्याकाळी नागरिकांची जाहीर सभा होईल तिला हजर राहिले पाहिजे. शिवाय प्रत्येकाने आपला विशिष्ट कार्यक्रम पार पाडला पाहिजे. या दिवशीचा सार्वत्रिक हरताळ यशस्वी केला पाहिजे.

### विद्यार्थ्यांनो– तुम्ही काय करणार ?

विद्यार्थ्यांनी या दिवशी शाळा कॉलेजात न जाता ती ओस पाडली पाहिजेत. बिलकूल भिता कामा नये. प्रत्येकाने स्टेट काँग्रेसची लहान बॅजेस विकत घेऊन ती अंगावर लावून हिंडले पाहिजे. संध्याकाळच्या सभेस प्रत्येकजण हजर रहा. तेथे काँग्रेसचा जयजयकार करा. काँग्रेसचे स्वयंसेवक बनून काँग्रेसची बॅजेस विका, काँग्रेसची पत्रके वाटा.

तरुण विद्यार्थ्यांनो, भावी स्वातंत्र्याचे तुम्ही जनक आहात. तुम्हीच राष्ट्रामध्ये नवजीवन निर्माण करणार आहात. नवीन राष्ट्र बनविण्याची जबाबदारी तरुणावर असते. म्हातारी माणसे ही कामे करू शकत नाहीत. ज्या गुलाम राष्ट्रांनी स्वातंत्र्य मिळविले त्या प्रत्येकाचा तुम्ही इतिहास पहा.

तरुण व विद्यार्थीच बिनींचे लढवय्ये असलेले तुम्हाला आढळतील. तरुणच नेहमी आपल्या आत्मबलिदानाने स्वातंत्र्य मंदिराचा पाया रचत असतात. नवे तुर्कस्तान कोणी निर्माण केले? नवा चीन कोणी निर्माण केला? इतिहास तुमच्यापुढे आहे. पण प्रत्यक्ष आपला स्वतःचा इतिहास बनविण्याची वेळ आली असताना दुसऱ्यांच्या इतिहासाची घोकंपट्टी करीत बसू नका. इतिहासाचे वाचन एवढ्याकरिताच करावयाचे की आपला उज्ज्वल इतिहास बनविण्यास आपण समर्थ व्हावे. अशा वेळी आपण ती जड पुस्तके फेकून दिली पाहिजेत. आज प्रत्यक्ष कृतीने आपल्या भावी नवोदित राष्ट्राच्या इतिहासाची पाने आपणास लिहावयाची आहेत. यावेळी आपण मागे राहता उपयोगी नाही. जगातील इतर तरुणांनी व विद्यार्थ्यांनी जे केले ते आपण कां करू शकणार नाही? आपण खात्रीने करूच करू. इतर राष्ट्रे किती पुढे गेली आहेत व आपण किती मागे आहोत? आपल्या मागासलेपणाला आपले जुलमी अनियंत्रित सरकार हेच कारणीभूत आहे. लोकांच्या तंत्राप्रमाणे चालणारे सरकार असल्याशिवाय कोणत्याही राष्ट्राचा उत्कर्ष होऊ शकत नाहीं. दारिद्र्य, बेकारी, दैन्य, गलिच्छपणा, रोग, अज्ञान ही सर्व या अनियंत्रित व जुलमी राजसत्तेचा परिणाम आहे. आणि ही जुलमी सत्ता नाहिशी करून लोकशाही सत्ता स्थापन केल्याखेरीज या गोष्टीचा नायनाट आपण करू शकणार नाही. जगाचा हाच अनुभव आहे. हा अनुभव लक्षात घेऊनच स्टेट कॉंग्रेसने आपला झगडा सुरू केला आहे. यात विजय मिळविणे सर्वस्वी तुम्हा तरुण वर्गावर अवलंबून आहे. आपल्या वैयक्तिक स्वार्थाकडे लक्ष देणारा तो तरुणच नव्हे. आपले देशबंधु, आपले राष्ट्र सुखी, ज्ञानी, संपन्न करण्याकरिता आपल्या प्राणाचीदेखील पर्वा करीत नाही तोच तरुण. तरुण हा नेहमी आशावादी असतो. आपल्या बलिदानानेच आपण भावी राष्ट्र निर्माण करणार आहोत अशी त्याची श्रद्धा असते; आणि या श्रद्धेमुळे तो राष्ट्रीय होमकुंडात उडी घेतो. मग हैद्राबाद-मधील तरुण विद्यार्थी याला अपवाद ठरणार काय?

### व्यापाऱ्यांनो– तुम्ही काय करणार?

जुलमी अनियंत्रित राज्यसत्ता असताना देशांतील व्यापाराची कधीच भरभराट होत नाही. इतर देशांतील व्यापारी वर्ग किती पुढे गेला आहे

व तुम्ही किती मागासलेले आहात? किंबहुना जुलमी राज्यसत्ता जर कोणास अधिक नडत असेल तर ती व्यापाऱ्यासच. म्हणून लोकशाही-करता जगामध्ये जी जी युद्धे झाली त्यात व्यापारीवर्गाचा पुढाकार होता. व्यापारीवर्गानेच प्रथम बंडाचे निशाण उभारले व लोकशाहीचा पाया घातला. जगातील व्यापारीवर्ग पुढारलेला आहे याचे कारण म्हणजे त्या वर्गाने प्रथम जुलमी राज्यसत्तेचा नायनाट करून लोकशाही निर्माण केली आहे. तुम्हाला तुमचा उत्कर्ष साधावयाचा असल्यास तुमच्या संस्थानांत तुम्ही लोकशाही निर्माण केलीच पाहिजे. लोकशाहीत प्रत्येक गोष्ट लोकांच्या तंत्राने होत असल्यामुळे तुमच्या व्यापारास धोका पोचेल अशी कोणतीही गोष्ट घडू शकत नाही. आज येथे कोणतीही गोष्ट तुमचे मत घेऊन केली जात नाही. आपल्या लहरीस येईल त्याप्रमाणे सरकार तुमच्यावर कर बसवून अगर अन्य जाचक अटी घालून तुम्हास पिळून काढीत असते. त्यामुळे तुमचा व्यापार वाढू शकत नाही. तुम्हाला कांहींच स्वातंत्र्य नसते. म्हणून तुम्हाला आपले हित साधून घ्यावयाचे असल्यास तुम्ही हे स्वातंत्र्य प्रथम मिळविले पाहिजे. त्याकरिता तुम्ही येथे लोकशाही निर्माण केली पाहिजे; तरच तुमच्या व्यापाराची धडगत आहे. म्हणून स्टेट कॉंग्रेसने लोकशाहीकरता जो लढा सुरू केला आहे त्यात प्रथम तुम्ही सामील झाले पाहिजे. क्षणिक नफा-नुकसानीचा विचार करून जर या लढ्यांत तुम्ही सामील न व्हाल तर मग तुमचे भवितव्य भीषण आहे हे लक्षात ठेवा. तुम्हास व्यापारी म्हणून मानाने जगावयाचे असेल व आपला उत्कर्ष करून घ्यावयाचा असेल तर तुम्हाला निर्भय बनून त्याग केलाच पाहिजे. आज तुम्ही जो त्याग कराल त्यावर तुमचे भावी जीवन अवलंबून आहे. म्हणून स्टेट कॉंग्रेसच्या लढ्यात तुम्ही सामील झाले पाहिजे. या लढ्यास तुम्ही सहानुभूती दाखविली पाहिजे, आर्थिक साहाय्य केले पाहिजे. या कॉंग्रेस दिनाच्या दिवशी तुम्ही प्रभातफेरीस व सभेस अवश्य गेले पाहिजे. मुख्य गोष्ट म्हणजे या दिवशी तुम्ही आपली दुकाने बंद ठेवून संपूर्ण हरताळ पाडून जुलमी सरकारचा निषेध व्यक्त केला पाहिजे व कॉंग्रेसला सहानुभूती दाखविली पाहिजे. एकाही व्यापाऱ्याने दुकान उघडे ठेवता कामा नये. सरकारी अधिकारी तुमच्यावर दडपण

आणण्याचा प्रयत्न करतील पण त्यास भीक न घालता तुम्ही निर्भयपणे दुकाने बंद ठेवा. दुकान बंद ठेवणे हा बिलकूल गुन्हा होत नाही. तसेच "हैद्राबाद स्टेट काँग्रेस झिंदाबाद" अशी मोठी अक्षरे लिहलेले कागद तुम्ही विकत घ्या व तुमच्या घरात, दुकानात प्रमुख ठिकाणी सर्वांना दिसतील अशा रीतीने लावा. काँग्रेसचे स्वयंसेवक तुमच्याकडे ते घेऊन येतील ते तुम्ही विकत घ्या. असे कागद लावणे हा बिलकुल गुन्हा नाही. निष्कारण भिऊ नका. स्टेट काँग्रेसचे लहान बॅजेस विकत घेऊनही ती अंगावर लावा. आपले एक दिवसाचे उत्पन्न काँग्रेसला द्या. पहा या गोष्टी तुम्ही या दिवशी न कराल तर राष्ट्राशी बेइमान व्हाल. एवढेच नव्हे, तर आपले स्वतःचेच नुकसान करून घेण्यास कारणीभूत व्हाल.

## कामकऱ्यांनो ! शेतकऱ्यांनो !

तुम्ही तर स्टेट काँग्रेसच्या निशाणाखाली ताबडतोब जमा झाले पाहिजे. कारण आज तुम्हा लोकांची बहुसंख्या आहे. तुमच्या श्रमाने माल निर्माण होतो. जगाला अन्न, वस्त्र पुरविणारे तुम्ही आहात. पण तुमची आज काय स्थिती आहे ? तुम्ही धान्य पिकवावे, पण तुमच्या घरी खावयास अन्न असू नये. तुम्ही कपडा तयार करावा, पण तुमची बायका-मुले उघडी हिंडावीत. तुम्हास राहावयास चांगली जागा मिळू नये. जनावरासारखी घाणीत व उकिरड्यात तुमची घरे आहेत. तुमच्या मुलांना शिक्षण मिळत नाही. माणसासारखी माणसे असून जनावरासारखे तुम्हास राबवून घेण्यात येते. व जनावरासारखेच तुम्हास जगविण्यात येते. अशी स्थिती कां व्हावी याचा तुम्ही कधी विचार केला आहे काय ? तुमच्या-खळ्यावर खंडोगणती धान्य जमा होते. तुमच्या हाताने लाखो वार कपडा तयार होतो. पण तो जातो कोठे ? तुमच्यावर राज्य करणारे जुलमी सरकार व त्या सरकारची तळी उचलून धरणारे जहागीरदार, सावकार, भांडवलदार हे वर्ग तुमची ही लुबाडणूक करीत आहेत. जुलमी सरकार व हे ऐतखाऊ वर्ग यांचे संगनमत असते. सरकार तुमची लुबाडणूक करीत आहे, इतकेच नव्हे तर, तुम्हास त्याची जाणीव होऊ नये म्हणून सरकारने तुम्हास जाणून बुजून अज्ञानात ठेवले आहे. जे सरकार तुमच्या अन्नावर पोसते त्याने तुम्हास शिक्षण न देता आंधळे करून सोडले आहे. या तुमच्या

आंधळेपणाचा फायदा इतर वर्ग घेत आहेत व त्यांनीही तुमची लुबाडणूक चलविली आहे. तुमची ही स्थिती केव्हा सुधारणार? तुम्हास जाणीव झाल्यानंतर तुम्हाला कळून येईल की दारिद्र्याचे, दुःखाचे मूळ आपल्यावर राज्य करणाऱ्या जुलमी व अनियंत्रित सरकारात आहे. तुम्हा बहुसंख्य प्रजेच्या तंत्राने चालणारे ज्यावेळी राज्य होईल त्यावेळीच तुमची ही हलाखीही दूर होईल. तुमचे मत घेऊन त्याप्रमाणे राज्यकारभार चालला पाहिजे. त्यानेच तुमचे हित साधणार आहे. बहुसंख्य प्रजेच्या मताप्रमाणे राज्यकारभार चालणे म्हणजे लोकशाही; आणि या लोकशाहीकरिता जबाबदार राज्यपद्धतीकरता स्टेट कॉंग्रेसने सरकारशी लढाई सुरू केली आहे. तुम्हा लोकांचाच प्रामुख्याने हा प्रश्न असल्यामुळे तुम्ही या लढाईत सामील झाले पाहिजे. सध्याच्या जुलमी सरकारास संघटना व एकी करून शेतकरी वर्गाने कर देण्याचे नाकारले पाहिजे. तुम्ही कर दिला नाही म्हणजे सरकार कोलमडले म्हणून समजा. कामकऱ्यानो! तुम्ही ज्या लहान अगर मोठ्या कारखान्यात काम करीत असाल तेथे या दिवशी संप पुकारा; कामावर जाऊ नका व अशा रीतीने कॉंग्रेसच्या लढ्यास सहानुभूती दाखवा. तुम्हाला ही गोष्ट करणे शक्य आहे. मालकाची अगर सरकारची भीती बाळगण्याचे काहीच कारण नाही. शेतकऱ्यांनो! तुम्ही यादिवशी शेतातील काम बंद ठेवा व कॉंग्रेसच्या या दिवशीच्या कार्यक्रमात सामील व्हा. सर्व शेतकरी कामकरी वर्गाने यादिवशीच्या प्रभातफेरीस व सभेस जरूर जावे. कॉंग्रेसची बॅजेस अंगावर लावावीत. कॉंग्रेस झिंदाबादचे कागद आपल्या घरी लावावे.

टॅक्सी ड्रायव्हर्स, बस ड्रायव्हर्स व टांगेवाले यांनी या दिवशी आपले व्यवहार बंद ठेवावेत. कॉंग्रेसच्या प्रभातफेरी, सभा इत्यादी कार्यक्रमांत सामील व्हावे. तुमची सध्याची जी दुःखे आहेत ती येथे प्रजातंत्र राज्य निर्माण झाल्याशिवाय नाहीशी होणार नाहीत हे लक्षात ठेवा. म्हणून स्टेट कॉंग्रेसच्या लढ्यात सामील होणे व तिच्या लढ्याला सहानुभूती दाखविणे हे तुमचे कर्तव्य आहे.

इतर खासगी नोकरानी व व्यक्तिगत धंदेवाल्यांनीही या दिवशी आपले काम बंद ठेवून या दिवशीच्या कॉंग्रेसच्या सर्व कार्यक्रमांत सामील

व्हावे. जुलमी राज्यांत व गुलामीत एक सन्मान्य नागरिक म्हणून तुम्हास वावरता येत नाही. म्हणून कॉंग्रेसच्या या लढ्यास तुम्ही सहानुभूती दाखविली पाहिजे; तुम्ही त्यात सामील झाले पाहिजे.

सरकारी नोकरांनीही या दिवशी कामावर न जाता हरताळ पाळला पाहिजे. तुम्ही सरकारी नोकरीत आहात म्हणून तुमची चांगली स्थिती आहे असे बिलकूल समजू नका. कारखान्यांतील मजुरांसारखेच पण थोडे प्रतिष्ठित मजूरच तुम्ही आहात हे लक्षात ठेवा. पण तुमच्या चटकन ही गोष्ट लक्षात येत नाही. जुलमी सरकार व त्यांची वरिष्ठ अधिकाऱ्यांची प्रभावळ तुमच्याच करवी तुमच्या देशबांधवांवर जुलूम करीत आहे. काय सरकारने तुमचे हित केले आहे ? काय तुमची गरिबी सरकार पूर्णपणे नाहीशी करू शकले आहे ? तुम्हास चार तुकड्यावर वश करून तुमच्याकडून तुमच्या भाईबंदांवर ते जुलूम करीत आहे. तुमच्या मुलांबाळांच्या बेकारीचा अगर पोटापाण्याचा प्रश्न सोडविण्याची सरकारने तुम्हास काय हमी दिली आहे ? तुम्ही आज, सरकारचे आपण आहोत या अभिमानाने जरी वागत असला तरी तुमच्या भावी पिढीची, मुलांबाळांची स्थिती इतरांप्रमाणेच होणार आहे हे लक्षात ठेवा. मग पुढे आपल्याच मुलांबाळांना भरडणाऱ्या सरकारचा वृथा अभिमान कां धरता ? सामान्य जनतेच्या सुखदुःखाशी समरस व्हा. मग तुम्हास स्टेट कॉंग्रेसला सहानुभूती दाखवावी असे खात्रीने वाटेल. म्हणून या दिवशी कामावर न जाता तुम्ही कॉंग्रेसच्या कार्याला सहानुभूती दाखवा.

## आर्थिक बहिष्कार

यादिवशी कोणीही निजाम सरकारच्या पोस्टाने व्यवहार करू नये. निजाम पोस्टात पैसे ठेवू नयेत. यादिवशी आपली असलेली सर्व शिल्लक काढून घ्यावी व कॉंग्रेसचा जोपर्यंत लढा चालू आहे तोपर्यंत निजामाच्या पोस्टाच्या अगर इतर बँकेत पत्रव्यवहार करू नये. या दिवसापासून निजाम सरकारची कागदी नोट स्वीकारू नये. रुपये, नाणे मागण्यास सुरवात करावी. सरकारी खजिन्यांत आपल्या जवळच्या सर्व नोटांचा भरणा करून रोकड रुपायांची मागणी करावी. सरकारी कारखान्यात तयार झालेला कोणताहि माल वापरू नये. सरकारी मोटारी-बसमधून यादिवशी

शक्यतोवर प्रवास करू नये. सरकारला मदत होईल असे कोणतेही कृत्य यादिवशी करू नये. वकिलांनी कोर्टांत जाऊ नये. सर्वांनी आपली एक दिवसाची मिळकत कॉंग्रेसला द्यावी. विद्यार्थ्यांनी या दिवशी स्वयंसेवक बनून या दिवशीच्या कार्यक्रमास मदत करावी.

सर्व स्त्री पुरुषांनी आपापल्या गांवी तेथे सकाळी निघणाऱ्या प्रभात-फेरीत सामील व्हावे, संध्याकाळी सभेस जावे व आपला कॉंग्रेसवरील विश्वास ठरावाने व्यक्त करावा. घरी अगर दुकानांत "स्टेट कॉंग्रेस झिंदाबाद" चे मोठ्या अक्षरांत लिहलेले कागद विकत घेऊन लावावेत. कॉंग्रेसची बॅजेस अंगावर लावावीत, कॉंग्रेसचा जयजयकार करावा; आणि सरकारला दाखवून द्यावे की तुम्ही कितीही दडपशाही केलीत तरी कॉंग्रेस मरणार नाही. कारण ती आमची- आम्हा बहुसंख्य प्रजेची आहे. कॉंग्रेसच आमचे हित साधणार आहे. कॉंग्रेसचा लढा हा बहुसंख्य प्रजेचा आहे. तो कोणत्याही जातीचा अगर धर्माचा नाही. या लढ्यामुळे आमचे प्रश्न सुटणार आहेत. तुमच्या जुलमी सरकारने हिरावून नेलेली आमची माणुसकी या लढ्यातूनही आम्हास मिळणार आहे. म्हणून आम्ही जाहीर करतो की कॉंग्रेस ही आमची, कॉंग्रेस सत्याग्रह आमचा आहे, कॉंग्रेसवर आमचा अढळ विश्वास आहे. तिला कधीही सोडणार नाही— कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणे आम्ही चालू.

"हैद्राबाद स्टेट कॉंग्रेस झिंदाबाद"

**संजीवनी** : दि. २२ नोव्हेंबर १९३८

# हैद्राबाद सरकारला आव्हान

## सत्याग्रहाचा लढा का थांबविला ?

हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसने आपला सत्याग्रहाचा लढा एकाएकी तात्पुरता थांबवला असल्याचे गेल्या ता. २३ डिसेंबरला जाहीर केले. ती घोषणा प्रथम कॉंग्रेसचे १६ वे सर्वाधिकारी ॲड. काशीनाथराव वैद्य यानी केली असून, स्टेट कॉंग्रेसच्या कार्यकारी मंडळाने ता. २६ डिसेबरला वर्ध्याहून एक पत्रक काढून तिला एकप्रकारे दुजोरा दिला आहे. सर्वाधिकारी व वर्किंग कमिटी यांची सविस्तर पत्रके आम्ही गतांकी प्रसिद्ध केलेली आहेतच. सत्याग्रहाच्या चळवळीला दिवसगतीनुसार वाढता जोर चढत असताना व कॉंग्रेसचे जवळजवळ चारशे सत्याग्रही कारागृहवासाच्या यमयातना सहन करीत असताना लढा एकाएकी का थांबवला गेला या-संबंधी दोन्ही पत्रकांत सविस्तर स्पष्टीकरण केलेले आहे. सत्याग्रहाच्या शास्त्रावर व शस्त्रावर पूर्ण विश्वास असून त्याची प्रमेयें अभ्यासिली असणा-रांना हे स्पष्टीकरण समाधानकारक वाटेल असेच आहे. त्यांत पुन्हा, सत्याग्रहाचे द्रष्टे महात्माजी व इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे अनुभवी व यशस्वी नेते यांचीच ही सूचना होती व केवळ थोरा-मोठ्यांची सूचना म्हणून नव्हे तर, ती योग्य आहे यासंबंधी पुरेशी चिकित्सा करून खात्री पटल्यानंतर मान्य करण्यात आली आहे, हे लक्षांत घेतले म्हणजे तिच्या योग्यायोग्यतेचा प्रश्न पुन्हा विचारात घेण्याचेही कारण उरत नाही.

अत्याचारी किंवा प्राणघातक शस्त्रास्त्रांनी लढली जाणारी युद्धे व अनत्याचारी सत्याग्रह संग्राम यांच्यांत उत्तर व दक्षिण ध्रुवाइतके अंतर

आहे. पाशवी शक्तीच्या बळाने प्रतिपक्षावर आपले म्हणणे जबरदस्तीने लादणें हा पहिला मार्ग असून स्वतः क्लेश सहन करून प्रतिपक्षाच्या हृदयाचा पालट घडवून आणून आपला न्याय्य हेतू सफल करणे हा दुसरा मार्ग आहे. मनुष्याचे मूळ स्वरूप निर्दोष असते, हे तत्त्व प्रामुख्याने लक्षांत घेऊन, कसल्यातरी कृत्रिम कारणांनी त्यांत घुसलेले दोष, सत्याग्रहीने स्वतःच्या शुद्ध आचरणाने, उच्च विचारसरणीने व प्रसगी स्वतः क्लेश सहन करून, पटवून दूर करावयाचे असतात. प्रतिपक्षाच्या मनात सत्याग्रही-विषयीं किंवा त्यांच्या भूमिकेविषयी संशय, शंका किंवा भीती असणार नाही याविषयी शक्य असेल तेवढी दक्षता घेणे व असल्यास ती शक्य त्या मार्गाने दूर करण्याचा प्रयत्न करणे हे सत्याग्रहीचे आद्य कर्तव्य आहे. हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसच्या जातिपंथनिरपेक्ष भूमिकेसंबंधी हैद्राबाद सरकारला प्रथमपासूनच संशय वाटत असल्यामुळे तो प्रत्यक्ष प्रमाणावरून दूर करण्याचा प्रयत्न करणे कॉंग्रेसला अत्यावश्यकच होते. विद्यमान परिस्थितीत हा प्रयत्न परिणामकारक होण्यास सत्याग्रहाची तात्पुरती तहकुबी हाच मार्ग होता व तो कॉंग्रेसने अवलंबिला आहे. सरकारवर त्याचा काय परिणाम होतो हे आतां पहावयाचे आहे. सरकारच्या प्रामाणिकपणाला कॉंग्रेसने दिलेले हे एक प्रकारचे आव्हानच आहे. "आम्ही राजकीय चळवळ करण्याच्या विरुद्ध नाही, आम्हाला फक्त जातीयतेचे वावडे आहे," या सरकारच्या म्हणण्यात किती सत्यांश आहे हे तपासण्याची, सत्याग्रहाची तात्पुरती तहकुबी ही एक भट्टीच आहे. या समयोचित तहकुबीने कॉंग्रेसने आपली भूमिका शुद्ध करून तर घेतलीच, पण त्याबरोबरच सरकारच्या भूमिकेलाही अत्यंत कठीण अशी कसोटी लावली आहे. या कसोटीला सरकार कितपत उतरते हे आता पाहावयाचे आहे.

## हा ओघ अडवता येणार नाही

मनुष्याने नेहमी सदिच्छा कराव्या हा नीतिपाठ सर्वोत्कृष्ट आहे. पण दुधाने तोंड भाजले म्हणजे मनुष्य ताकहि फुंकून पिऊ लागतो हा व्यावहारिक अनुभव अगदींच दुर्लक्ष करण्यासारखा नाही. विशेषतः ज्याचे तोंड दुधाने अनेकवेळा भाजले असेल त्याला ताक फुंकताना पाहून, निदान तसा अनुभवच नसणारांनी किंवा क्वचित अनुभव असणारांनीं हंसणे योग्य ठरणार नाही.

हैद्राबादेतील दुर्दैवी जनतेला तापलेल्या दुधाचे थंड ताक बनवून पिण्याचा अनुभवच नाही, त्यामुळे या तहकुबीचा सरकारवर कांहीं इष्ट परिणाम होईल असे मानावयास आजपर्यंतच्या अनुभवावरून कोणी व्यवहारी मनुष्य तयार होईलसे वाटत नाही. आला हजरत व मंत्रीमंडळ, खुद्द मंत्रीमंडळ, व मत्रीमंडळ आणि खालचा अधिकारी वर्ग यांच्यांत वसत असलेल्या बेबनावाच्या समजुतींना आधारभूत असलेले थोडेसे सत्य मान्य करावयाचे ठरल्यास वरील भीति अगदीच निराधार मानता येणार नाही. ही भीति साधार मानण्यास आणखीहि अनेक कारणें दाखवता येतील. तथापि कालाच्या प्रचंड ओघाला अडवणे हैद्राबाद सरकारला याहि खेपेला सहज शक्य होईल असे मानणे योग्य होणार नाही. आपला बाह्यात्कारी मोठेपणा कायम ठेवून माघार घेण्याची प्राप्त झालेली ही सुवर्णसंधी दवडणे सरकारला फार जड जाणार आहे. भविष्यकाळात येणाऱ्या फेडरेशनच्या दाबामुळे हैद्राबाद सरकारचा जीव गुदमरू लागला आहे हे गेल्या वर्षातील अनेक घटनांवरून स्पष्ट झाले आहे. शिवाय आजचा प्रश्न कॉंग्रेस-स्थापना व राजबंदींची मुक्तता एवढ्यापुरताच मर्यादित आहे. कॉंग्रेस-स्थापनेला करण्यात आलेली बंदी ही कांहीं अधिकाऱ्यांच्या काल्पनिक भीतीवरच आधारलेली असल्यामुळे ती उठवण्याच्या कामी सरकारच्या आवडीची जातीनिष्ठा, फारशी काय पण मुळींच विरोध करणार नाही असे वाटते. कॉंग्रेस सत्याग्रहाची तहकुबी महात्माजी व इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या सल्ल्यावर आधारलेली असल्यामुळे कॉंग्रेस-स्थापनेवरची बदी आता कायम ठेवणे म्हणजे इं. नॅ. कॉंग्रेसच्या नाराजीला विनाकारण पात्र होणे आहे, हे हैद्राबादेतील मुत्सद्यांना निश्चित माहीत आहे. जातिनिष्ठांना कॉंग्रेसच्या नाराजीची फारशी क्षिती वाटत नसल्याचे त्यांच्या बोलण्यावरून दिसते; तसेच हैद्राबादेतील जबाबदार अधिकाऱ्यांना खास वाटत नसावे असे मानण्यास बरेच आधार उपलब्ध होऊ शकतात. या एकंदर गोष्टींचा तुलनात्मक विचार करता स्टेट कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीने व्यक्त केलेली आशा खरी ठरण्याचाच अधिक संभव वाटतो.

## संघटना वाढविण्याची संधी

स्टेट कॉंग्रेसवरील बंदी दूर केली जाईल व राजबंदी सुटतील अशी

आशा बाळगणे आजच्या परिस्थितीत योग्य असूनही कॉंग्रेसने आपली शक्ती हरिजनोद्धार, खादी-प्रचार इत्यादि गोष्टीकडे आज वळवावी हे म्हणणे पटण्यासारखे नाही. शक्यता असल्यास राजकारणाच्या धकाधकी-साठी उपयोगी न येणारी शक्ति वरील कारणांसाठी स्वतंत्र संस्था स्थापन करून किंवा असतील त्यांच्याद्वारे कार्यक्षम करण्याचा प्रयत्न करण्यास हरकत नाही. पण त्यामुळे कॉंग्रेसचे, आपल्या जबाबदार राज्यपद्धति व नागरिक हक्कसंपादनाच्या ध्येयावरील लक्ष यत्किंचितहि कमी होऊ देणे नुसते अयोग्यच नाही तर घातुक ठरण्याचा संभव आहे. हैद्राबादेतील विशिष्ट परिस्थिती जातीयतेच्या नंग्यानाचाला उत्तेजन देणारी असल्यामुळे संस्थानातील बहुजन समाजाच्या मनावर कॉंग्रेसची शुद्ध जाती-पंथनिरपेक्ष व राजकीय विचारसरणी ठसविण्यासाठी पुढील काही वर्षे चिकाटीने प्रयत्न करणे अत्यंत अवश्य आहे आणि हा प्रयत्न करण्यासाठी तहकुबीचा काल, कॉंग्रेस कार्यकर्त्यांचे पद्धतशीर संघटन घडवून आणण्यास व दुर्दैवाने लढा पुन्हा ताबडतोब सुरू करावा लागल्यास तो दुप्पट वेगाने तात्काळ सुरू करता यावा यासाठीच खर्च केला गेला पाहिजे. विनाकारण कैदेत जाऊन यमयातना सहन कराव्या असे कोणी, वेडा असल्याशिवाय, म्हणणार नाही. हैद्राबाद सरकारने उद्या नागरिक स्वातंत्र्य व जबाबदार राज्यपद्धति दिल्याचा जाहीरनामा काढला तरी सत्याग्रह करावा असे म्हणणारा कोणी असू शकत नाही. पण सदिच्छा बाळगण्याच्या तत्त्ववेत्त्यांच्या सूचनेला मान्यता देऊनहि, स्टेट कॉंग्रेसने आशाळभूतपणे, कोणी येणारा-जाणारा, जबाबदार राज्यपद्धती व नागरिक स्वातंत्र्याचे जांभूळ आपल्या तोंडात टाकील अशी आशा करणे व्यर्थ आहे. विद्यमान सरकारचे राज्ययंत्र अनत्याचारी मार्गाने बंद पडण्याइतके सामर्थ्य, स्टेट कॉंग्रेसने आपल्या त्यागाने व संघटनेने मिळविल्याखेरीज तिला आपले ध्येय साध्य करणे शक्य होऊ शकत नाही. स्टेट कॉंग्रेसने आपल्या कार्यकर्त्यांना ताबडतोब खेड्यांपाड्यात पाठवून शेतकऱ्यांची खरी दुःखे काय आहेत व ती दूर करण्याचा एकमेव मार्ग जबाबदार राज्यपद्धति हाच कसा आहे हे समजावून सांगण्याच्या उद्योगांवर पाठवले तर फार उपयुक्त कार्य होऊ शकेल. आणि याच दृष्टीने वर्किंग कमिटीने आपल्या पत्रकांत "तहकुबीमुळे रचनात्मक

कार्यासाठी मनमोकळे झाले अशी कोणी कल्पना करू नये." अशी शेवटी सूचना केली आहे. अर्थात् या तहकुबीच्या काळात प्रक्षोभक प्रचार न होईल याविषयी फार दक्षता बाळगली पाहिजे.

सत्याग्रह तहकुबीच्या इतर अंगाविषयी सवडीनुसार आम्ही पुढे लिहू. आज स्थल-संकोचास्तव येथेच थांबणे भाग आहे. आमच्या मते काँग्रेसच्या सत्याग्रह तहकुबीत तिची स्वतःची भूमिका स्पष्ट करण्याचा प्रधान हेतू तर आहेच, पण त्याबरोबर तिच्या स्थापनेला केलेली बंदी अन्यायमूलक असल्यामुळे ती ताबडतोब रद्द करा किंवा लढाईला तयार व्हा. हे आव्हा-नहि तीत अंतर्भूत झालेले आहे. काँग्रेसचे कार्यकर्ते हे गर्भित आव्हान लक्षात ठेवून या तहकुबीच्या काळात आपली शक्ति वाढविण्याचा आटो-काट प्रयत्न करतील अशी आशा करून आम्ही आज वाचकांची रजा घेतो.

**संजीवनी : दि. ५ जानेवारी १९३९**

# ‘वंदे मातरम्’ प्रकरणाचा खेदकारक शेवट

## सरकारचा हेकेखोरपणा

उस्मानिया विद्यापीठातील वसतिगृहात, गेली चार वर्षे गायले जात असलेले ‘वंदे मातरम्’ गीत प्रार्थनेच्या वेळी हिंदू विद्यार्थ्यांनी आपल्या स्वतंत्र प्रार्थनागृहातहि म्हणू नये, असा दुराग्रह धरून हैद्राबाद सरकारने आपल्या जुलमी, इस्लामनिष्ठ व अविचारी राजवटीच्या कीर्तीत विशेषत्वाने शेवटी भर घातली आहे. विद्यार्थ्यांच्या मागण्यांचा सहानुभूतीने व समतोल बुद्धीने विचार करण्याचे सरकारने नाकारल्यामुळे तीनशेहून अधिक विद्यार्थी गेल्या आठवड्यात नाईलाज म्हणून नागपूरला रवाना झाले व आणखीहि काही जाणार असल्याचे कळते. ‘वंदे मातरम्’ प्रकरणी जवळ-जवळ दीड हजार विद्यार्थ्यांचा संबंध आलेला असून या प्रकरणाचा सरकारच्या हेकेखोरपणामुळे असा खेदकारक शेवट झाला असल्यामुळे त्याचे घटक कमीअधिक पांच ते सहा हजार व्यक्तिंना अनेक प्रकारे जागवत आहेत. ही प्रत्येक व्यक्ती सरकारच्या अरेरावीचा अंतःकरणातून निषेध करीत असेल याबद्दल शंका बाळगण्याचे कारण नाही. त्याशिवाय जगातील अनेक सुविचारी व सुबुद्ध लोकांची अंतःकरणे विद्यार्थ्यांवर ओढवलेला हा प्रसंग पाहून निश्चितपणेच हळहळली आहेत. ना. व्हॉईस-रॉयसारख्या अधिकारी व्यक्तीने कित्येक वर्षांपूर्वी कान टोचले असताही, जनतेच्या ओरडण्याचा तर हिशेबच नको, सरकारने आपले शैक्षणिक धोरणदेखील विशुद्ध ठेवण्याचा प्रयत्न केला नाही तो नाहीच. आपण जो जो जुलूम करतो तो तो मुकाट्याने सहन केला जात आहे अशी

चुकीची समजूत करून घेतल्यामुळे आमच्या सरकारला जुलूम करण्याची सनद मिळाल्याचाच भास होऊ लागला होता. अन्याय किंवा जुलूम यांचा प्रत्यक्ष प्रतिकार झालेला न दिसला तरी त्यांची मानवी मनावर प्रतिक्रिया ही निश्चयात्मक होत असते. ही अज्ञात प्रतिक्रिया गुप्तपणे फोफावत जाऊन शेवटी ती उग्र स्वरूपात प्रगट झाल्याशिवाय रहात नाही. कित्येक दिवसापासून विद्यार्थ्यांवर होत असलेले अपमानास्पद अन्याय असह्य होऊन शेवटी विद्यार्थ्यांकडून वरीलप्रमाणे त्याचा वीरोचित प्रतिकार झाला. आमचे शहाणे सरकार " उं: आमचे काय जाते ? " याच घमेंडीत अद्याप चूर आहे.

## उपासना स्वातंत्र्याच्या फोल गप्पा

हिंदू व मुसलमान विद्यार्थ्यांचे प्रार्थना स्थळ एकच असते व सरकारच्या लाडक्या मुसलमानांनी आपल्या भावना दुखावल्या जात असल्याची तक्रार केली असती तर सरकारने 'वंदे मातरम्' पदाला बंदी करणे एकवेळ न्याय्य ठरले असते. कोणी कशी प्रार्थना करावी हा ज्याचा त्याचा स्वतंत्र प्रश्न असून प्रत्येकाला या बाबतीत स्वत:पुरते स्वातंत्र्य असणे जरूर आहे. संस्थानातील प्रजेचे धर्मस्वातंत्र्य अबाधित राखण्याचा तर आमच्या सरकारने पण केलेला आहे. असे असता हिंदू विद्यार्थ्यांनी आपल्या स्वतंत्र प्रार्थनागृहात प्रार्थना गीत म्हणून 'वंदे मातरम्' चे पद गाइल्याबद्दल कोणाच्या भावना दुखावल्या जाण्याचे काही प्रयोजन नाही. हिंदू विद्यार्थी आपल्या मातृभूमीला देव मानोत की आणखी कशाला व ते तिच्या प्रार्थनेसाठी वेदातील एखादे स्तोत्र म्हणोत की आणखी कसले, त्यासंबंधी सरकारला विचार करण्याचे देखील कारण नाही. त्याअर्थी सरकारने या प्रकरणात तटस्थतेची व साम्यवादाची भूमिका न घेता असहिष्णु धर्मभावना बाळगणारांची बाजू घेऊन दुसऱ्या पक्षाच्या भावना अन्यायाने तुडविण्याचा अविचारी हट्ट धरलेला आहे, त्याअर्थी सरकार बोलून दाखवते त्याप्रमाणे सर्व धर्मियांना सारखे स्वातंत्र्य देऊ इच्छित नाही हे स्पष्ट होत आहे. 'वंदे मातरम्' हे गीत राष्ट्रगीत आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. एवढ्यावरच ते प्रार्थना-गीत होऊ शकत नाही हे सरकारचे म्हणणेच त्यांचा धर्म व उपासना स्वातंत्र्याच्या लांब लांब गप्पा कशा फोल आहेत हे सिद्ध

करते. कोणी राष्ट्राला देव मानून भजू लागला तर सरकारला त्याला अडव-ण्याचा काही अधिकारच नाही. कोणी कोणाला देव मानावयाचे हे सरकारने ठरवायचे नाही. तो उपासकांचा स्वतंत्र प्रश्न आहे. सरकारने विद्यापीठातील विद्यार्थ्यांचे उपासना स्वातंत्र्य जबरीने नष्ट करण्याचा केलेला हा प्रयत्न अत्यंत चीड आणणारा आहे. हजारो सुविद्य नागरिकांची अंतः-करणे त्यामुळे दुखवली असून सरकारवर लोकमताचा दाब असल्याखेरीज त्यांची ही अन्यायवृत्ती नष्ट होऊ शकत नाही. याचा या प्रकरणाने ताजा अनुभव आणून दिला आहे. शेकडो विद्यार्थ्यांना विनाकारण फटकाऱ्या-सरशी काढून टाकण्यास संमति देणारे सरकार हे जनतेचे खरे कल्याण काय करणार ?

## हा मार्ग अहितकारक वाटतो

या प्रकरणात विद्यार्थ्यांनी, परप्रांतात विद्यार्जनासाठी जाण्याचा जो मार्ग स्वीकारला तो मात्र आम्हाला अविचारीपणाचा तसाच परिणामी अहितकारक व कायम न टिकणारा दिसतो आहे. नागपूर विद्यापीठाने दाखवलेले औदार्य भूतदयेच्या दृष्टीने अभिनंदनीय असेल कदाचित्, परंतु त्यामुळे विद्यार्थ्यात एक प्रकारची तुटकपणाची भावना निर्माण होण्यास अवसर मिळालेला आहे. हैद्राबाद सरकार जुलमी आहे या संबंधी वाद नाही, पण त्यावर उपाय हैद्राबाद संस्थानच सोडून जाणे हा नाही. त्यासाठी हैद्राबादेतील जनतेने स्वार्थत्यागपूर्वक सरकारशी लढणे व इष्ट सुधारणा घडवून आणणे हेच योग्य आहे. याप्रकरणी उस्मानिया विद्या-पीठाशी निगडित असलेले एखादे स्वतंत्र कॉलेज स्थापन करण्याचा प्रयत्न केला गेला असता तर अधिक योग्य झाले असते. सरकारने अशा प्रयत्नाला मान्यता दिली नसती व मुलांचे वर्ष फुकट गेले असते हे आक्षेप या सूचनेवर घेतले जाऊ शकतात पण प्रयत्न न करताच सरकारने मान्यता दिली नसती या म्हणण्यात आम्हास तथ्य वाटत नाही. सरकारने मान्यता नाकारली असती तर सरकारच्या शिक्षणविषयक धोरणावर अधिक प्रकाश पडला असता व हे काल्पनिक अपयश अनेक प्रकारे हितावह ठरले असते. तथापि असा प्रयत्न करण्यास अद्यापहि अवसर आहे. या प्रकरणी लक्ष घाल-णाऱ्या जबाबदार लोकांनी असा प्रयत्न जरूर करावा अशी आमची सूचना

आहे. हा प्रयत्न करणे हैद्राबाद येथील विवेक वर्धिनी संस्थेच्या चालकांना सुलभ असल्यामुळे त्यांनी, सरकारी रोषाची फाजिल भीती दूर सारून पुढाकार घेतल्यास उत्तम होईल. सारांश, हैद्राबाद सरकार हे आपले सरकार आहे ही आपुलकीची भावना कोणच्याहि सार्वजनिक चळवळीने दृढावली पाहिजे व त्याच दिशेने आमच्या चळवळी चालल्या पाहिजे. सरकारशी हवे तेवढे झगडण्यास हरकत नाही, पण ही तोडण्याची, तुटकपणाची वृत्ती वाईट आहे. या वृत्तीमुळे समाजाचे अत्यंत नुकसान होणार असल्यामुळे तिला आळा घालण्याच्या प्रयत्नात विवेक वर्धिनीसारख्या राजमान्य व लोकमान्य संस्थेने पुढाकार घेतल्यास तिच्या आजपर्यंतच्या नावलौकिकात अधिक भर पडणार आहे. आम्हाला आशा आहे की, जबाबदार लोक असा प्रयत्न अविलंबेकरून करतील.

**संजीवनी : बि. १२ जानेवारी १९३९**

# निवेदन, आभार व क्षमा

## एक वर्षाची सेवा

स्वतंत्र वर्तमानपत्राच्याद्वारे मराठवाड्यातील जनतेची यथाशक्ती सेवा करण्याचे घेतलेले व्रत अखंड चालवल्याला एक वर्ष नुकतेच पूर्ण झाले. 'मराठवाडा' चा प्रथमांक १० फेब्रुवारी १९३८ ला प्रसिद्ध झाला होता. संजीवनीचा मागील अंक ९ फेब्रुवारी १९३९ ला प्रसिद्ध झाला. आजचा अंक या असिधाराव्रताच्या कालखंडातील दुसऱ्या वर्षाचा प्रथमांक आहे.

'मराठवाड्या' च्या प्रथमांकात व तदनंतर वेळोवेळी स्पष्ट केलेले धोरण व दिलेली अभिवचने, माझ्या अल्पमतीप्रमाणे, सामर्थ्यानुसार पालन केली आहेत. वर्षभरात जातीयतेवर प्रसंगानुसार अनेक कठोर प्रहार केले आहेत व त्यामुळे सहज प्राप्त होणारे नुकसानही आनंदाने सहन केले आहे. तथापि हैद्राबाद सरकारला माझी भूमिका जाती-पंथनिरपेक्ष असल्याचे पटलेले नाही व ते कधीकाळी पटेल अशी आशा करावयासही आधार नाही.

हैद्राबाद सरकारचा प्रेस ॲक्ट अद्याप उजेडात आलेला नाही. तो केव्हा येणार आहे याची तारीख जाहीर झालेली नाही. वर्तमान पत्रकारांनी आपल्या लेखणीला कोठे मर्यादा घालावी हे सरकार जाहीर करीत नाही. सरकारच्या 'राजकीय', 'जातीय', 'क्रांतिकारक', 'अराजक' या शब्दांच्या व्याख्या काय आहेत हे समजण्यास काही मार्ग नाही. हैद्राबादेतील वृत्तपत्रांवर असलेली बंधने मान्य करावयास तयार असतानाही सरकार 'मराठवाडा' ला परवानगी देत नाहीच, पण न देण्याची कार-

णेही सांगावयास तयार नाही. हैद्राबाद सरकारने सांगावे व जगाने खाली मान घालून ऐकावे व आचरावे अशी आज स्थिती आहे.

## परवानगी नाकारण्याचा अन्याय

हैद्राबादेतील इतर वृत्तपत्रांना घातलेली बंधने मान्य करणाराला परवानगी नाकारण्यात सरकारचा काय हेतू साधत असेल तो त्यानाच कळू जाणे ! मान्य केलेली बंधने हे लोक पालन करणार नाहीत असे सरकारला भय मानण्यास, कोणच्या त्रिकालज्ञ मुनीने कथन केलेले अचूक भविष्य कारण झालेले आहे हे समजण्यास काही मार्ग नाही. या भविष्यावर आधारणे सरकारला सोयीचे वाटत असेल तर वाटो, पण त्यामुळे परवानगीच नाकारण्याचा अन्याय करण्याचा सरकारने हट्ट धरणे हे सरकार या शब्दाला डांबर फासण्याइतकेच अपमानास्पद व लज्जास्पद आहे. एखादा वृत्तपत्रकार आपली मर्यादा सोडीत आहे असे आढळल्यास त्याला सूचना करणे व ती त्याने अमान्य केल्यास त्याला न्यायासनापुढे उभे करून शिक्षा देवविणे सरकारला शक्य का वाटू नये हेच कळत नाही. हा न्याय्य मार्ग सोडला तरी कमी अन्यायाचा व सरकारच्या संवयीचा झालेला वृत्तपत्र बंद करण्याचा मार्ग सरकारला मोकळा नाही काय ? पण झोपेचे सोंग घेणाऱ्या व सहेतुक वेड पांघरणाऱ्या सरकारची झोपमोड करणे किंवा त्याला शुद्धीवर आणणे सहज कसे शक्य होणार ?

## नावडत्यांच्या यादीत नांव

त्यामुळे इच्छा नसतांना ‘मराठवाडा’ पुण्याहून काढावा लागला. पुण्याला लाभणारे स्वातंत्र्य लोभनीय असेल, पण हैद्राबादेतील मर्यादित स्वातंत्र्य मला लाभते तर ते मी अधिक आनंदाने स्वीकारले असते. परंतु सरकारच्या डायरीत नावडत्यांच्या यादीत माझे नाव असल्यामुळे ते स्वातंत्र्य मला मिळू शकले नाही. माझे एक विनोदी मित्र मला एकदा म्हणाले, ‘वाघमारे ! तुम्ही मुसलमान झाला तर तुम्हाला सरकार परवानगी देईल कदाचित.’ मी म्हणालो, ‘मुसलमान होणें न होणें हा प्रश्न स्वतंत्र आहे; पण वादविवादासाठी क्षणभर ही सूचना मान्य केली तरी परवानगी मिळण्याची काही आशा नाही. तेव्हांही ‘अराजक’ किंवा ‘क्रांतिकारक’

या विशेषणाच्या तरवारी मजसाठी तळपत असणारच. सरकारची बंधने मान्य करावयास तयार असणाऱ्या मजसारख्यालाही सरकार आपल्या हटवादीपणाने, बाहेर राहून कार्य करण्यास भाग पाडीत आहे.'

परंतु सरकारचे एव्हढ्याने समाधान झालेले दिसत नाही. सरकारने गेल्या वर्षात मराठवाडा, नागरिक, संग्राम, रणदुंदुभी, समरभूमि, हैद्राबाद-स्वराज्य, मोंगलाई, कायदेभंग, सत्याग्रह व कायाकल्प अशी दहा पत्रे बंद केली. मराठवाड्याचा अपवाद वगळल्यास सरकारने बाकीची पत्रे विचार न करता केवळ खुनशीपणानेच बंद केली. शेवटी संपादकीय लेख न लिहिण्याचे धोरण अवलंबून पाहण्याचे मी नाइलाजाने ठरवले. क्वचित एक-दोन अपवाद वगळता 'संजीवनी' त संपादकीय लेख आलेले नाहीत. सरकारने हे पत्र बंद केले नसल्यामुळे मला वाटले की सरकारला हे धोरण मान्य असावे. जे सरकार पत्राची उत्तरे देत नाही, कायदा करीत नाही, त्याची नाडी तरी कशी पाहावी ? या अशाच प्रकाराने अंदाज करण्याशिवाय मार्ग नाही. स्थानिक पोलिसांच्या अरेरावीमुळे 'संजीवनी' ला जो काही अडथळा झाला असेल, (तोच वस्तुत: मोठा होता) तो वजा करता सरकारने पत्राला या तीन महिन्यात बंदी केली नाही. त्यामुळे अशाही परिस्थितीत समाधान मानण्याकडे माझ्या बुद्धीचा कल झुकू लागला होता.

## वाचकांना धाकदपटशा

परंतु हैद्राबाद सरकारला ते देखील सहन झाले नाही. गेल्या महिन्यात मजकडे आलेल्या अनेक पत्रावरून 'संजीवनी' च्या वाचक वर्गाला व्यक्तिश: गाठून त्यांना धाकदपटशा दाखवण्याचा सुसंघटित प्रयत्न होत असावा असे मानणे भाग पडू लागले आहे. वर्तमान-पत्राला उघडपणे बंदी करण्याची सरकारला आता लाज वाटू लागली असे दिसत आहे. विशेषत: संपादकीय लेख नसलेले 'संजीवनी' सारखे पत्र बंद करणे, अन्याय करण्याच्या बाबतीत निर्ढावलेल्या सरकारलाही लाजिरवाणे वाटत असावेसे दिसते. तथापि उघडपणे जे कृत्य करण्यास सरकार लाजले ते अन्य प्रकारे करीत असल्याचे पाहून सरकारच्या दुष्टतेबद्दल अधिकच चीड येते. दर आठवड्याला बंदीचा हुकूम सरकार काढीत असता पत्राची मागणी वाढत

होती. वर्गणीची बाकी थकली असताना तत्संबंधी नुसती आठवणदेखील न दिलेल्या लोकांकडून, म्हणजे जवळ जवळ फुकट वर्तमानपत्र घणारांकडून, अंक न पाठविण्याविषयी, सरकारचा बंदीचा हुकूम निघत असतां, दररोज सूचना येत आहेत. याचा अर्थ वरीलप्रमाणे करण्याशिवाय दुसरा मार्ग नाही. सरकारी धोरण एक असतां, काही स्थानिक अधिकाऱ्यांनी सत्तेचा दुरुपयोग पूर्वी अनेकवेळा केलेला आहे. परंतु आता या गोष्टी काही गांवांपुरत्या मर्यादित राहिल्या नसल्यामुळे तत्संबंधीची जबाबदारी सरकार व सरकारी धोरण यावर टाकणे भाग आहे. सरकारने दटावणी दिल्या-प्रमाणे मान्य वृत्तपत्रांची यादी प्रसिद्ध केली जाईल अशी मी अपेक्षा करीत होतो. पण त्यामुळे साऱ्या जगात होणाऱ्या छीः थू ची सरकारला वेळीच कल्पना येऊन त्यांनी हा नीच मार्ग गुप्तपणे अवलंबिला असे दिसते.

सनदशीर मार्ग सोडून आजपर्यंत कार्य केलेले नाही. सरकारने बंदीचा हुकूम काढल्याची बातमी कळल्यानंतर, बंदी घातलेले पत्र संस्थानात कधीच पाठवलेले नाही. असे असता सत्ताधीश सरकारने अशा आड-मार्गाचा अवलंब करावा हे त्याच्या कायदेशीरपणाला कलंक लावणारे नाही काय ?

## आर्थिक मदतीचे आव्हान

अनेकविध अडचणींपैकी वर फक्त काहींचा उल्लेख केला आहे. इतरांचा उल्लेख आजच्या परिस्थितीत करणे शक्य व इष्ट नाही. तथापि या जीवघेऊ अडचणींनी भरलेल्या मार्गावर मी वर्षभर स्थिर राहू शकलो याचे श्रेय माझ्या अनेक मित्र, सुहृद, हितचिंतक व शत्रूंनाही एव्हढे आहे की, निमित्ताचे धनीपणाखेरीज मजजवळ काहीच शिल्लक राहात नाही. विद्यमान जगाची संस्कृती अर्थप्रधान असल्यामुळे कोणच्याही सामान्य व वैयक्तिक व्यवहारात देखील पैशालाच कल्पनातीत महत्त्व आलेले आहे. अर्थात राजकीय चळवळीत त्याच्या महत्त्वाची तुलना, दुसऱ्या कशाशीच करणे शक्य नाही. मला जनतेकडून मदत न मिळती तर पत्र केव्हाच बंद पडले असते. मला मिळालेल्या मदतीचा उल्लेख आजच्या परिस्थितीत अधिक स्पष्टपणे करणे शक्य नसल्यामुळे सर्वांचे संकलित व संक्षिप्त आभार मानून समाधान

मानणे भाग पडत आहे. मला मिळालेले साहाय्य वर्तमानपत्राला जगवण्या-पुरतेच होते. प्राथमिक अवस्थेत व नंतर अडचणीच्या प्रसंगी मला कर्ज काढणे अपरिहार्य होते. भविष्यकाळ अधिक भीषण दिसतो आहे. जनतेने अधिक सढळ हाताने मदत केल्याखेरीज वाढत्या अडचणींना तोंड देता येणे शक्य नाही. पूर्वानुभवावरून मदत मिळेल असा मला विश्वास आहे.

जनतेने आर्थिक मदत तर शक्य ती करावी. पोलिसच्या किंवा अन्य खात्याच्या अन्याय्य दटावणीला जुमानू तर नयेच; पण मोठ्या कुशलतेने तिला साधार चव्हाट्यावर मांडण्यास आवश्यक ते धैर्य दाखवावे ही कळकळीची व आग्रहाची विनंती आहे. त्यासाठी, कैदेला न भिणाऱ्या कार्यकर्त्यांचे साहाय्य घेऊन खटले करण्यास पोलिसला भाग पाडण्याचा व ते हायकोर्टापर्यंत लढवून सत्तेचा अन्याय्य उपयोग कसा केला जातो हे जगाला दाखवण्याचा माझा विचार आहे. या कामी साहाय्य करू इच्छि-णारांनी पत्रव्यवहार करावा ही विनंती आहे. बेजबाबदार सरकारचे खरे स्वरूप जगापुढे आणण्यासाठी आपण होऊन खटले ओढवून घ्यावे लागतात. या प्रकारची मागे एकवेळ सुवर्णसंधी प्राप्त झाली होती. केवळ पैशाच्या अभावी ती त्यावेळी वाया गेली. हैद्राबाद सरकारच्या बेजबाबदार राज्यकारभाराची छाननी, हैद्राबाद व विशेषतः मुंबईसारख्या हायकोर्टात होण्याने जनतेचा अपरिमित फायदा होणे शक्य आहे असा माझा पूर्ण विश्वास आहे. त्यासाठी काही हजारांची धुळधाण करावी लागेल हे उघड आहे.

प्राप्त परिस्थितीत केलेली सेवा अनेक दृष्टीने सदोष होती याची मला जाणीव आहे. कर्तव्यासाठी अनेकवेळा कठोरता धारण करावी लागलेली असल्यामुळे काहींच्या भावना दुखावल्याही गेल्या आहेत. त्यात लोककल्याणाचाच हेतू होता हे लक्षात घेऊन त्यांनी मला क्षमा करावी एवढीच प्रार्थना आहे. इतर दोषांबद्दल परिस्थिती जबाबदार आहे. या-शिवाय काही दोषांचे धनीपण मजकडेही आहे. त्या सर्वांबद्दल क्षमेची याचना करून मी आज रजा घेतो

**संजीवनी** : दि. १३ फेब्रुवारी १९३९

# मराठवाड्यातील मराठीचा ऱ्हास

## रोगाचे अचूक निदान

मराठी वाङ्मयाचे उगमस्थान व महाराष्ट्र संस्कृतीचे जन्मस्थान, असा ज्या प्रांताचा गौरवपूर्वक उल्लेख करण्यात येतो त्याच मराठवाड्यातील मराठी भाषेच्या दुर्दैन्याची करुण कहाणी, अहमदनगर येथे जमा होणाऱ्या साहित्य-भक्तांच्या कानावर पुन्हा एकवेळ घालण्याचा प्रसंग काहीसा दुःखद तसा सुखदही वाटतो. इ. स. १९३१ मध्ये मराठी साहित्य संमेलनाचे अधिवेशन भागानगर येथे भरले होते. त्यावेळी मराठवाड्यातील मराठी वाङ्मयाची शोचनीय स्थिती, राजा धुंडिराज बहादर यांच्यासारख्या अधिकारी पुरुषाच्या तोंडून सर्वांना ऐकायला मिळालेली आहेच. आपल्या भाषणात संमेलनाध्यक्ष कै. डॉ. केतकर यांनी, ' या भागानगरच्या क्षेत्रात आज आपण जमलो आहो ते मराठी भाषेचा केवळ उत्सव करण्यासाठी नसून या राज्यात संकोच पावत असलेल्या मराठी संस्कृतीला टेका देण्यासाठी जमलो आहो. ' असे उद्गार काढल्यामुळे आमच्या निराशेने करपलेल्या आशा अंकुरित झाल्या होत्या. त्यांनी आपल्या भाषणात आमच्या रोगाचे निदान फारच अचूक केले होते ते असे :

" निजाम हद्दीतील महाराष्ट्रीयांनी हे लक्षात ठेवावे की, इतःपर मराठी भाषेला या राज्यातील अधिकारीवर्ग दडपून टाकू शकणार नाही. इस्लाम किंवा एकतंत्री राज्य आपल्या भाषेस दडपीत नाही; तर या संस्थाना बाहेर असलेली नोकरशाहीची शक्ती तुमची शत्रू आहे. मुसलमानांचे मन विकृत

करून आणि संस्थानाधिपतीचे मन आपल्या प्रजेच्या लोकमताविषयी अगदी बेफिकीर करून व त्यांच्या आवडीनिवडीस मोकाट करून आपल्या प्रिय भाषेचा चुराडा करीत आहे. तर तुम्ही स्वभाषेत राज्य-कारभार व शिक्षण व्हावे यासाठी म्हणजे आत्मोद्धारार्थ चळवळ करा. तुमच्याविरुद्ध असलेली शक्ती पार वितळून जाईल व तुमची चळवळ सोळा आणे यश मिळवील हे भविष्य मला अगदी स्पष्टपणे दिसत आहे."

## या दुर्मिळ संधीचा फायदा घ्या

डॉ. केतकरांच्या या अचूक भविष्याचा, महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाने किंवा मराठवाड्यातील साहित्यिकांनी, पडताळा पहाण्याचा फारसा प्रयत्नच केला नाही. सरदार किबे यांनी हैद्राबाद सरकारशी काही थोडासा पत्रव्यवहार केला होता, पण डॉ. केतकरांनी आपल्या भाषणाच्या शेवटी दिलेल्या 'सरकारकडून प्रतियोगाची भूक असलेले लोकही त्यात नसावेत' व 'हे सर्व करण्यास पगारी वर्ग असलाच पाहिजे' या सूचना दुर्लक्षिल्या गेल्यामुळे त्याचा जो योग्य शेवट व्हावयाचा तोच झाला. 'जळगावच्या साहित्य संमेलनात, मराठवाड्यातील मराठी भाषिकांची संख्या का घटत आहे याची चौकशी करण्याचा ठराव संमत करण्यात आला होता. पण त्याची अंमलबजावणी करण्याचा विचार तरी अधिकाऱ्यांना सुचला की नाही कोण जाणे. संस्थानातील जनतेच्या औदासीन्याच्या आड काही लोक लपू पाहातात; पण तो आरोप मान्य करूनही, संस्थानातील विशिष्ट राजकीय परिस्थितीत हे औदासीन्य क्षम्य मानून ते दूर करण्यासाठी कळकळीच्या कार्यकर्त्यांना सहानुभूतीने शक्य ते साहाय्य करावयास नको काय? संस्था या नात्याने हस्तक्षेप करण्याचे दूरदर्शित्वाने टाळून संस्थानात आज लोकजागृतीचे कार्य काँग्रेस करीत नाही काय? असे प्रश्न विचारणे गैर ठरत नाही. हैद्राबाद सरकार आज एकीकडून इंग्रज सरकार व एकीकडून प्रजा अशा कचाटीत सापडलेले आहे. साहित्य परिषदेच्या चालकांनी या दुर्मिळ संधीचा जास्तीत जास्त फायदा, तेथील मराठी भाषेच्या अवनतीला कारण होणाऱ्या गोष्टी दूर करण्यासाठी, निदान संस्थानी साहित्यिकांना उद्युक्त करून घेतला तर

बरेच मोठे कार्य होऊ शकेल आणि याच दृष्टीने मी आज चार शब्द लिहिणार आहे.

मराठवाड्यातील मराठीचा संकोच करणारी कारणे माझ्या मते सर्वस्वी राजकीय आहेत. ऑक्टोबर १९३४ मध्ये हैद्राबाद येथे भरलेल्या निजाम-प्रांतीय साहित्य संमेलनाला आलाहजरत निजामसाहेबांनी जो संदेश पाठविला आहे त्याचा अधिकृत आधार घेऊन ती कारणे दूर करण्याचा प्रयत्न करावयास काहीच हरकत नाही. सुदैवाने हैद्राबादेत प्रांतिक साहित्य संमेलन भरून मराठी भाषेचा प्रश्न सोडविण्यास एक संस्थाही निर्माण झालेली आहे. दुर्दैव हे की, या संमेलनाने मान्य केलेल्या ठरावा-संबंधी सरकारी स्पष्टीकरण प्रसिद्ध झाले असता त्याचे प्रत्युत्तरदेखील दिल्याचे ऐकण्यात किंवा वाचण्यात आले नाही. हा अनास्था प्रसंग निर्माण होण्याचे कारण सदोष लोकसंग्रह हेच आहे असे माझे मत आहे.

## उर्दूच्या संस्थांना खैरात

मराठी साहित्य क्षेत्रापुरती, श्री. दत्तोपंत पोतदार हे महात्माजींची भूमिका स्वीकारतील तर त्यांची महाराष्ट्र विद्यापीठाची कल्पना मराठीच्या माहेर घरी मूर्त स्वरूपात आलेली फार लौकर दिसू शकेल असे माझ्या अल्पमतीला वाटते. मराठवाड्याच्या केंद्रस्थानी, म्हणजे औरंगाबाद येथे अंजुमन तरक्की-ए-उर्दूचा संकुचित व अनधिकृत संसार अखिल भारतीय स्वरूप धारण करण्याइतका वृद्धिगत होऊ शकतो आणि बलवंत वाचना-लयासारख्या संस्था वृद्धिंगत होणे तर दूरच; पण आहेत तेथेदेखील राहू शकत नाहीत याचा अर्थ काय? अंजुमन तरक्की-ए-उर्दूला वार्षिक पाच हजार रु. (आता ही रक्कम चाळीस हजार करण्यात आल्याचे कळते.) देणे, संस्थानातील सर्व शाळांसाठी या संस्थेने तयार केलेली पुस्तके आवश्यक करणे व त्यांच्या विक्रीची ठेकेदारी याच संस्थेला देऊन तिला कायम व अप्रत्यक्ष उत्पन्नाचा एक झरा निर्माण करून देणे, कोशाच्या निमित्ताने हजारो रुपयांची वार्षिक मदत करणे इत्यादी प्रकार करणारे साळसूद हैद्राबाद सरकार, बलवंत वाचनालयाला मासिक तीस रुपये देण्याची शिफारस, दोन शिक्षणाधिकाऱ्यांनी संस्था प्रत्यक्ष तपासून केल्या-

नंतरही 'अंदाजपत्रकात सवड नाही' या तीन शब्दांनी फेटाळताना दिसते. आला हजरत निजाम साहेबांची गोड गोड आश्वासने प्रत्यक्ष कृतीत किती विपर्यासाने उतरतात याचे हे एक ठळक उदाहरण आहे.

## छापखाना व मासिक काढण्याची योजना

औरंगाबाद येथील बलवंत वाचनालय ही संस्था लोकमान्यांचे स्मारक आहे. तिच्याद्वारे, मरगळीला आलेल्या मराठी साहित्याची विविध प्रकारे सेवा करावी म्हणून मी सतत सात-आठ वर्षे खपून अनेक व्यवहार्य योजनांनुसार कार्य करण्याचा दीर्घ प्रयत्न केलेला आहे. परंतु सरकारी सदोष धोरणामुळे सरकारकडून दमडीचे प्रत्यक्ष सहाय्य तर मिळालेच नाही पण पदोपदी अडथळे मात्र निश्चित आले. सर्व योजनांचा संक्षिप्त उल्लेखही येथे करणे शक्य नाही. पण सरकारच्या चीड उत्पन्न करणाऱ्या धोरणाची कल्पना यावी म्हणून येथे निवेदितो. संस्थेच्या मालकीचा एक छापखाना घालून एक मासिक चालविण्याची व प्राचीन वाङ्मय प्रकाशित करण्याची एक योजना होती. छापखान्याची परवानगी संस्थेचे अत्यंत निरुपद्रवी व सालस कोषाध्यक्ष रा. भा. ल. भालेराव यांचे नांवे मागण्यात आली व मासिकाच्या परवानगीचा अर्ज कॉलेजमध्ये बी. ए. च्या वर्गात शिकत असलेले माझे बंधू भी. कृ. वाघमारे यांच्या नावे दिला होता. या दोघांचा व संस्थेचा राजकारणाशी काडीइतकादेखील संबंध नव्हता. संस्थेला राजकारणापासून दूर राखण्याचा मी डोळ्यात तेल घालून सहेतुक प्रयत्न केलेला आहे. पण जेथे सरकारी धोरणच इसापनीतीतील लांडग्या-सारखे ठरलेले, तेथे त्याचा काही उपयोग न व्हावा व छापखाना आणि मासिक यांना 'परवानगी दिली जाऊ शकत नाही' अशी एकवाक्यी उत्तरे मिळावी यात नवल कसले? उर्दूकडे पाहाण्याचा सरकारचा दृष्टिकोन व मराठीकडे पाहाण्याचा यात किती अंतर आहे? आला हजरतांच्या गोड आश्वासनांची अंमलबजावणी ही अशी करण्यात येते.

## उर्दू शिक्षणाची सक्ती

हेच धोरण सरकारी शिक्षणाच्या बाबतीतही आढळते. खाजगी शिक्षण संस्थांतील दोष नाहीसे करण्याच्या उद्देशाने म्हणून केलेल्या

कायद्याचा प्रत्यक्ष परिणाम तीन हजार प्राथमिक शाळा बंद पाडण्यात झाला आहे. प्राथमिक शिक्षण मातृभाषेतून दिले जाते, असे एकीकडे सांगून, मराठी मातृभाषा नसणाऱ्या शिक्षकांच्या नेमणुका करून, अज्ञ पालकांकडून ' उर्दूतूनच शिक्षण द्या ' अशा अर्जावर सह्या घेऊन, वेळा-पत्रकावर एक लिहून प्रत्यक्ष अंमलबजावणी त्याच्या उलट करून व दुय्यम शिक्षण सर्वस्वी उर्दूतून ठेवून ते तत्त्व राजरोसपणे पायाखाली तुडवले जात असल्याच्या अनेक तक्रारी मी ऐकलेल्या आहेत. उर्दू ही अल्पसांखिकांची भाषा असताना तिजसाठी स्वतंत्र विद्यापीठ स्थापन करणाऱ्या सरकारला दीड-पावणेदोन तपात संस्थानातील खऱ्या हक्कदार भाषांना दुय्यम शिक्षणाचे क्षेत्रदेखील मोकळे करता कां आलेले नाही? सरकारची इच्छा नाही हेच त्याचे उत्तर आहे. औरंगाबाद येथील श्रीसरस्वती भुवन पाठशाळेचा उपचिटणीस असतांना शिक्षण खात्याच्या डायरेक्टरच्या तपासणीच्या वेळी मी एकदा हजर होतो. त्यावेळी साहेबबहादुरांनी संस्थेतील ५ व्या इयत्तेतील विद्यार्थ्यांना गणित व इतिहास-भूगोल हे विषय मराठीतून शिकवण्यावर आक्षेप घेतल्याचे मला चांगले आठवते. याच कारणांवरून संस्था, सरकारी अभ्यासक्रमानुसार कार्य करीत नसल्याचा शेरा देऊन तिचे मदतीचे प्रकरण चिघळत ठेवण्यात आले होते. देशी भाषांचा खोटा कळवळा दाखवणाऱ्या सरकारला इंग्रजी माध्यम असणाऱ्या हायस्कूल लिव्हिंगच्या परीक्षा पास झालेले विद्यार्थी उस्मानिया कॉलेजात घ्यावयास परवडतात मग मराठी माध्यम जर हायस्कूलमध्ये प्रचलित केले तर काय अडचण उत्पन्न होते काही कळत नाही. मुसलमानांची संख्या अत्यंत अल्प असल्यामुळे उर्दू शाळांना पुरेशी मुले मिळणार नाहीत व मग त्यांना खऱ्या देशी भाषांच्याद्वारे शिक्षण घ्यावे लागेलही? परंतु ही अडचणही खोटी आहे. शहरातील लोकसंख्येत मुसलमानांचे प्रमाण फार मोठे असल्यामुळे ही अडचण उत्पन्न होऊ शकत नाही. खरी अडचण मराठी व तेलंगी मातृभाषा असणारांच्या मार्गातील अडचणी दूर झाल्यामुळे त्यांची प्रगती होईल ही आहे. सारांश, हा की मराठवाड्यातील मराठी वाङ्मयाला खरा अडथळा, संस्थानी सरकारच्या धोरणाची विपर्यस्त अंमलबजावणी करण्याची शक्यता निर्माण करणाऱ्या बेजबाबदार नोकरशाहीचा आहे.

डॉ. केतकरांनी निदान केल्याप्रमाणे ही इंग्रज नोकरशाहीच्या नेत्रसंकेतानुसार नाचत आहे. अ. भा. नॅशनल काँग्रेसच्या प्रयत्नाने व इतरही अनेक कारणांमुळे हैद्राबादेतील जनता आता जागी झाली असून या बेजबाबदार नोकरशाहीचा अंत करण्याचा तिने जोराचा प्रयत्न आरंभिला आहे. याच आला हजरत निजामसाहेबांचे 'शब्द' हाती घेऊन मराठवाड्यातील साहित्यिकांना कार्य करण्यास जर, महाराष्ट्र साहित्य संमेलन परिणामकारकरीतीने उत्तेजित करील तर, त्याला पन्नास वर्षांचे कार्य एका वर्षात केल्याचे श्रेय मिळू शकेल.

या लढ्याच्या आघाडीवर महाराष्ट्रीयच आहेत ही गोष्ट अभिमानपूर्वक नमूद करण्यात मला आनंद वाटतो. मराठवाड्यातील साहित्यिकांच्या तुटक्या लेखणीकडे या जागृतीचे बरेचसे श्रेय आहे हे कोणीही अमान्य करू शकणार नाही.

## मराठवाड्यातील साहित्यिक

अशा या दाहक परिस्थितीत सत्व कायम ठेवून जिवंत राहण्यासाठीच, प्रतिदिवशी क्षीणबल होत चाललेल्या समाजाला किती कष्ट पडत असतील याची कल्पनाच केलेली बरी. प्राचीन मराठी वाङ्मयाचे निरीक्षण केल्यास अर्धे अधिक वाङ्मय याच मराठवाड्यांत निर्माण झाले. इतकेच नव्हे तर, थोडेबहूत अपवाद वगळल्यास बहुतेक नामांकित कवि ह्याच प्रांतात होऊन गेल्याचे आढळून येते, पण या उज्वल परंपरेचा धागा दोनशे वर्षांपूर्वीच तुटलेला दिसतो, याचे कारण इतिहासाची पाने वरवर चाळणारा सहज समजूं शकतो. आमच्या मानेभोवती जी मगरमिठी एकदा बसली ती हिंदुस्थानात क्रांती होऊन इंग्रजी राज्य आले व ते संपून प्रांतिक स्वराज्याचा बालरवी चमकू लागला तरी, पूर्ववत् कायम आहे. निदान आता तरी आपण आपल्या मराठी मातृभाषा असणाऱ्या ३७,८७,८४६ बांधवांची केवळ मराठी साहित्याच्या दृष्टीने काही परिणामकारक काळजी घ्यावी अशी अपेक्षा करणे चूक होईल काय? हिमालयासारख्या प्रचंड अडचणीखाली आमचे प्राण गुदमरत असतांनाही आम्ही महाराष्ट्रीय संस्कृतीची तेजस्विता मराठी साहित्याच्या साहाय्याने कायम ठेवली आहे.

प्रसिद्धी व प्रसाराची साधनेच उपलब्ध नसल्यामुळे आमचे साहित्य व साहित्यिक जगाच्या बाजारपेठेत चमकू शकले नाहीत, ही गोष्ट निराळी. पण आजदेखील मराठवाड्यातील साहित्यिकांची संख्या शंभराहून खास अधिक भरू शकेल. त्या सर्वांचा नामोल्लेख करणे आज साधनां-अभावी शक्य नाही. पण अगदी ठळकपणे नांदेड येथील श्री. दासगणू, महाजन, कांत, गोळेगावकर, कुलकर्णी, आढे, कान्होले, मनाठकर; औरंगाबाद येथील श्री. पद्माकर, कर्वे, पुरवार, हरसुलकर, वाळुजकर, वैष्णव; हैद्राबाद येथील श्री. वामनराव गाडगीळ, र. मु. जोशी, प्रो. नांदापूरकर, श्रीकृष्ण गाडगीळ, वाघमारे, कोरेकल, दिवाकर कृष्ण, भिडे, बिंदू, नांदापूरकर; परभणी येथील बी. रघुनाथ; परांडा येथील दीक्षित, श्री. व सौ. उषा पगडी, कृष्णकुमार, सेलूचे रा. काटे, अनंत विद्यालयाचे पोहनेरकर, अंबेजोगाईचे स्वामी रामानंद तीर्थ, गुलबर्ग्याचे भोगले ही व इतर अनेक नावे दाखवता येतील. ह्या सर्वांच्याच कमीअधिक प्रयत्नाने मराठी भाषा व महाराष्ट्रीय संस्कृतीविरुद्ध परिस्थितीशी तोंड देत टिकू शकली आहे. प्रोत्साहनाच्या अभावी व विशेषतः सरकारी विरोधी धोरणामुळे आमच्या साहित्यिकांचा विकास होऊ शकला नाही व त्यांना प्रसिद्धी मिळू शकली नाही ही गोष्ट निराळी. प्रोत्साहन नाही तर नाही पण अडथळे जरी दूर झाले तरी मराठवाडा मराठी साहित्याच्या क्षेत्रात पूर्वीप्रमाणे आघाडीवर न राहिला तरी, आजच्यासारखा पिछाडीवर खास राहाणार नाही.

## साहित्य संस्थांची जबाबदारी

साहित्य हा समाजाचा आरसा आहे असे म्हणतात. पण मला वाटते ही व्याख्या बहुजन समाजाच्या दृष्टीने अपूर्ण आहे. समाजाला त्याचे नुसते स्वरूप दाखविणे हाच साहित्याचा उद्देश असू शकत नाही. समाजाला त्याच्या हिताहिताची कल्पना देऊन योग्य मार्गाचा अवलंब करण्यास उत्तेजित करणे हाच त्याचा प्रधान हेतू असावयास पाहिजे. सध्याच्या यंत्रयुगात साहित्याला दैनंदिन घडामोडीपासून दूर राहाणे शक्य नाही. आमची कितीही इच्छा असली तरी, साहित्य आता राजकारणाचा विटाळ मानू शकत नाही. किंबहुना त्याला जगावयाचे असेल तर राज-कारणाला त्याने महत्त्व दिलेच पाहिजे. या दृष्टीने मराठवाड्याकडे पाहिल्यास

येथे काळाकभिन्न अंधःकार पसरलेला दिसतो. मराठी भाषा बोलणारांची संख्या जवळ जवळ अडतीस लक्ष असताना तेथे फक्त एक मराठी साप्ताहिक जेमतेम जीव धरून असलेले आढळते. इंग्रजी हद्दीत प्रांतिक स्वराज्य मिळाल्यानंतर संस्थानातील काही कार्यकर्त्यांनी बाहेर येऊन ही कोंडी फोडण्याचे आटोकाट प्रयत्न केले आहेत. परंतु ते व्यक्तिगत असल्यामुळे व हैद्राबाद सरकारने ताळतंत्र सोडल्यामुळे यशस्वी व टिकाऊ होऊ शकले नाहीत. सारांश, मराठवाड्यातील मराठीचा ऱ्हास केवळ तेथील सरकारच्या धोरणामुळे- कागदपत्रावर नमूद केलेल्या व विशेषतः अंमल-बजावणीत येणाऱ्या धोरणामुळे होत आहे. आपण कोणत्याही बाजूने त्याचा विचार केल्यास सरकारी धोरणच आडवे येत असलेले दिसेल. मराठी भाषा बोलणारांची संख्या घटत असताना व मराठी भाषेला जगणे अशक्य होत असतांना आमची साहित्य संमेलने व परिषदा, मोठ्या कडाक्याच्या वादविवादानंतर फारतर एखादा ठरावच पास करणार काय? त्यासाठी त्याने सत्याग्रह करावा असे मी म्हणत नाही; पण यासाठी चौकशी करणे, साधार माहिती गोळा करणे, ती पत्रद्वारे व शिष्टमंडळा-द्वारे सरकारपुढे मांडणे, प्रचार करणे इत्यादी अनेक गोष्टी करावयास उत्कट इच्छेशिवाय कसली अडचण आहे? श्री. दत्तोपंत पोतदार यांच्या कारकीर्दीत या दिशेने काही प्रयत्न होईल अशी आशा करून वाचकांची रजा घेतो.

**संजीवनी** : दि. १३ एप्रिल १९३९

# दुय्यम शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच पाहिजे

## हिंदूंची साक्षरता घटली

इ. स. १९१५ पूर्वी हैद्राबाद संस्थानात दुय्यम व उच्च शिक्षणाच्या दोन पद्धती प्रचलित होत्या. एक उर्दू भाषेच्या माध्यमाद्वारे शिक्षण देणारी व दुसरी इंग्रजी भाषेद्वारे.

पहिल्या प्रकारच्या शाळांना 'रुशदिया, फौकानिया व दारुलउलूम' ही नावे असत. या शाळांतून इस्लामी संस्कृती व इस्लामी ग्रंथांचा अभ्यास यावर विशेष भर दिला जात असे. या शाळांतील विद्यार्थ्यांना 'मुनशी-मौलवी' या प्राच्य-पदवी-परीक्षा देता येत असत व त्या सरकारी नोकरी-साठी मान्य केल्या जात. या परीक्षांची व्यवस्था संस्थानी सरकारच करीत असे. या शाळांतून बहुतेक सर्व मुसलमानांचीच मुले जात असत व ते साहजिकही आहे.

दुसऱ्या प्रकारच्या शाळांना मिड्ल-स्कूल, हायस्कूल व कॉलेज म्हणत. यांतील विद्यार्थ्यांना मद्रास विद्यापीठाच्या एच. एस. एल. सी. व इंटर, बी. ए. या परीक्षांना जाता येई. या शाळांतून दिले जाणारे शिक्षण व्यावहारिक स्वरूपाचे असे. त्यात जाणारे विद्यार्थी बहुतेक मुसलमानेतर असत.

अशा प्रकारच्या दोन पद्धतींमुळे मुसलमान विद्यार्थ्यांना आपल्या मातृभाषेद्वारे व धार्मिक अथवा व्यावहारिक शिक्षण घेण्याचे स्वातंत्र्य होते. मुसलमानेतर विद्यार्थ्यांना मात्र इंग्रजी माध्यमाचा एकच मार्ग मोकळा होता.

याचा परिणाम काय झाला ? विद्यार्थ्यांची सर्वसाधारण संख्या घटली. खाजगी शाळा कमी झाल्या. हिंदूंची साक्षरता घटली व मुसलमानांची वाढली. इ. स. १९११ च्या खानेसुमारीच्या रिपोर्टात म्हटले आहे:

" १९०१ मध्ये प्राथमिक शाळांतून ८०,७४३ विद्यार्थी होते तर १९११ त ७६,०६५. दहा वर्षापूर्वीपेक्षा, कितीतरी पटीने अधिक प्रमाणात आज तरुण पिढी शाळेपासून दूर ठेवली जात आहे. शिक्षण पद्धतीचा मूळ पायाच जणू हादरला आहे. तिचे काही का दोष असेनात, पण जी साक्षरतेची बीजे पेरीत होती ती जुनी पद्धती वेगाने नष्ट होत आहे व अद्याप तिच्याऐवजी दुसरी योग्य आलेली नाही. सरकारी शाळा फार मंदगतीने वाढत आहेत, तर जुन्या शाळा (खाजगी) झपाट्याने नामशेष होत आहेत. "

" मुसलमानांच्या साक्षरतेच्या प्रमाणाची वाढ मुसलमान लोकसंख्येच्या प्रमाणानुसार झालेली नाही, पण हिंदू लोकसंख्येत शेकडा १७·७ वाढ झाली असता त्यांच्या साक्षरतेचे प्रमाण प्रत्यक्षात घटले आहे. "

शाळांची संख्या घटली

| वर्ष | एकूण शाळांची संख्या |
|---|---|
| इ. स. १८९१ | ३१४० |
| ,, १९०१ | २६०७ |
| ,, १९११ | २२९५ |

साक्षरतेचे प्रमाण घसरले

| वर्ष | दर हजारी साक्षरता |
|---|---|
| इ. स. १८९१ | ३७·६ |
| ,, १९०१ | २९·५५ |
| ,, १९११ | २८ |

दर हजारी साक्षरता

| वर्ष | हिंदु | मुसलमान | अंतर |
|---|---|---|---|
| इ. स. १९०१ | २५·३६ | ५४·६४ | २९ |
| ,, १९११ | २३ | ५९ | ३६ |

## शिक्षणातील विषमता

या परिस्थितीवर सरकारने काय उपाय केला ? मि. मेह्यू या इंग्रजाला चौकशी करून उपाय सुचविण्यास नेमले. त्यांनी सुचविल्याप्रमाणे शिक्षण-पद्धतीत बदल केला. तो हा की उर्दू माध्यमाच्या शिक्षण पद्धतीतील जुनी धार्मिकता काढून टाकली व तिला आधुनिक स्वरूप दिले व सिकंदराबाद-हैद्राबाद शहरांखेरीज संस्थानातील सर्व इंग्रजी माध्यमाच्या शाळांचे रूपांतर वरील प्रकारच्या उर्दू माध्यमाच्या शाळांत केले. त्यामुळे काय झाले ?

मुसलमान विद्यार्थ्यांच्या शिक्षणातील जुनी धार्मिकता पण उर्दू माध्यम व व्यावहारिक उपयुक्तता पण इंग्रजी माध्यम ही अडचण दूर होऊन व्यावहारिक उपयुक्तता व उर्दू मातृभाषा माध्यम यांची सुयोग्य सांगड घालण्यात आली व त्याबरोबरच इस्लामी धर्मशिक्षण आवश्यक करण्यात आले.

याचप्रमाणे मुसलमानेतर विद्यार्थ्यांना त्यांच्या मातृभाषेतून निदान सर्व दुय्यम शिक्षण देण्याची सोय केली जाणे जरूर होते. पण तसे करण्यात आले नाही. त्यामुळे उर्दू ही मातृभाषा असणारे व उर्दू मातृभाषा नसणारे अशा विजोड विद्यार्थ्यांना शिक्षणासाठी एकत्र यावे लागले. अगोदर एकाला मातृभाषेतून शिक्षण देणे व दुसऱ्याला न देणे हाच मोठा अन्याय आहे. हा अन्याय पूर्वीच्या पद्धतीत होताच. हा अन्याय नव्या पद्धतीत दूर तर झाला नाहीच पण उलट मातृभाषेतून शिक्षण घेणाराला व तो हक्क हिरावला आहे अशाला, एकत्र आणून विरोधी भावनांच्या उद्दीपनाला अवसर दिला गेला आहे आणि म्हणून आज आमच्या शाळां-तून काय दिसते ? एक आपल्या मातृभाषेतून शिक्षण घेतो सुलभतेने, शिकताना त्याला मौज वाटते. तो हसत-खेळत महत्त्वाकांक्षी बनतो तर दुसरा दुसऱ्याच्या भाषेतून शिक्षण घ्यावे लागत असल्यामुळे अडखळतो, कष्टतो व रडत रडत निराश व हताश बनतो. ही एकी नाही. काही श्रम न करिता नाचगाण्यात दंग असलेला एखादा मनसबदार किंवा जहागीर-दार व जीव जाई तो श्रम करूनही पोटाला पुरेशी भाकरी व अंगाला

धड कपडा न मिळू शकणारा मजूर हे एका गावात, मोहल्यात किंवा एकत्र राहिले म्हणून का त्यांच्यात समानता व प्रेम उत्पन्न होऊ शकेल? प्रेम-सहकार्य हे समानतेतूनच उत्पन्न होऊ शकते. विषमतेतूनच असहकार, असूया, द्वेष यांची निर्मिती होते. खालील आकडे काय सांगतात?

### १. संस्थान साक्षरतेत मागे आहे

दर हजारी साक्षरता—१९४१

| | |
|---|---|
| त्रावणकोर | ४७० |
| कोचीन | ३५० |
| मुंबई | १९० |
| मद्रास | १३० |
| म्हैसूर | १२० |
| वऱ्हाड-मध्य प्रांत | ११० |
| हैद्राबाद | ७० |

### २. शेकडा ८० मुले शाळेबाहेर

संस्थानातील शाळेत जाण्यायोग्य मुलांची संख्या इ. स. १९४१ मध्ये साधारणपणे चोवीस लक्ष होती तर शाळेतील विद्यार्थ्यांची साडेचार लक्ष. सरकार अद्याप चोवीसपैकी १९ लक्षांहून अधिक विद्यार्थ्यांची सोय करू शकलेले नाही. हे प्रमाण जवळ जवळ शेकडा ८० पडते.

बडोदा व त्रावणकोर संस्थानांत शाळेत जाण्यायोग्य अशा १५ मुलांपैकी १२ मुले शाळेत आहेत तर आमच्या येथे १५ पैकी तीन, असे का?

### ३. आमच्या येथे शाळा कमी झाल्या

| वर्ष | एकूण शाळा |
|---|---|
| इ. स. १९२१–२२ | ८०३९ |
| ,, १९४०–४१ | ७०११ |

### ४. शेकडा ८० मुले शाळेतून गळतात

संस्थानात फक्त शेकडा २० मुले शाळेत जातात हे आपण वर पाहिले. त्यापैकी पुन्हा शेकडा ८० विद्यार्थी प्राथमिक अवस्थेतच गळतात.

विद्यार्थ्यांना शाळेत गेल्यावर विद्यार्जनाची गोडी लागत नाही हे उघड आहे. शिक्षक अपुरे व अयोग्य आणि अभ्यासक्रम व पद्धती सदोष ही त्याची प्रमुख कारणे आहेत. जास्तीत जास्त उर्दू मिड्ल झालेल्या शिक्षक व अप्पर प्रायमरी पास झालेली शिक्षिका, स्वतःच गोडीने शिक्षण घेतले नसता दुसऱ्यात गोडी निर्माण करणार कशी ? आणि त्यात मराठी जबानदानीची परीक्षा दिलेला शिक्षक लाभला म्हणजे कडच लागली. आणि म्हणूनच इ. स. १९३७–३८ मध्ये पहिल्या वर्गात १,८९,७७३ विद्यार्थी दाखल झाले असता १९४०–४१ मध्ये चौथ्या इयत्तेत फक्त ३०,१६६ विद्यार्थी आढळतात. का व कोठे गेले १,८९,७७३ पैकी १,५९,६०७ विद्यार्थी ? त्रावणकोर संस्थानात १९३७–३८ मध्ये पहिल्या वर्गात १,९७,७५५ विद्यार्थी आले आणि १९४०–४१ मध्ये चौथीत १,१४,५५२ विद्यार्थी होते. काय कारण याचे ? हेच नाही का प्रमुख की तेथे मॅट्रिकपर्यंत मातृभाषेतून शिकता येते सर्वांना. चांगले शिक्षक तयार होऊ शकतात तेथे.

## ५. दुय्यम शिक्षणातही आम्ही मागेच

| दुय्यम शाळा (१९४०–४१) | | त्यातील विद्यार्थी |
|---|---|---|
| त्रावणकोर | ८३६ | २,५८,६७५ |
| मध्यप्रांत | ८०९ | १,३७,४६९ |
| हैद्राबाद | २०८ | ४१,८४९ |

त्रावणकोरची लोकसंख्या हैद्राबादेहून निम्म्यापेक्षा कमी आहे व उत्पन्नही थोडे. असे असताना तेथे दुय्यम शाळा व त्यातील विद्यार्थी अधिक कसे ? तेथील सरकारची तशी इच्छा म्हणून. हेच त्याचे खरे उत्तर आहे. आमच्या येथे त्याच्या उलट का ? तेही सरकारची इच्छा म्हणूनच. सरकारला खाजगी संस्थांचे भय वाटते. तसे नसते तर त्रावणकोर, बडोदा व मध्यप्रांत येथे दुय्यम शाळेचा सरासरी खर्च अनुक्रमे २१६७, ३९२३ व ४७८१ येत असताना आमच्या येथे १६,७६८ इतका अधिक का यावा ? या शिक्षणाचा भार इतर प्रांतांप्रमाणे आमचे सरकार खाजगी संस्थांवर का टाकीत नाही ? एरव्ही दुय्यम शाळा नसलेल्या ठिकाणी,

खाजगी शाळा निघाल्यानंतर कमी फीच्या पण अधिक खर्चाच्या शाळा सरकार कशाला नंतर उघडते व आम्ही सरकारी शाळा सुरू केल्यानंतर 'आपण आपली खाजगी शाळा बंद करू' असे चालकांकडून करारनामे कशाला मागते? कशा वाढतील खाजगी शाळा हैद्राबादेत? आणि हा प्रकार आहे उर्दू-माध्यमाच्या खाजगी शाळांचा.

### ६. ही पहा समानता

विद्यार्थी संख्या इ. स. १९४०–४१

| | हिंदू | मुसलमान |
|---|---|---|
| प्राथमिक शाळा | २,०८,६०२ | ९८,३४७ |
| मिडल स्कूल | २२,२७६ | १८,७३६ |
| हायस्कूल | १६,५५३ | १४,९७८ |
| स्पेशल स्कूल्स् | १,४९९ | ४,२०७ |

### ७. ही पहा मुलींची स्थिती

विद्यार्थीनींची संख्या इ. स. १९४०–४१

| | हिंदू | मुसलमान |
|---|---|---|
| प्राथमिक शाळा | १९२४० | ३१०८४ |
| मिडल स्कूल | २३२५ | २६६२ |
| हायस्कूल | १०८७ | २३६१ |
| उस्मानिया हायस्कूल | ९४ | ११९९ |
| स्पेशल स्कूल्स् | १११ | २५८ |

अखिल भारतीय पातळीवर इ. स. १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणे दर हजारी साक्षरता हिंदूंची ७२ व मुसलमानांची ५४ तर हैद्राबादेत ती अनुक्रमे ४०·६ व १०१ आणि फक्त स्त्रियांचे साक्षरतेचे भारतीय प्रमाण हिंदू २१ व मुसलमान १५ तर हैद्राबादेत ते ७ हिंदु व २९ मुसलमान होते.

## ८. ही विषमता वाढत आहे

दर हजारी साक्षरता

| | हिंदू | मुसलमान | अंतर |
|---|---|---|---|
| इ. स. १९०१ | २५·३६ | ५·६४ | २९ |
| ,, १९३१ | ४०·६ | १०१ | ६१ |

एकाला मातृभाषेतून शिक्षण देणे व दुसऱ्याला नाकारणे याचाच हा परिणाम नाही काय ?

म्हणून सर्वांना सर्व दुय्यम शिक्षण मातृभाषेतूनच द्या व जातीजातीतील वाढती विषमता दूर करा.

(श्री. आ. कृ. वाघमारे यांचा वरील लेख एका स्वतंत्र पत्रकात प्रसिद्ध झाला होता. त्यातील आकडेवार माहिती व विचार महत्त्वाचे असल्यामुळे त्याचे येथे पुनर्मुद्रण केले आहे.)

# हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषद,
# अधिवेशन चौथे, औरंगाबाद

## स्वागताध्यक्ष आनंद कृष्ण वाघमारे यांचे भाषण

### इ. स. १९४३ : स. १३५२ फ.

सन्मान्य अध्यक्ष, प्रतिनिधी व बंधू-भगिनींनो,

स्वागत-मंडळाच्यावतीने मी आज आपले हार्दिक स्वागत करतो. संपत असलेल्या उन्हाळ्याचा प्रखर ताप, आजवर कधीच न अनुभवलेली प्रवासाची दगदग, युद्धजन्य परिस्थितीमुळे आपल्या चिमुकल्या उत्पन्नावर अगोदरच पडलेला असह्य ताण व वैयक्तिक अडचणी यांना न जुमानता आपण जे येथे उपस्थित झाला आहात ते आपल्या ठिकाणी वसत असलेल्या कर्तव्य-जागृतीचे स्पष्ट प्रमाणच आहे. आज सबंध जग युद्धाच्या अननुभूत ज्वालांनी जळत व होरपळत आहे. प्रत्यक्ष रणक्षेत्रापासून आपण आज हजारो मैल दूर असताही आपल्या देशातील प्रत्येक झोपडीला व झोपडीतील प्रत्येक पोटाला या आगीच्या उष्णतेने धक्के दिले आहेत. प्रत्यक्ष रणक्षेत्र बनलेल्या भूमीतील नागरिकांची काय स्थिती असेल याची कल्पनाच केलेली बरी. अशा या सार्वत्रिक संकटकाली देशातील विचारवंतांना एकत्र जमण्याची, परिस्थितीचा शास्त्रशुद्ध विग्रह करून तीतून आपला समाज कसा सुरक्षितपणे बाहेर पडेल, एवढेच नव्हे तर तो अधिक उन्नतही कसा होईल यासाठी परिणामकारक योजना आखण्याची व त्याप्रमाणे आचार व्हावा म्हणून आवश्यक त्या साधनांची जुळवाजुळव करण्याची गरज भासणे हे त्या देशाच्या व समाजाच्या प्रगमनशीलतेचे द्योतक आहे. संकटकाली ज्यांची बुद्धि भेदरत-हादरत नाही, तर स्थिर व समतोल राहते, त्यांना संकटकाल सुवर्णसंधीप्रमाणे उत्कर्षाकडे नेणारा ठरतो. जे संकट-

काली गर्भगळित होतात त्यांना त्या कालाचा, त्या परिस्थितीचा नीट अंदाजच करता येत नाही. अंधारात चाचपडणाऱ्या माणसाप्रमाणे ते अचूक एखाद्या खड्ड्यात पडतात किंवा ठोकर लागून तोंडघशी पडतात व शेवटी दैवाला व देवाला दोष देऊन परिस्थिती निमूटपणे सहन करतात. जेथे जेथे आपल्याला भीती आढळते तेथे अज्ञान हटकून असते. अज्ञान हीच भीतीची जननी आहे. सृष्टीच्या नियमांचे अज्ञान हे मनुष्याला अगतिक बनवते. निसर्गाचे नियम माहीत असलेला मनुष्य प्रगमनशील असतो. जगातील प्रत्येक वस्तू सारखी बदलत असते. हा बदल त्या वस्तूच्या गतीमुळे घडत असतो व ही वस्तूची गती म्हणजेच तिचे जीवन; याचे ज्ञान व अनुभव असलेली व्यक्ती निर्भय असते, प्रगमनशील असते. जगात प्रत्यही होणाऱ्या बदलामुळे ती भयभीत होण्याऐवजी आनंदी होते. तिला त्यात नवनिर्मितीचा आनंद अनुभवता येतो. असेल त्याला चिकटून राहण्याची प्रवृत्ती मृतावस्थेची द्योतक आहे. अगतिकतेचे लक्षण आहे. कालाचा बदलता ओघ ओळखून त्याला आपल्या इच्छेप्रमाणे कलाटणी देण्यासाठी आपण काय करावयास पाहिजे याचा विचार करण्यासाठी आज आपण येथे जमला आहा. कमालीची महागाई, वस्तूंची दुर्मिळता, जीवनाची अंतर्गत व बहिर्गत कारणांमुळे निर्माण झालेली असुरक्षितता, संरक्षक कायद्याचा, तरतमभावाशिवायचा अंमल, अगतिक विचारांना मिळालेले स्वैर स्वातंत्र्य, प्रागतिक जिभेला व लेखणीला प्राप्त झालेला बंदिवास, देशातील अनेक खरे पुढारी तुरुंगात डांबलेले, अशी चोहोकडून संकटांची बरसात होत असता प्रतिनिधी-हितचिंतकांचा हा एवढा जमाव जमलेला पाहून देशाच्या उज्ज्वल भवितव्याची मानसिक अनुभूती अगदी सामान्य माणसालाही होणे अपरिहार्य आहे. आणि म्हणूनच मी आपणां सर्व सज्जनांचे अंतःकरणपूर्वक स्वागत व अभिनंदन करतो.

### सहकाऱ्यांचे स्मरण

अधिवेशनाच्या कामाला आरंभ करताना कृष्णमंदिरात तपश्चर्या करणाऱ्या आपल्या वंदनीय नेत्यांचे व सहकाऱ्यांचे स्मरण होऊन मन व्यथित होत असे, थोडेसे उशिरा का होईना व ते अर्धवटच का असेना पण सरकारने आमच्या काही सहकाऱ्यांना नुकतेच बंधमुक्त केले आहे.

श्री. शामराव बोधनकर, श्री. सुदामराव, श्री. वामनराव वझे व इतर काही सत्याग्रहीही आपली शिक्षा संपवून सुटले आहेत. आजची त्यांची येथील उपस्थिती आम्हां सर्वांना उत्साहित करणारी आहे. त्यांनी समाजाच्या सुखासाठी केलेल्या त्यागाचा, भोगलेल्या कष्टांचा महिमा अगाध आहे. स्वागत समितीच्या वतीने मी आज श्री. रामकिशनजी धूत, श्री. रामचंद्रराव नांदापूरकर, श्री. आर. डी. देशपांडे, श्री. बिरदीचंदजी, श्री. प्राणेशाचारी, श्री. श्रीनिवासराव हवालदार, श्री. अच्युतराव खोडवे, श्री. देवरामजी चव्हाण, श्री. अण्णासाहेब वाळूजकर, श्री. मोतीलालजी मंत्री, श्री. ज. प. मुळे, श्री. नागोराव पाठक, श्री. तात्यासाहेब महाजन, श्री. रामगोपाळ, श्री. दामोदरराव भाले, श्री. शामराव बोधनकर, श्री. सुदामराव, श्री. वामनराव वझे या व इतर सर्व सहकाऱ्यांचे उत्साहभरित अंतःकरणाने अभिनंदन व स्वागत करतो. त्याबरोबरच अद्यापही बंदिस्त असलेले आमचे पूजनीय नेते व सहकारी स्वामी रामानंद तीर्थ, श्री. बाबासाहेब परांजपे, श्री. अच्युतराव देशपांडे, कॅ. जोशी, श्री. नारायणराव जोशी, श्री. गुलाबचंद नागोरी, श्री. माणिकचंद पहाडे, श्री. रंगनाथराव कुलकर्णी, श्री. गोपाळशास्त्री देव, श्री. कोटेचा, श्री. राघवेंद्रराव दिवाण, श्री. हरिश्चंद्रजी हेडा, श्री. नरहरराव कुलकर्णी, श्री. विनायकराव चारठाणकर, श्री. मनोहरराव सोनदे व इतर कार्यकर्त्यांची अनुपस्थिती आपणांस जाणवावी हे सहज आहे. आज त्यांच्या मार्गदर्शनाला व सहकार्याला आम्ही तात्पुरते मुकलो आहोत.

उमरी अधिवेशनानंतर आपल्या परिषदेचे माजी अध्यक्ष बॅ. श्री. श्रीनिवासराव शर्मा, कोषाध्यक्ष श्री. गोविंद कृष्णाजी नाईक, विद्यार्थ्यांचे उत्साही नेते व वंदेमातरम् चळवळीचे एक प्रणेते श्री. देसाई, पायगा इलाख्यातील उत्साही वृद्ध नेते श्री. शामराव येळवटकर पाटील, कन्नड तालुका समितीचे अध्यक्ष श्री. दिगंबरराव जवळकर व हैद्राबादचे श्री. अंबादासराव मुखेडकर हे आपल्याला कायमचे सोडून गेले आहेत. त्यांच्या अकाली निधनामुळे हैद्राबादच्या लोकपक्षाला मोठा धक्का बसला आहे. त्यांच्या कायम गैरहजरीची उणीव लवकर भरून न येणारी आहे.

सज्जनहो! नेहमीच्या रूढ पद्धतीप्रमाणे मला आपल्याला आज औरंगाबादचे ऐतिहासिक महत्त्व व जवळपासच्या प्रेक्षणीय स्थळांची

माहिती सांगण्याचे प्रयोजन दिसत नाही. आपण सर्वजण त्या ऐतिहासिक घटनांशी व इतर स्थलावशेषांशी पूर्वपरिचित आहातच. अजिंठा-वेरूळची लेणी, दौलताबादचा किल्ला, येथील मुकबरादी स्थळे, तसेच शालिवाहनापासून ज्ञानेश्वर, हेमाडपंत, जनार्दन, एकनाथ, रामदास, मुक्तेश्वर इत्यादी विद्वान ग्रंथकार, संत, मुत्सद्दी यांची माहिती आज बहुतेक सुशिक्षितांना आहेच. औरंगाबाद व त्याच्या आसपासच्या भूमीवर अनेक वीरांचे रक्त सांडलेले आहे. आपल्या समाजासाठी तन-मन-धन अर्पण करण्याची परंपरा या भूमीने प्रसंगानुसार प्राचीन काळीही आरंभिली व जोपासली आहे– आजच्या विद्यमान काळीही तिने ती चालविली आहे, असे आपणास दिसून येईल. विश्वविद्यालयाच्या उच्च पदव्या संपादन केल्यानंतर, सुखात वाढलेल्या अनेक आप्तेष्टांच्या व नातेवाईकांच्या सुखदुःखांचा किंवा इच्छा आकांक्षांचा विचार न करता, ऐन विशी-तिशीच्या भरात तन-मन-धनाने समाजसेवेला वाहिलेले तरुण आपण औरंगाबादेस पाहू शकाल. ही मंडळी आपल्या सर्वांच्या परिचयाची आहेच. मी त्यासंबंधी काही सांगण्याची गरज नाही. अशा या औरंगाबादच्यावतीने मी आपले प्रेमपूर्वक स्वागत करीत आहे. इतर कोणत्याही गावाप्रमाणे येथेही मतमतांरे व पक्षोपपक्ष आहेत. हेवा-दावा करणारांची येथे उणीव नाही. पण हे असूनही औरंगाबादचा किल्ला मजबूत आहे. तो तसा असण्याची कारणे कार्यकर्त्यांतील ध्येयनिष्ठा, स्पष्ट विचारसरणी, अभ्यासू, खेळाडू, प्रेमळवृत्ती, सालस स्वभाव, कष्टाचा विचार न करता कार्य करण्याची तत्परता, परमतसहिष्णुता इत्यादी आहेत. या गोष्टी सांगण्यात माझा एकच सद्हेतू आहे आणि तो हा की, ठिकठिकाणच्या तरुण कार्यकर्त्यांत समाजकारणासाठी तनमनधन अर्पण करण्याची वृत्ती निर्माण व्हावी, वाढावी. त्याशिवाय देशाचा उद्धार होणे शक्य नाही, अशी माझी ठाम समजूत आहे.

## महात्माजींच्या धोरणाशी सहमत

सज्जनहो ! आपण आता अनेक प्रश्नांचा विचार करणार आहोत. त्याविषयींच्या साधक-बाधक कल्पना, आपल्याला यंदा लाभलेल्या सुयोग्य अध्यक्षांच्या भाषणातून अधिकृतरीत्या ऐकावयास मिळतीलच. परंतु त्या ऐकण्यापूर्वी महाराष्ट्र परिषदेच्या या अधिवेशनाला आजचे स्पष्ट व प्रत्यक्ष

स्वरूप येण्यास कोणकोणच्या कल्पना कारण झाल्या व त्यांची संभाव्य वाढ कशी होणार याचे दिग्दर्शन केल्यास आपणांस पुढील प्रश्न समजणे व त्यासंबंधी निर्णय घेणे बरेच सुकर होईल म्हणून त्या मी आपणांपुढे सादर करीत आहे. मूलगामी कल्पना समजल्या म्हणजे वस्तुस्थितीची यथार्थ कल्पना करणे व तिला इच्छेनुसार कलाटणी देण्यासाठी काय करावयास पाहिजे हे समजणे शक्य होते.

बात्रीस महिन्यांच्या बंदिवासातून जेव्हा गतवर्षी ऑक्टोबरच्या महिन्यात शेवटच्या आठवड्यात आमची सुटका झाली तेव्हा आपल्या हैद्राबादेत व बाहेरही सामाजिक जीवनावर एक प्रकारचा जाड थर आलेला होता. त्यामुळे जीवन-प्रवाहाच्या नाड्या कोठे आहेत व कशा वाहात आहेत हे सहज कळणे जवळ जवळ अशक्य झाले होते. वृत्तपत्रांद्वारे बाह्य जगातील घडामोडींची आम्ही नोंद घेत असू, पण तेवढ्या माहिती-वर विसंबून निर्णायक मते बनविणे फारच धोक्याचे होते. त्यामुळे प्रथम समाजातील ठळक ठळक विचारसरणीची निःशंक माहिती मिळविणे व प्रत्येक विचारसरणीची स्वच्छ बुद्धीने छाननी करून तरतम-भावाने निर्णय घेणे आवश्यक होते. ब्रिटिश हिंदुस्थानात सरकारने ९ ऑगस्टला महात्माजी व इतर पुढारी आणि कार्यकर्ते यांना अटक केली. त्यानंतर व्यक्त झालेला लोकक्षोभ व समाजात पसरलेल्या व पसरविलेल्या अनेक कल्पना यांवरून महात्माजी व इतर पुढारी यांचे खरोखर विचार काय आहेत यासंबंधी विश्वसनीय माहिती मिळणे व मिळविणे फारच कठीण झाले होते. या अडचणीतून जी माहिती मिळाली तीवरून आम्हांला बाहेरच्या परिस्थिती-विषयी निर्णायक मत बनविणे त्यावेळी शक्य दिसेना. म्हणून त्या बाबतीत पुढे फारसा विचार न करता आम्ही आमच्या स्थानिक प्रश्नांची छाननी करण्याचा विचार ठरवून त्या प्रयत्नाला लागलो. महात्माजी वगैरेंच्या अटकेनंतर निर्माण झालेल्या परिस्थितीविषयी आम्ही निश्चित मत बनवू शकलो नसलो तरी महात्माजी व काँग्रेस यांच्या फॅसिझमविरोधाच्या व त्यासाठी राष्ट्रीय सरकार मागण्याच्या धोरणांशी आम्ही सर्वांशी सहमत होतो.

## पुढाऱ्यांच्या सुटकेची मागणी

"मित्र-राष्ट्रांच्या उद्दिष्टांशी हिंदुस्थानला एकरूप करण्याचा हरएक प्रयत्न काँग्रेस करीत होती." मित्र-राष्ट्रांचा उद्देश साध्य करण्यासाठी तिला हिंदुस्थानचे स्वातंत्र्य अत्यावश्यक वाटले. काँग्रेसची ही भूमिका निःसंशय न्याय्य व अनाक्षेपार्ह आहे. दडपशाहीच्या द्वारे सरकारने दिलेले उत्तर व त्याला महात्माजींनी दिलेले हे प्रत्युत्तर, "गेल्या ९ ऑगस्टपासून घडलेल्या प्रकाराविषयी मला अर्थात हळहळ वाटते. अहिंसेवर पूर्वी कधीकाळी माझी जितकी अढळ श्रद्धा होती तितकीच ती आजही आहे. त्या (ऑगस्टच्या) ठरावान्वये राष्ट्रसभेने आपले अहिंसेचे धोरण कोणत्याही प्रकारे मागे घेतलेले नाही. फासीवादाच्या प्रत्येक अंग-प्रत्यंगाला तिचा निश्चित विरोध आहे. केवळ ज्या परिस्थितीत सहकार्य परिणामकारक व राष्ट्रव्यापी होऊ शकते त्याच परिस्थितीत युद्धप्रयत्नांमध्ये सहकार्य करण्याकडे त्याची प्रवृत्ती आहे. सरकारने आपल्या एकंदर धोरणाचा फेरविचार करावा अशी मी अद्यापि याचना करू इच्छितो. मी चुकलो आहे असे मला पटवून द्या. मी पुरेशी सुधारणा करीन". त्यानंतर श्री. राजाजी, सर तेजबहादुर सप्रू व मि. फिलिप्स यांसारख्या व्यक्तींना त्यांची भेट घेण्याचीही सवलत नाकारण्याचा अट्टाहास करण्यात आला. यावरून आमची राष्ट्रीय विचारसरणीविषयीची सहानुभूती किती न्याय्य होती हे स्पष्ट होते. हिंदुस्थान सरकारच्या या धोरणाचा अर्थ, सर तेजबहादुर वगैरेंनी म्हटल्याप्रमाणे हिंदुस्थानातील जनतेच्या हाती ते सत्ता द्यावयास तयार नाहीत, असा करण्याशिवाय दुसरा मार्गच नाही. सरकारने आपल्या दडपशाहीने काँग्रेसला आज 'होती की नव्हती' असे केल्यासारखे दिसत असले तरी, काँग्रेसची जनमनांवरील अदृश्य पकड त्यामुळे निश्चितपणे अधिक घट्ट बसण्यास मदत झाली आहे. सरकारच्या धोरणामुळे लोकांची मने साशंक बनली आहेत. अशा स्थितीत राष्ट्रीय पुढाऱ्यांची बिनशर्त व तात्कालिक सुटका करणे युद्धाच्या, सरकारच्या व लोकांच्या हितासाठी आवश्यक आहे.

## राजकीय चळवळीची स्थिती

ही हिंदी राजकीय चळवळीची स्थिती, आमच्या हैद्राबादच्या राजकारणावर आपले परिणाम केल्याशिवाय राहिलेली नाही. महात्माजी व इतर नेत्यांना अटक झाली त्या दिवशीच आमच्या सरकारनेही येथील पुढाऱ्यांना व प्रमुख कार्यकर्त्यांना अटक केली. हैद्राबादेत स्टेट काँग्रेस-सारख्या संस्थेला जन्मापूर्वीच बंदी करणारी शासनपद्धती अमलात असता व मुद्रण-भाषण-स्वातंत्र्याची गळचेपी चालू असता ब्रिटिश हिंदुस्थानातील घटनांची आवृत्ती निघणे सर्वांशी अशक्य होते. त्याची शक्यता मानणे म्हणजे जन्मलेले मूल खंजीर घेऊन हल्ला करू शकते असे मानणेच आहे. अशा या कल्पनेवर, हिंदुस्थान सरकारप्रमाणे आमच्या सरकारनेही २८ पुढारी व कार्यकर्त्यांना नजरबंद करून टाकले. त्याबद्दल एखादे स्पष्टी-करण प्रसिद्ध करण्याचीही आमच्या सरकारला गरज भासली नाही. याचा परिणाम हैद्राबाद व सिकंद्राबाद येथे ४-८ दिवस थोडीशी अस्वस्थता निर्माण होण्यात व पुढे सत्याग्रह सुरू करण्यात झाला. या चळवळींशी अनेक विचारौघ संमिलित झालेले असल्यामुळे त्या बाबतीत अनेक शंका उत्पन्न होतात. आजच्या परिस्थितीत त्यांची चर्चा अशक्य आहे व इष्टही नाही. चळवळीच्या वैचारिक पातळीवर "स्टेट काँग्रेसची बंदी काढा, जबाबदार राज्यपद्धती द्या, हिंदुस्थान सोडा" हा एक व "आजाद हैद्राबाद, मुल्की सरकार" हा दुसरा, असे विरोधी प्रवाह काही काळ वाहात होते. पुढे दुसरा बंद झाला, तर पहिल्यातच आणखी एक फाटा फुटला. याखेरीज चळवळीचा विरोधक असा एक प्रवाह होता, व त्याच्या-तही एक सरकारशी बिनशर्त सहकार्य करण्यास तयार तर दुसरा काँग्रेसच्या चळवळीला विरोध व मागणीला पाठिंबा देत पण सरकारशी सहकार्य न करणारा असे दोन पोटभेद होते. युद्धजन्य परिस्थितीमुळे बहुजनसमाज अधिकाधिक त्रस्त व निराश होत चाललेला व जादा अधिकारात विना चौकशी अटकेत ठेवण्याचे सरकारी धोरण एकीकडे तर दुसरीकडे कधी सरकारच्या स्तुतीपर, तर कधी सुधारणा सदोष असल्या-तरी राबवाव्या अशी सूचना करणारे भाषण रेडिओवर ध्वनित करून, कधी ॲडव्हायजरी बोर्डावर नेमणूक करून तर कधी पीस कमेटीवर

घेऊन अशा एक-ना-अनेक प्रकारे राष्ट्रीय चळवळीच्या इमारतीचा पाया खिळखिळा करण्याचा प्रयत्न चाललेला. बहुजनसमाजाच्या विचारसरणीत आपल्याला अनुकूल असा बदल घडवून आणण्याचा हा मुत्सद्देगिरीचा प्रयत्न आक्षेपार्ह आहे. स्वतःचा मतप्रचार पद्धतशीर करणे व त्याचबरोबर राष्ट्रीय विचाराच्या प्रकाशनाला व प्रसाराला अवसर न देणे निश्चित अनैतिक आहे.

पट्टीच्या बुद्धिवानाला क्षणभर गोंधळून टाकणारी ही परिस्थिती आहे. चोहोंकडून अफाट दरिया तुफान खवळलेला, गवताच्या काडीचा आश्रय घेण्याची शक्यता नाही, एक-ना-दोन कारणांनी सहकारी सवंगडी दुरावलेले, आकाशात काळ्याकुट्ट ढगांची गर्दी व विजांचा कडकडाट, अनेक जलचर आ वासून बघत असलेले, अशा स्थितीत चार-सहा डोकी एकमेकांवर आदळत होती व त्यातून आजच्या या अधिवेशनाची कल्पना उगम पावून, अडचणींना सारीत सारीत विकसत व फुलत होती. हे कल्पनाचित्र आपल्याला आजच्या या महाराष्ट्र परिषदेच्या फुललेल्या बगीच्याचा पूर्वेतिहास सांगू शकेल. यापेक्षा अधिक स्पष्ट व सविस्तर विग्रह आजच्या परिस्थितीत शक्य नसल्यामुळे आपण मला क्षमा कराल अशी आशा आहे.

## जागतिक परिस्थितीचे चित्र

वर वर्णन केलेल्या परिस्थितीचा उगम कोठे आहे व त्यावर उपाय काय? या स्थानिक प्रश्नांचे उत्तर देण्यापूर्वी आपल्याला हिंदी व आंतर-राष्ट्रीय परिस्थितीचे धावते सिंहावलोकन करणे जरूर आहे. आपले हैद्राबाद हिंदुस्थानचा एक विभाग आहे व हिंदुस्थान जगाचा एक भाग आहे. जागतिक परिस्थितीचे परिणाम हिंदुस्थानवर व हिंदुस्थानातील परिस्थितीचे परिणाम हैद्राबादवर होणे अपरिहार्य आहे. म्हणून स्थानिक परिस्थितीचे अचूक निदान करताना हिंदुस्थानातील व जगातील परिस्थितीचा विचार आवश्यक आहे. हा विचार हिंदुस्थानातील व जगातील प्रमुख विचारप्रवाहांच्या आधारेच आज येथे संक्षेपतः करणे शक्य आहे. ज्याप्रमाणे माणसाच्या शरीराची वाढ व हालचाल त्याच्या विचारानुसार होते त्याचप्रमाणे या स्थूल व दृश्य

जगाची वाढ व हालचाल त्यातील विचारप्रवाहानुसार होते. बाह्य वाढीतील अनाकलनीय विविधता ही अंतस्थ व एकाच विचारशक्तीची विविध स्वरूपे होत. या दृष्टीने विचार करता आज आपल्याला जग फॅसिस्ट व मित्रसंघ या दोन गटांत विभागलेले आढळते. या दोन गटांचे तात्त्विक स्वरूप ' व्यष्टी मोठी की समष्टी मोठी ' या जुन्या वादाचेच आहे. एक जण एकशाहीचा पुरस्कर्ता, तर दुसरा लोकशाहीचा. फॅसिस्ट विचारसरणी एकशाहीची-डिक्टेटरशिपची पुरस्कर्ती तर मित्रसंघ लोकशाहीचा. मित्रसंघातील सर्व राष्ट्रे बावन्नकशी लोकशाहीचा पुरस्कार व आचार करणारी असे मानण्याचे येथे कारण नाही. हे विभाग अत्यंत ठोकळ स्वरूपाचे आहेत. इंग्लंड-अमेरिकेच्या लोकशाहीत व रशियाच्या लोकशाहीत पुष्कळच फरक आहे. तसेच जर्मनी, इटली, जपान यांच्यातही सूक्ष्म भेद अनेक आहेत. तथापि जगाची वैचारिक विभागणी आज ठोकळ मानाने वरीलप्रमाणे दोन गटात झाली असून हे दोन्ही गट आज चार वर्षांपासून प्राणांतिक झुंज करण्यात मग्न आहेत. या युद्धाने सर्व जग व्यापले आहे. त्याचे धक्के बसले नाहीत असा भूभाग जगावर उरलेला नाही. आपण क्षणभर स्वतःला विसरून— या दोन गटांपैकी कोणाला सहानुभूती दाखवावयाची हे ठरविले पाहिजे. आणि ती का हेही थोडक्यात सांगितले पाहिजे. या प्रकरणी मतभेदाला फारशी जागाच नाही. म्हणून उत्तर देणे कठीण नाही. आमचा पक्ष लोकशाहीचा आहे, आम्ही ब्रम्हवादी आहोत. अमर्याद व्यक्ति-स्वातंत्र्य जगाच्या धारण-पोषणाला विघातक व लोकशाही ही पोषक असल्यामुळे आम्हांला पहिली नको व दुसरी पाहिजे. लोकशाहीत प्रत्येक व्यक्तीच्या वाढीला समष्टी-हिताचेच काय ते बंधन असेल. त्या मर्यादेत तिला पूर्ण स्वातंत्र्य आहे. आणि म्हणून व्यष्टी व समष्टीच्या धारण-पोषणाला हितकर असलेला लोकशाही पक्ष आमचा आहे.

### भारतात लोकपक्षांची भूमिका

जागतिक पातळीवरून आपण हिंदी पातळीवर आलो तर तेथेही आपल्याला दोन गट आढळतात. सर्व हिंदुस्थानची सत्ता हाती ठेवू पाहणारा ब्रिटिश साम्राज्यवादी एकीकडे व दुसरीकडे ती सत्ता आपल्या हाती मागणारा व ती घेण्यासाठी प्रयत्न करणारा लोकपक्ष.

जागतिक पातळीवर आपण मित्र-संघाला सहानुभूती दाखविली, पण हिंदी पातळीवर मित्रसंघाचा एक प्रमुख घटक असलेला ब्रिटिश साम्राज्यवाद, लोकपक्षाच्या हाती सत्ता देत नसल्यामुळे त्या दोघांत चाललेल्या युद्धात आपण कोणचा पक्ष घ्यावयाचा? साम्राज्यशाहीचा निकट संबंध एकशाहीशी असल्यामुळे, जागतिक पातळीवर ब्रिटिश साम्राज्यशाही लोकशाही पक्षाबरोबर व हिंदी पातळीवर लोकपक्षाविरुद्ध असलेली पाहून निर्णय काय घ्यावा असा क्षणभर प्रश्न पडतो. मित्रसंघातील साम्राज्यशाही राष्ट्रांच्या प्रामाणिकपणाबद्दल संशय घेण्यास अवसर देणारी परिस्थिती आहे. हिंदी भूमिकेवर आमचा नैसर्गिक कल लोकपक्षाकडे असणारच. हिंदुस्थानवर सत्ता गाजविण्याचा इंग्लंडला मुळीच हक्क पोचत नाही. त्यांनी हिंदुस्थान सोडून जावे व सत्ता हिंदी लोकांच्या हाती द्यावी असे म्हणण्याचा हिंदी लोकांना नैसर्गिक व नैतिक अधिकार आहे. हा अधिकार इंग्लंडने मान्यही केली आहे. तथापि ब्रि. साम्राज्यशाहीचे धोरण ठरलेले आहे. स्वातंत्र्य देण्याचे शाब्दिक आश्वासन देण्यास कधीच कचरावयाचे नाही, पण कधी युद्ध तर कधी मुसलमान, कधी संस्थानिक तर कधी अस्पृश्य अशा एक-ना-दोन कारणांनी ते प्रत्यक्ष देण्याचे लांबणीवर टाकावयाचे. युद्धामुळे निर्माण झालेली परिस्थिती 'युद्ध साहाय्यासाठी स्वातंत्र्य द्या' या मागणीच्या पूर्ततेसाठी उपयोगात आणण्याचा, लोकपक्षातील प्रमुख असलेल्या काँग्रेसचा आग्रह तर तो उलथून पाडण्यासाठी, काँग्रेसच्या पुढाऱ्यांना अटक करून लोकक्षोभ निर्माण करावयाचा व त्याचे खापर काँग्रेसवर फोडावयाचे व युद्धविरोधाच्या कारणांचा आश्रय घेऊन आपल्या कृत्याचे समर्थन करावयाचे, हा साम्राज्यशाहीचा डाव. महात्माजींच्या पत्रव्यवहाराने हा सरकारचा डाव आता जगाला कळविला आहे. तेव्हा महात्माजींच्या शब्दांपुढे सरकारी स्पष्टीकरणे फिकी पडणारच व लोकपक्ष ती अविश्वसनीय मानणारच. अशा स्थितीत आमचा ओढा, आमचा कल, लोकपक्षाकडे असणार हे उघड आहे. काँग्रेस ही युद्धविरोधी आहे, ती फॅसिस्ट आहे, अशा प्रकारचे अनेक आरोप कधी सहेतुक तर कधी अज्ञानामुळे, करण्यात येतात. त्यामुळे काही ठिकाणी काँग्रेसविषयी विनाकरण गैरसमज पसरलेले आढळतात. काँग्रेसची भूमिका महात्माजींच्या

पत्रव्यवहारावरून आता स्पष्ट झालेली असल्यामुळे तीसंबंधी संशय घेणे चूक आहे. ती निःसंशयपणे फॅसिझमविरोधी आहे व तो विरोध परिणामकारक व व्यापक व्हावा म्हणून ती राष्ट्रीय सरकार मागत आहे.

हिंदी पातळीवरील लोकपक्षात अनेक विचार-प्रवाह आहेत; काँग्रेस, लीग, कम्युनिस्ट, रॉयिस्ट, आंबेडकरी इत्यादी. या सर्व विचार प्रवाहांचे पडसाद आमच्या स्थानिक वातावरणावर स्पष्ट ऐकू येण्याइतके उमटले आहेत. ही वस्तुस्थिती आहे. तिला भिऊन, टाळून किंवा विरोध करून आमचे हित होणारे नाही. तत्त्वनिष्ठा ही चांगली आहे, पण तिचा अतिरेक होऊन प्रत्यक्षाकडे दुर्लक्ष केले जाणे अत्यंत वाईट आहे. लोकपक्ष बलवान कसा होईल हे आमचे व्यवहार्य ध्येय पाहिजे. लोकसत्ता स्थापन झाल्यावर शासनपद्धती कशी असावी यासंबंधी मतभेद असू शकतात, पण त्यामुळे शासनसंस्था लोकमतानुवर्ती करण्याच्या मार्गात अडथळे उत्पन्न न होतील एवढी आपण दक्षता घेणे जरूर आहे. आपण तसे न केल्यास अनेक पक्षोपपक्ष लोकपक्ष विभागून त्यांचे बळ कमी होईल व त्यात सर्वांचाच नाश होईल. लोकपक्षातील विचारैक्य हेच त्याचे बळ आहे. हे विचारैक्य वस्तुस्थितीच्या प्रमाणावर आधारलेल्या तत्त्वावरच होऊ शकेल. वस्तुस्थितीचा आधार नसलेल्या कल्पना-सृष्टीत जिवंत ध्येयवाद टिकू व जगू शकत नाही. ‘मला इतरांशी काही कर्तव्य नाही; माझी निष्ठा मला तारील’ या म्हणण्यात स्वतःची फसवणूक आहे. आमचे दौर्बल्य व आमची असफलता ही आमच्या लोकपक्षातील फुटीवर आधारलेली आहेत. लोकपक्षाचे जास्तीत जास्त ऐक्य निर्माण करणे हे आमचे प्रत्यक्ष व्यवहार्य ध्येय पाहिजे. काल्पनिक ध्येये कितीही निराळी असली तरी चालतील. व्यवहार्य ध्येयावर एकत्र येऊ शकणाऱ्या जास्तीत जास्त लोकांचे व पक्षांचे ऐक्य निर्माण करण्यावर आम्ही एक झाले पाहिजे. तसे करण्याशिवाय आम्हांला दुसरा मार्गच नाही. काल्पनिक ध्येयवादामुळे लोकपक्षात पडत चाललेल्या फुटीवर व्यवहार्य ध्येयवादाचा पूल बांधणे हेच आपले सर्वांचे उद्दिष्ट असले पाहिजे. आपण जर ‘हा कम्युनिस्ट व तो भांडवलवाला, हा गांधीभक्त व तो वेदांती’ अशी दृष्टी ठेवून लोकपक्ष संघटित करण्याचेऐवजी खिळखिळा करण्याचे धोरण स्वीकारले तर प्रतिपक्ष प्रबळ होऊन आपण सर्वजण या पारतंत्र्याच्या पंकात रुतलेले राहू.

आमच्या लोकपक्षात आज अनेक वांझोट्या ध्येयवादाची वादळे उठण्याचे मुख्य कारण प्रत्यक्षाशी निगडीत असलेल्या व्यवहार्य ध्येयवादी संघटनेची मुख्य उणीव हे आहे. अशी बलवान संघटना निर्माण झाल्याशिवाय ही काल्पनिक ध्येयवादाची वादळे थांबणार तर नाहीतच पण वैयक्तिक संस्थांनाही आळा घालणे अशक्य होणार आहे. आपल्याला लोकमतानुवर्ती शासनसंस्था हवी आहे, हे आम्ही आमच्या संस्थांचे व्यवहार प्रथम लोकमतानुवर्ती करून सिद्ध केले पाहिजे. वाटेल त्या चार व्यक्तींनी उठावे व हैद्राबादच्या लोकपक्षाचे पुढारी बनून वाटेल तसा व्यवहार करावा, अथवा वाटेल ते करार करावे हे अत्यंत आक्षेपार्ह आहे. या सर्व राष्ट्रीय पापांचा जन्म बलवान संघटनेच्या अभावातून झालेला आहे. ती निर्माण करणे हीच आमची आजची प्रमुख गरज आहे.

## स्टेट कॉंग्रेसचा विचारप्रवाह

असा प्रयत्न चार वर्षांपूर्वी स्टेट कॉंग्रेसच्या स्थापनेद्वारे करण्यात आलेलाही आहे व तो आज तागायत चालू आहे. त्याचा साद्यंत इतिहास आम्हां सर्वांना चिरपरिचित आहे. कित्येकांचा तो आज नाजूक जिव्हाळ्याचा प्रश्न होऊन बसला आहे. कित्येकांनी त्यासाठी आजवर तीन-तीन वेळ कारावास भोगला आहे. आणि पुन्हा तो आजही जशाचा तसाच व जेथल्या तेथेच आहे. त्यामुळे निराशेची वाढ होऊन निष्क्रीयता व आत्यंतिक निष्ठा यांची निर्मिती झालेली आहे. समाजातील विचारशक्ती कुंठित झाल्यामुळे ही परिस्थिती निर्माण झालेली आहे. पाणी फार काळ अडवून व तुंबून ठेवले म्हणजे जी स्थिती निर्माण होते तीच, विचारशक्ती अडविली व तुंबविली म्हणजे निर्माण होते. हा प्रश्न समाजाचा आहे, व्यक्तीचा नाही. काही बलवान व्यक्ती दीर्घकाळ कुंभक करू शकतात. समाजाला ते विशेषतः बाल्यावस्थेत, शक्य होत नाही. तसा आग्रह धरल्यास त्याचा जीव गुदमरू लागतो. म्हणून ही कोंडी फोडण्याचा प्रयत्न अवश्य आहे.

हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसवर तिच्या रीतसर जन्मापूर्वीच जो बेकायदेशीरपणाचा शिक्का मारला गेला, त्याच्या मुळाशी कोणते कारण आहे हे आपण

पाहू. स्टेट काँग्रेसवरील बंदी उठविण्याबाबत जो या संस्थेच्या विद्यमाने आपले माजी अध्यक्ष श्री. काशीनाथराव वैद्य यांनी सरकारशी पत्रव्यवहार केला, त्यातील एका सरकारी पत्रकात सरकारचे हृदय "आपल्या संस्थेचे ध्येय अशा प्रकारची राज्यपद्धती निर्माण करण्याचे आहे की, ज्या राज्यपद्धतीत कायदेमंडळाच्या बहुमतावर शासनसंस्था अवलंबून असते. हे ध्येय सरकारतर्फे नुकत्याच करण्यात आलेल्या एका घोषणेच्या विरुद्ध आहे. त्यात असे जाहीर करण्यात आले आहे की, "प्रजेच्या कल्याणाची अविभाज्य जबाबदारी बादशहावर आहे. तिला अनुसरून या पुढेही लोकांच्या गरजांचा निर्णय करण्यात येईल." या-प्रमाणे स्पष्ट झालेले आहे. फॅसिझम याहून कसा निराळा आहे हे सरकारच जाणे. पण विसंगती हा तर सत्ताधारी मुत्सद्देगिरीचा आत्मा आहे. दुसऱ्याचे स्वातंत्र्य हरण करणारे जगाला स्वतंत्र करण्याची द्वाही फिरवितात. भेद-नीतीवर जगणारे ऐक्याचा पाठ सांगतात. एवढे सारे जर या जगात होते, तर 'प्रजेच्या कल्याणाची अविभाज्य जबाबदारी बादशहावर आहे' असे म्हणणारांनी लोकशाहीचा पक्ष घ्यावा, तिला मदत करावी यात त्यांच्या स्वभावधर्माप्रमाणे विशेष काही नाही. सारांश हा की आपल्याला ज्या जगात राहावयाचे आहे ते हे असे आहे. तेथे सत्तेच्या बळावर शब्दांचे अर्थ फिरत असतात. दिलेले वर शाप व शाप वर ठरतात. आपल्याला जर अनुकूल अर्थ हवा असेल तर प्रथम शक्ती संपादली पाहिजे. ती प्राप्त झाली म्हणजे शब्दच काय पण त्यांचे अर्थही बदलून घेता येतात. तिच्या अभावी शब्द बदलले तरी अर्थ बदलेल असे मात्र नाही. आणि म्हणून आपण आता शब्दांऐवजी प्रत्यक्ष संघटनेवर भर दिला पाहिजे.

## जबाबदार राज्यपद्धती हवी

आपली संघटना संस्थानव्यापी असली पाहिजे. आपल्या संस्थानातील कोणताही एक विभाग-आंध्र, महाराष्ट्र अथवा कर्नाटक या सर्वांचा प्रश्न सोडवू शकत नाही. या तिन्ही विभागांची एकता आज इष्ट व अवश्य आहे. पण ती शक्य होईपर्यंत आपण निराश न होता प्रांतिक क्षेत्रात कार्य करू या. जबाबदार राज्य-पद्धतीवरील आमची श्रद्धा आता पूर्वीहून बळकट झाली आहे. जबाबदार राज्यपद्धतीशिवाय लोकांची खरी उन्नती अशक्य

असल्यामुळे ती आम्ही सोडणे म्हणजे उन्नती नको म्हणणे आहे. जबाबदार राज्यपद्धतीत शासन संस्था कायदेमंडळातील लोक-प्रतिनिधींच्या बहुमतावर अवलंबून असल्यामुळे तिला लोकहिताची उपेक्षा करण्याची शक्यता नसते. याचाच अर्थ जबाबदार राज्यपद्धतीत शासन संस्था लोकमतानुवर्ती असते असा आहे. म्हणून आमचे तिजवरील लक्ष यत्किंचितही कमी होऊ शकत नाही. जबाबदार राज्यपद्धती ही आमच्या संघटन व राजकीय शिक्षण या दोन कार्यक्रमांच्या यशस्वितेवर अवलंबून आहे. हे आमचे कार्यक्रम जितक्या प्रमाणात यशस्वी होतील तितक्या प्रमाणात ती आमच्याजवळ येईल. जबाबदार राज्यपद्धतीही आम्ही मिळविणार आहो, ती आम्हांला कोणी देऊ शकत नाही. तिजसाठी आम्हांला संघटन व राजकीय शिक्षण या दोन मुद्द्यांवर विशेषत्वाने भर दिला पाहिजे. संघटन व शिक्षण यांच्याशिवाय इतर मार्गाने ती मिळेल यावर आमचा विश्वास नाही. आम्ही संघटित व शिक्षित झाल्याशिवाय इतर कोणीही आम्हांला मदत करू शकत नाही. स्वतःची मदत स्वतः न करणाराला परमेश्वरही मदत करू शकत नाही.

## ही पहा अन्यायाची उदाहरणे

बंधू-भगिनींनो! आज शासनसंस्थेचा व्यवहार इतका व्यापक झाला आहे की, समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या दैनिक जीवनावर त्याचे परिणाम झाल्याशिवाय राहू शकत नाहीत. प्रश्न पोटापाण्याचा असो, की मुलाबाळांच्या शिक्षणाचा असो, आरोग्याचा असो की संरक्षणाचा, न्यायाचा असो की आणखी कसला, त्याचे धागेदोरे सरकारपर्यंत पोहोंचतातच. साहजिकच समाजातील प्रत्येक व्यक्तीचे लक्ष सरकारच्या व्यवहाराकडे वेधले जाते. सरकारचा संबंध काही विशेष बाबींपुरताच जेव्हा होता तेव्हा लोकही व्यक्तीच्या गरजेनुसार एकेकटे त्याचा विचार करीत. पण आज ती स्थिती राहिलेली नाही. पूर्वी फारसे कायदे नसत. स्थानिक अधिकारी आपापल्या कल्पनेनुसार अनेक स्थानिक प्रश्न सोडवीत होते, त्यामुळे अनेक गावातील लोकांना एकत्र येण्याची तेवढी गरज भासत नसे. आज कायदे अधिक व व्यापक झाले आहेत. लोकांचे प्रश्न सोडविणे आता तेवढे स्थानिक अधिकाऱ्यांच्या हाती उरले नाही. इत्यर्थ हा की, शासनसंस्थेचा व्यवहार

आज एकसूत्री व सर्वव्यापी झाला आहे. पण त्याबरोबर लोकेच्छेला जे महत्त्व व अधिकार प्राप्त व्हावयास पाहिजेत ते न झाल्यामुळे त्यात एकांगी-पणा व इतर दोष उत्पन्न होण्यास भरपूर संधी मिळाली आहे. लोकांच्या गरजांचा निर्णय देण्याची अविभाज्य जबाबदारी एका व्यक्तीकडे असली म्हणजे अनेक कारभारी बाहेरून आणावे लागतात, वेळोवेळी बाहेरचा सल्ला घ्यावा लागतो व एवढे करून पुन्हा न्यायखात्यात लाचलुचपतीचे प्रकार चालू आहेत काय व असतील तर त्यांना कसा आळा घालावा याची चौकशी करण्यासाठी कमिशन नेमावे लागते. हा प्रकार जेव्हा न्यायखात्याचा तेव्हा जेलखात्याची कथा '३९५ बरकंदाज रखवालदारां-पैकी २३३ ना खात्याची शिक्षा दिली होती, ७ जणांना नोकरीवरून काढून टाकले, १२ जणांच्या पगारात कपात केली व बाकीच्यांना (२१४ ?) किरकोळ शिक्षा दिल्या'. याप्रमाणे डायरेक्टर जनरल साहेबांच्या रिपोर्टात आढळावी व त्याविषयी ते काय उपाय योजना करीत आहेत याचा उल्लेख नसावा हे क्रमप्राप्त आहे. इ. स. १३५० फसलीत पोलिसखात्याकडे नोंदलेल्या ४२६ खून व खुनाचे प्रयत्न या प्रकरणांचा इतिहास त्या खात्याच्या इतिहासावरून कळतो तो असा : '४२६ प्रकरणांपैकी २९२ प्रकरणे न्यायालयापुढे गेली. गतवर्षीची शिलकी १५० प्रकरणे त्यात मिळविता झालेल्या एकूण ४४२ प्रकरणात १२० प्रकरणी आरोपींना शिक्षा झाली, ११९ प्रकरणी ते निर्दोषी ठरले अथवा सोडले, ५ मृत्यु व पळून जाणे यामुळे दाखलदप्तर व १९८ चालू शिल्लक.' याप्रकरणी खुद्द डायरेक्टर जनरलच म्हणतात, "मागील आकड्यांच्या प्रमाणात हे आकडे निःसंशय विचारणीय प्रगती दाखवितात, पण ब्रिटिश-इंडियातील आकड्यांशी तुलना करता ते अत्यंत निराशाजनक आहेत". याप्रकरणी चौकशीच्या कामी अधिक बुद्धीची जरूरी पटविण्यासाठी ते योजना करीत असल्याचे आश्वासन आहे. पण आपल्या खात्यात १९९० पैकी ६२ अधिकारी व ११३३९ माणसात ६०८९ निरक्षर असल्याची जाणीव त्यांना तीव्रतेने जाणवत आहे असे दिसत नाही. शाळा खात्याच्या डायरेक्टरसाहेबांनी आपल्या खात्यात शे. ९० शिक्षक शिक्षण व्यवसायात गोडी नसलेले पण परिस्थितीने भाग पाडल्यामुळे या खात्यात आले

असल्याची प्रामाणिक कबुली दिलेली आपल्या स्मरणात असेलच. या अशा उदाहरणांची संख्या बरीच वाढविता येईल, पण विस्तारभयास्तव तसे करणे शक्य नाही. इत्यर्थ हा की, 'अविभाज्य जबाबदारी' व तिला अनुसरून लोकांच्या गरजांचा निर्णय करण्याची पद्धती याचा परिणाम वरीलप्रमाणे होत असल्यामुळे तिची जागा आता लोकांना जबाबदार असलेल्या शासन संस्थेने घेणे अपरिहार्य आहे. ती काळाची गरज आहे. हैद्राबादेतील लोकांना विचारशक्ती न देण्याची अरेरावी, अद्याप निसर्गाने केलेली नाही. आपल्या गरजा कळण्याइतकी विचार शक्ती त्यांच्यात आहे, ही गोष्ट ज्या क्षणी ओळखली व मान्य केली जाईल तेव्हाच वरील परिस्थिती बदलेल.

## 'आजाद हैद्राबाद' म्हणजे काय ?

प्रजेच्या हार्दिक सहकार्याशिवाय कोणच्याही सरकारचा कारभार आजच्या काळात व्यवस्थित व समाधानकारक होऊ शकत नाही. त्याबरोबरच कोणताही देश आपल्या भोवतालच्या देशांशी स्नेहभावाने व एकजुटीने व्यवहार न करता सुरक्षित राहू शकत नाही. इंग्लंडसारख्या जगड्व्याळ साम्राज्याला रशिया-अमेरिकेशी सहकार्य करणे भाग पडत आहे हे आपण आज पाहतो. अशा स्थितीत 'आजाद हैद्राबाद' चा अर्थ काय घ्यावयाचा ? 'आजाद हैद्राबाद' ची मागणी मूळ इत्तेहादुल-मुस्लिमची. नंतर तिला हैद्राबाद सरकारने पाठिंबा दिलेला. कदाचित हा क्रम उलटा असेल. दोघांच्याही म्हणण्याचा भावार्थ एकच. हैद्राबाद हे इस्लामी राज्य आहे, व ते तहनाम्याप्रमाणे स्वतंत्र आहे. ब्रिटिश हिंदुस्थानातील सत्ता जर तेथील लोकांच्या हाती देण्यात आली तर हैद्राबादची सत्ता ज्यांच्याकडून घेतली गेली त्यांना परत देण्यात यावी व ते आपल्या इच्छेनुसार नंतर बाह्य संबंध करतील आणि हैद्राबादचे जे भाग-वऱ्हाड व सीडेड डिस्ट्रिक्टस-इंग्रजांकडे गेले आहेत ते त्यांना परत देण्यात यावेत. हैद्राबादेतील काही प्रसिद्ध व्यक्तींनी संदिग्ध व लवचिक शब्दांत या मागणीतील शेवटच्या दोन मुद्द्यांना पाठिंबा देऊन 'मुल्की सरकार' ची मागणी केली होती. मौ. बहादुर साहेब यांनी या प्रसिद्ध व्यक्तींना त्या गोल शब्दांचे स्पष्टीकरण मागणारे व आपली भूमिका निःसंदिग्धपणे पुढे ठेवणारे उत्तर दिल्यानंतर 'स्वतंत्र हिंदुस्थानातील स्वतंत्र हैद्राबाद' ची

चळवळ जवळ जवळ थंडावली. तथापि तिच्या या अल्पायू जीवनाने जनतेत वादळ निर्माण केले. या अल्पजीवी वादळाचा विचार सोडला तरी आपल्याला या मागणीचा विग्रह करणे जरूर आहे. हैद्राबादचे स्वातंत्र्य म्हणजे आला हजरत निजामसाहेबांचे स्वातंत्र्य, असे सरकार व इत्तेहादुल मुस्लिमचे म्हणणे. त्यात प्रजेच्या स्वातंत्र्याचा काहीच संबंध नाही. या दोन संस्थांकडून ही मागणी इंग्रज सरकारकडे केली जात आहे. क्षणभर आपण असे गृहीत धरू की इंग्रज सरकारने ही मागणी संपूर्णतः मान्य केली. तीमुळे हैद्राबादच्या परिस्थितीत काय बदल होईल? हैद्राबादच्या प्रजेला आपल्या गरजा काय आहेत हे ठरविण्याचा व तदनुसार निर्णय घेण्याचा हक्क दिला जाणार काय? या प्रश्नाचे उत्तर आज तरी 'नाही' हेच आहे. स्वतंत्र हिंदुस्थानशी इतर स्वायत्त प्रांतांप्रमाणे सहकार्य करणार काय? त्याचेही उत्तर 'त्यावेळच्या परिस्थितींत योग्य दिसेल तसे' याप्रमाणे गोल आहे. याचा अर्थ स्वतंत्र हैद्राबाद हिंदुस्थानशी इतर प्रांतांप्रमाणे सहकार्य करण्यास आजतरी संकोचत आहे.

भविष्यकाळात हैद्राबाद आपले परराष्ट्रीय संबंध हिंदुस्थानशिवाय इतर इंग्लंडादी राष्ट्रांशी जोडण्याची अशक्यता दिसत नाही. हैद्राबाद एकटे राहू शकत नाही व स्वतंत्र हिंदुस्थानशी इतर प्रांतांप्रमाणे एक घटक म्हणून राहण्यास आज तरी मान्यता द्यावयास तयार नाही. याचा अर्थ ते इंग्लंडचे पूर्ववत दोस्त राहण्याचाच अधिक संभव आहे. सारांश, या विग्रहाचा स्पष्ट अर्थ हा आहे की, या आजाद हैद्राबादमध्ये प्रजेला स्वातंत्र्य नाही, स्वतंत्र हिंदुस्थानशी घटकाचे नाते असेलच असे नाही व इंग्रज साम्राज्याचे दोस्त नसणार हेही निश्चित नाही. अशा आजाद हैद्राबादच्या कल्पनेशी आपल्या स्वातंत्र्यासाठी झगडणारी प्रजा कदापि सहमत होऊ शकत नाही.

## प्रजेच्या स्वातंत्र्याचा अर्थ

ओघानेच आले म्हणून हैद्राबादेतील प्रजेच्या स्वातंत्र्याच्या कल्पनेसंबंधी आम्ही आमची मते अधिक स्पष्ट करणे अगत्याचे आहे. हैद्राबादच्या प्रजेला जबाबदार असलेले सरकार, म्हणजेच जबाबदार राज्यपद्धती स्थापन झाल्याशिवाय तिच्या उन्नतीविषयक

गरजा भागविल्या जाणे शक्यच नसल्यामुळे व त्याशिवाय ती इंग्रज साम्राज्यशाहीचा मधून मधून येणारा सल्ला थांबवू शकत नसल्यामुळे आमचे पहिले उद्दिष्ट जबाबदार राज्यपद्धती मिळविणे हे आहे. जबाबदार राज्यपद्धती नाहीतर प्रजेची उन्नती नाही व इंग्रज सरकारचा सल्ला टाळता येणे शक्य नाही. इंग्रजांचे आधिपत्य नको असे आम्हाला- हैद्राबादेतील प्रजेला-वाटते, पण त्यासाठी प्रयत्न करणे तिला जबाबदार राज्यपद्धतीशिवाय शक्यच नाही. जबाबदार राज्यपद्धतीचा प्रश्न काढू नका व इंग्रजांची सत्ता दूर करण्यासाठी आमच्याशी सहकार्य करा ' असे कोणी म्हणाल्यास त्याचा अर्थ 'आपले पाय बांधून तुम्ही आमच्या बरोबर धावा' असा होतो. ज्या कोणाला हैद्राबादेतील प्रजेचे सहकार्य पाहिजे असेल त्याने प्रथम प्रजेला, असलेल्या सत्तेत सहभागी केले पाहिजे. आणि असे झाले म्हणजेच इंग्रज सत्तेशी सनदशीर झगडण्यात प्रजा सहकार्य करील. सत्तेत सहभागित्व नाहीतर सहकार्य नाही.

हैद्राबादची भौगोलिक रचना, त्याचे सांस्कृतिक व इतर संबंध व इतिहास यांचा विचार करता हैद्राबाद हा भावी स्वतंत्र हिंदी फेडरेशनचा एक घटक असणे अपरिहार्य आहे. सर्व हिंदुस्थानवर आज इंग्रजांची सत्ता असल्यामुळे ती आपल्या हाती घेण्याचा प्रश्न सर्वांना सारखाच व एक-जुटीने सोडवावा लागेल. हैद्राबादला व ब्रिटिश हिंदुस्थानला नको असलेली गोष्ट जर एकच आहे तर ती दूर करण्यासाठी दोघांनी एकत्रच प्रयत्न करावयास पाहिजेत. आमचे भवितव्य- अर्थात अंतिम- जर याप्रमाणे हिंदुस्थानशी निगडीत आहे तर मग हैद्राबादने भावी स्वतंत्र हिंदुस्थानचा एक घटक असणे याशिवाय, त्याच्या आजच्या व उद्याच्या कल्याणाला हितकर अशी दुसरी कोणची गोष्ट असू शकते ? आमच्या मते हैद्राबादने भावी स्वतंत्र हिंदी फेडरेशनचा घटक राहणे हेच योग्य आहे. त्या बाबतीत शेवटचा निर्णय घेण्याचा अधिकार स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाप्रमाणे अर्थातच प्रजेला असेल. भविष्यकालीन काल्पनिक भीती आम्ही बाळगण्याचे कारण नाही. स्वतंत्र हिंदुस्थानात हैद्राबादचे तुकडे केले जातील, काही जातींच्या उन्नतीला अवसर राहणार नाही ही शंका निराधार आहे. सत्ता सर्वांची, सवलती सर्वांना व उत्कर्ष सर्वांचा, हीच स्वतंत्र हिंदुस्थानची व्याख्या आहे.

बंधू-भगिनींनो! आपले भवितव्य जगाचा व हिंदुस्थानचा घटक या नात्याने जसे त्यांच्या भवितव्याशी निगडीत आहे, तसेच ते आपण निर्माण केलेल्या आपल्या भोवतालच्या परिस्थितीशीही आहे. म्हणून त्याचा विचार करताना सर्वस्वी बाहेरच्या किंवा सर्वस्वी स्थानिक परिस्थितीवर भर देऊन चालणार नाही. बाहेरच्या परिस्थितीत घडून येणारे भविष्यातील बरे वाईट परिणाम हैद्राबादला जसेच्या तसे राहू देणार नाहीत हे जेवढे खरे तेवढेच त्याचा कमी अधिक नफा तोटा आपल्या प्रत्यक्ष पदरात न पडणे हे आपल्या कर्तृत्वावर अधिकांशाने अवलंबून असेल हेही खरे. सारांश फायदा झाला तर तो पचविण्यासाठी व टिकविण्यासाठी आणि नुकसान झाले तर ते सहन करण्यासाठी आपण आपली शक्ती वाढविणे अवश्य आहे. मी आपल्याला आपुलकीने सांगू इच्छितो की निष्ठेला म्हणजे केंद्रित विचारांना स्पष्ट आकार प्राप्त होण्यासाठी आपल्याला प्रत्यक्ष प्रयत्न केला पाहिजे. परमेश्वराला देखील शरीराचा आश्रय केल्याशिवाय व्यक्त होता येत नाही. प्रयत्नाला अवसरच नाही असे म्हणण्यात अर्थ नाही. अपयशाने खंगण्याचे कारण नाही. हा कर्मयोग आहे.

## विचारपद्धतीत क्रांती हवी

आपल्या उद्देशाविषयीच्या कल्पना स्पष्ट नसल्या म्हणजे जेवढा व जसा प्रयत्न व्हावयास पाहिजे तेवढा होत नाही. आपल्याला जबाबदार राज्यपद्धती मिळवावयाची आहे हे खरे पण ते आपले अंतिम ध्येय आहे. ते साध्य करण्यासाठी आपल्याला जास्तीत जास्त लोकांच्या विचार पद्धतीत बदल घडवून आणण्याचा व तो बदल कार्यक्षम होईल इतका दृढ करण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे. लोकांकडून अपेक्षित आचार तेव्हाच घडू शकेल जेव्हा त्यांच्या विचारात तदनुकूल बदल होईल. सारांश आपल्यापुढे असलेले अत्यंत महत्त्वाचे व पहिले काम लोकांच्या विचारपद्धतीत बदल घडवून आणण्याचे आहे. त्यासाठी अनेक मार्ग व अनेक उपाय आहेत. त्या सर्वांवर आपण आपले लक्ष केंद्रित केले पाहिजे. त्यासाठी आरंभी आपण परिपक्व विचाराच्या कार्यकर्त्यांना एका संस्थेच्या सूत्रात गोवले पाहिजे. व नंतर समाजात प्रचारादी कामे करीत असता ज्या ज्या ठिकाणी नवनवे होतकरू कार्यकर्ते आढळतील तेथून त्यांना आत्मसात करीत हे

परीघ वाढविले पाहिजे. अशा प्रकारे हा आपला विशिष्ट विचारौघ घराघरां-तून, मेंदूमेंदूतून आपणांस फिरवावयाचा व दृढ करावयाचा आहे. आपल्या समाजात प्रत्यक्ष क्रांती झालेली पाहावयाची असेल तर प्रथम समाजाच्या विचार करण्याच्या पद्धतीत क्रांती घडवून आणली पाहिजे. क्रांती हा शब्द जो मी वापरला त्यामुळे आपण घाबरण्याचे कारण नाही. क्रांती हा शब्द मी बदल या अर्थी वापरला आहे. एकाएकी बदल कोणच्याही वस्तूत व कोणच्याही काळी होऊ शकत नाही. आकस्मिक रीत्या स्पष्ट झालेल्या बदलाला आपण क्रांती म्हणतो. व हळूहळू स्पष्ट होणाऱ्याला आपण उत्क्रांती म्हणतो. हा भेद, स्पष्ट होण्याच्या भिन्न पद्धतीमुळे किंवा गतीच्या कमी-अधिकपणामुळे निर्माण झालेला आहे. एऱ्हवी बदल हा जगातील प्रत्येक वस्तूत प्रत्येक क्षणी होतच असतो. बदलत असणाऱ्या क्रियेलाच जीवन म्हणतात. आपल्या सर्वांच्या विचारात प्रत्यही बदल होत असतो. तो एका विशिष्ट पद्धतीने व्हावा एवढाच आपल्याला प्रयत्न करावयाचा आहे. आज आपल्या समाजात जे अत्यंत निरुत्साही वातावरण आढळते, त्याचे कारण आपल्या सदोष विचारपद्धतीत आढळते.

## —तर हिमालय वितळेल

आज शासनसंस्थेचे कार्यक्षेत्र विश्वव्यापी झाले आहे. प्रत्येक मनुष्यावर तिचे प्रत्यक्ष आघात होत आहेत. प्रत्येक व्यक्तीने प्रत्याघात करणे व आपला ठसा शासनसंस्थेवर उमटविणे हे क्रमप्राप्त आहे. व्यक्ती जिवंत आहे की नाही हे तिच्या प्रत्याघात करण्याच्या क्रियेवरून ठरते. आणि म्हणून आज आम्हांला जिवंत समाज म्हणून जगावयाचे असेल तर राजकारणाला आपल्या दैनिक दैहिक क्रियेइतकेच महत्त्व दिले पाहिजे. राजकारण ही आपली प्रत्येकाची गरज आहे. दररोज आपण जितक्या नियमितपणे अन्नपाणी घेतो तितक्याच नियमितपणे राजकारण केले पाहिजे. राजकारण हा व्यावहारिक जबाबदारी नसलेल्या विद्यार्थ्यांचा किंवा तरुणांचाच प्रश्न नाही. मी तर असे म्हणेन की बायकामुलांची, घरादारांची, इष्टमित्रांची जबाबदारी असणारांचा तो खरा प्रश्न आहे. आणि म्हणून प्रत्येक जबाबदार व्यक्तीने तनमनधनाने व एवढे ज्यांना शक्य नसेल त्यांनी तनाने, मनाने अथवा धनाने राजकारणाला हातभार लावणे

हा त्यांचा निसर्गप्रणीत धर्म आहे. फार नाही अवघी शेकडा एक व्यक्ती राजकारणासाठी तनमनधन अर्पण करील व बाकीचे लोक आपल्या शक्त्यनुसार मागे राहून साहाय्य करतील तर आपले सर्व प्रश्न कसल्याही उल्कापाताशिवाय आपल्या इच्छेनुसार सुटतील. आपल्या मराठवाड्याचीच लोकसंख्या चाळीस लाखांची आहे. त्यांपैकी चाळीस-हजार लोक एक-दिलाने नुसता विचार करतील तर हिमालय वितळेल, महासागर आटेल. आणि हे असे होणे सर्वस्वी आमच्या इच्छेवर अवलंबून आहे. मी आपल्याला स्वानुभवाने सांगेन की, स्वातंत्र्येच्छेची लाट कालाची करणी आहे, ती सारखी उंचावत व फोफावत आहे. आपणही आपल्या स्वातंत्र्ये-च्छेची ओंजळ त्या लाटेत मिसळून पावन होऊ या !

## सर्व समाज-शक्तींची एकजूट

बंधू-भगिनींनो ! आपण व्यक्तिशः कोणचेही वादी असा. आपल्याला आपले वैयक्तिक व सामाजिक प्रश्न, व्यक्तीच्या व समाजाच्या धारण-पोषण-वर्धन यांना अनुकूल असे सोडविण्याचा मार्ग फक्त एकच आहे. तो जुन्या भाषेत योग या शब्दाने व नव्या भाषेत कौशल्यपूर्ण कर्म या शब्दाने संबोधिला जातो. कर्माचे कौशल्य दुसरे तिसरे काही नाही. विचारांचे केंद्रीकरण हेच ते कौशल्य आहे. सामाजिक प्रश्न सोडविण्या-साठी अनेक व्यक्तींच्या विचारांचे एका उद्देशावर आत्यंतिक केंद्रीकरण व्हावयास पाहिजे. या मार्गाची परिणामकारकता पडताळून पाहावयाची झाल्यास आपण ती विरोधक शक्तीच्या व्यवहारावरून पाहावी. विरोधी-शक्ती, अनेक व्यक्तींच्या विचारांचे एका उद्देशावर केंद्रीकरण न होईल यासाठी सतत प्रयत्न करीत असणार हे उघड आहे. सामाजिक विचार-प्रवाहावर सारखी काठी आपटीत राहून त्याची एक लाट न बनेल, त्याच्या अनेक लहान लहान धारा बनून त्या एकमेकींपासून दूर दूर जातील असा जागरूक प्रयत्न तिजकडून होत जाणे हे तिच्या स्वभावधर्माला अनु-सरूनच आहे. या विचारौघाचे विभाजन कधी हिंदु-मुसलमान, कधी मुल्की-गैरमुल्की, कधी स्पृश्य-अस्पृश्य, कधी उर्दू-मराठी अशा अगणित

व अनेकवेळा अनाकलनीय स्वरूपात व्यक्त होते. आपला सर्वांचा प्रयत्न आपल्याबरोबर ही विभाजन-यष्टीच फुटेल असे विचारैक्य निर्माण करण्याचा, दुरावलेले विचारौघ एकत्र आणण्याचा असावयास पाहिजे. आम्ही आमच्या अज्ञानामुळे किंवा चुकीच्या समजुतीमुळे या भेदनीतीच्या जाळ्यात आपण होऊन आपले हातपाय अधिकाधिक अडकावून घेऊ लागलो आहो ही दुर्दैवाची गोष्ट आहे. आता आपल्याला निष्काळजी राहून भागणार नाही अशी मला सूचना करावीशी वाटते. आपल्या उद्देशाची पूर्तता काहीतरी करून होणारी नाही. आपल्याला आपले विचार व आचार शुद्ध ठेवावयास पाहिजेत. समाजाचे विभाजन करणारा प्रत्येक आचार व विचार अशुद्ध समजून त्याज्य ठरविला पाहिजे. सारासार विचार न करता, येईल त्या प्रत्येकाला उत्तेजन देणे हे चूक आहे. त्याचा स्पष्ट अर्थ आम्हाला खरोखर काय पाहिजे व ते कसे मिळेल याविषयी आम्हांला ज्ञान नाही हाच होतो. ‘यथासांग ते कर्म काही घडेना, घडे कर्म ते पुण्य गाठी पडेना’ अशी आमची आज स्थिती आहे. अगोदरच समाज दरिद्री, त्यात दातृत्वाचा अभाव आणि पुन्हा पात्रापात्रतेचा विचार न करण्याची प्रथा. या प्रकारामुळे जेथे खरोखर उत्तेजन व साहाय्य पाहिजे, त्याऐवजी ते जेथे नको आहे तेथे जात आहे. सारांश आम्ही आता आपली निवड करण्याची, खरेखोटे पारखण्याची शक्ती जागृत केली पाहिजे, उपयोगात आणली पाहिजे. आपली शक्ती मग ती शारीरिक, मानसिक, आर्थिक कोणची का असेना, आपल्या ध्येय-साधनाठीच खर्च झाली पाहिजे. तरच आपल्याला ध्येय साध्य होईल.

बंधू-भगिनींनो! मी आतापर्यंत सांगितलेल्या ठळक ठळक कल्पनां-वरून या अधिवेशनाचे मूलगामी स्वरूप व त्याची नियोजित वाढ आपल्याला समजलीच असेल. या व इतर कल्पनांचा आविष्कार व्याव-हारिक भाषेत आपल्यापुढे अध्यक्षांच्या भाषणातून व ठरावातून झालेला आढळेल. आपण त्यासंबंधी समतोलपणे व दूरदर्शित्वाने विचार करून निर्णय घ्यावा अशी विनंती आहे.

शेवटी शक्य त्या प्रयत्नानंतरही आजच्या महागाईच्या व दुर्मिळतेच्या काळात आपल्या ज्या काही गैरसोयी होतील त्याबद्दल क्षमा मागून व अधिवेशनाच्या यशस्वितेसाठी सहकार्याची याचना करून मी आपली रजा घेतो.

# हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषद,

# अधिवेशन ६ वे,

## अध्यक्ष : श्री. आ. कृ. वाघमारे यांचे भाषण

## इ. स. १९४६

सन्मान्य स्वागताध्यक्ष, प्रतिनिधी व सज्जन हो !

आपल्या आपलेपणाच्या आधारे मी आज येथे उभा आहे. आपल्या येथे पुढारीपण हे सामुदायिक स्वरूपाचे आहे हे आपण जाणताच. येथील सामुदायिक जीवनाचा आरंभ अंतर्गत व्यक्ती-विकासातून झाला नाही. प्रथम शिक्षण-प्रसार, नंतर सामाजिक चळवळ व मग मवाळ राजकारण, असा सहज क्रम आम्ही अवलंबिलेला नाही. त्याला अनुकूल अशी अवस्थाच येथे नव्हती. संस्थानातील ही बंद दारे १९३८ च्या हिंदी परिस्थितीच्या संसर्गाने व तिच्या प्रतिक्रियेमुळे विशेषतः मोडली. त्या परिस्थितीला वाकविणारे व्यक्तित्व येथे नव्हते. चार चौघांनी मिळून तो गाडा हाकलला, संरक्षिला व ढकलला. आज तीच पद्धती चालू आहे. आपणांपुढे उभे राहण्याचे धाडस त्यामुळेच मी करीत आहे.

आण्णासाहेब वाळूजकरांसारख्या सहकारी व मित्राची आठवण आरंभी व्हावी हा निसर्ग आहे. प्रकृतीने म्हातारे असता तरुणांच्या तडफेने त्यांनी परिषदेची नौका वादळातून हिंमतीने हाकारली आहे. कसलेल्या अंत:करणाला हादरे देणाऱ्या सतत परिस्थितीत त्यांच्या चेहऱ्यावरील हास्य

कधीच कमी झाले नाही. वाढत्या जबाबदारीच्या काळात त्यांचा विरह विशेषच जाणवत आहे.

## आजची परिस्थिती

आज आपण क्रांति-कालातून जात आहो. अन्न-संकट 'आ' करून उभे आहे. उपासमारीमुळे लक्षावधी लोक मृत्युमुखी पडण्याची भीती वाटत आहे. दिल्लीहून ता. २४ एप्रिलला निघालेल्या एका बातमीत असे म्हटले आहे की, मुंबई, मद्रास, म्हैसूर, राजपुताना आणि काठेवाडचा काही भाग येथे तीन आठवडे पुरेल इतकाच धान्य-साठा असून त्यानंतर कठीण परिस्थिती निर्माण होण्याचा संभव आहे. हिंदुस्थानला आज कमीत कमी वीस लक्ष टन धान्याची गरज आहे असे म्हणतात. हिंदुस्थानला जून महिन्यात तीन लक्ष वीस-हजार टन धान्य बाहेरून आणणे जरूर पडणार आहे. मानवी संहार करणारे हे भीषण संकट कसे टाळता येईल ही आज राष्ट्रापुढील विवंचना आहे.

तसेच पारतंत्र्यातील या व इतर यातना असह्य होत आहेत. यातून मुक्त होण्याची अधीरता वाढत आहे. १९४२ च्या 'चलेजाव' ठरावाने व त्यानंतरच्या चळवळीने राष्ट्रात नवचैतन्य निर्माण केले. ऑगस्ट आंदोलन म्हणजे जनतेच्या स्वातंत्र्यान्दोलनाचे जणू तांडव-नृत्यच! जनतेचा खवळलेला महासागर किती भीषण, रुद्र स्वरूप धारण करू शकतो याचा तो नमुना होता. सागराच्या तळाशी सुप्तावस्थेत असलेल्या अनेक शक्ती यावेळी प्रकट झाल्या. हिंदुस्थानच्या हजारो वर्षांच्या इतिहासात तो एक अभूतपूर्व प्रसंग होता. या आंदोलनाची क्रांतिकारक लाट सर्व राष्ट्रभर उसळून उठून निमालेली दिसली तरी तिने निर्माण केलेली स्वातंत्र्य-निष्ठेची अंत:प्रेरणा स्वातंत्र्य-प्राप्तीशिवाय शांत होऊ शकत नाही. आजाद हिंद सैनिकांना स्वदेशी आणल्याबरोबर त्यांच्या रोमांचकारी इतिहासाने जी आसेतुहिमाचल विद्युद्वेगाने हिंदी मनावर पकड घेतली व त्यानंतर देशभर जे स्फुल्लिंग उडाले त्यावरून आपला उज्ज्वल भविष्यकाल नजीक - अगदी नजीक- आला असे वाटू लागले आहे. स्वातंत्र्यासाठी हिंदुस्थान अधीर झाला आहे. तो आता थांबू शकत नाही. अभेद्य अशा सैन्यात व नाविक-दलात ही आकांक्षा उत्कटतेने व अधीरतेने डोकावत असलेली स्पष्ट दिसत आहे.

युद्ध समाप्तीमुळे आता जगभर अमेरिका, इंग्लंड व रशिया यांच्यात वर्चस्व स्थापनेसाठी स्पर्धा चालू आहे. इंग्लंडची आर्थिक परिस्थिती फारच बिकट झाली आहे. हिंदुस्थानशी समेट करण्याशिवाय त्याला मार्ग उरलेला नाही. त्यासाठी त्याचे त्रि-मंत्री-शिष्टमंडळ येथे मार्चमध्येच आले असल्याचे आपण सर्वजण जाणताच. त्यांची बोलणी चालू आहेत. सारांशात परिस्थिती ही अशी आहे. तिच्यातून काय निष्पन्न होईल हा आजचा प्रश्न आहे. तथापि परिस्थितीचा विग्रह करून बराच अचूक अंदाज करणे शक्य आहे. हिंदुस्थानची स्वतंत्रता या मध्यबिंदूवरून आपण विचार करणार हे उघड आहे.

## मार्गातील अडचणी

हिंदी लोकांच्या हाती प्रत्यक्ष सत्ता देण्याच्या मार्गात आज मुख्य तीन अडचणी दिसतात. पाकिस्तान, संस्थानिक व इंग्रजी आर्थिक हितसंबंध या त्या तीन होत. देशाचे विभाजन करण्याची कल्पना कोणाच हिंद-पुत्राला मान्य असू शकत नाही. खेरीज ते देशाला दुर्बल करणारे आहे. दुर्बलांना जगात काहीच किंमत असत नाही. मुसलमानांचे संख्याधिक्य असलेले प्रांत निराळे करणे म्हणजे बंगाल-पंजाबची फाळणी करणे होय. असे तुकडे आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण असू शकत नाहीत. म्हणून या मागणीला राष्ट्रीय विचारसरणीचे लोक मान्यता देत नाहीत. तथापि या अमान्यतेमागे कोणावरही जबरी करण्याचा हेतू नाही. स्वतंत्र संयुक्त हिंदुस्थानातील घटकांना स्वयंनिर्णयाचा अधिकार असेल ही गोष्ट राष्ट्रीय सभेने मान्य केली आहे. या हक्कानुसार मुसलमानांची निराळे होण्याची इच्छा असल्यास मुसलमान बहुसंख्य असलेल्या जिल्ह्यातील सर्व सज्ञान जनतेचे मत घेतल्यानंतर, बहुसंख्येने त्याला अनुकूलता दर्शविल्यास तसे करता येईल. लीगला हे मान्य नाही. केवळ लीग म्हणते म्हणून पाकिस्तानला मान्यता द्या असा तिचा दुराग्रह आहे. काँग्रेसने दुसरा एक मार्ग सुचवला आहे. तो हा की, एक आंतरराष्ट्रीय लवाद नेमावयाचे व त्याने दिलेला निर्णय दोघांनी मान्य करावयाचा. पण ही गोष्टही लीगला मान्य नाही. इंग्रजांचे आजवरचे धोरण या मतभेदाचे भांडवल करून सत्तात्यागाची टाळाटाळ करीत राहण्याचे होते. अल्पसंख्याकांना प्रगतीला

अडथळा करू देणार नाही असे ब्रिटिश पंतप्रधानांनी परवा सांगितले आहे. त्यांच्या प्रामाणिकपणाला आणखी एकवेळ कस लावण्याचे राष्ट्रीय सभेने ठरवले आहे. तिने या बाबतीतील आपली अंतिम भूमिका सांगून टाकली आहे. लीग आपली भूमिका सोडावयास अद्याप तयार नाही. इंग्रज सरकार या खेपेला कसे वागते हे आता पाहावयाचे आहे. काँग्रेसने आपली स्वतंत्र हिंदुस्थानची जी कल्पना पुढे मांडली आहे ती, स्वेच्छेने हिंदी संघराज्यात येणाऱ्या प्रांतिक घटकांच्या संयुतीकरणावर आधारलेली आहे. तसेच या घटकांना प्रांतिक स्वायत्तता व शेषाधिकारही असतील, हे तीन स्पष्ट केले आहे.

## संस्थानिकांची अडचण

दुसरी अडचण संस्थानिकांची. संयुक्त स्वतंत्र हिंदुस्थानला नरेंद्र मंडळाने मान्यता दिली असल्याची बातमी आहे. आपापल्या संस्थानात जबाबदार राज्यपद्धती सुरू करून जनतेच्या अधिसत्तेला मान्यता देण्यास व आपण घटनाबद्ध राजे राहण्यास मात्र ते तयार आहेत असे दिसत नाही. स्वतंत्र हिंदुस्थानात अरेराव संस्थानिकांना स्थानच असू शकत नाही. तसेच स्वतंत्र हिंदुस्थानात संस्थानांचा अंतर्भाव न झाला तर त्या स्वातंत्र्याला काही अर्थ असणार नाही. ‘स्वतंत्र तहनाम्यांनी सरळ ब्रिटिश बादशहांशी संबंधित असलेली देशी राज्ये’ असा आवाज मधून मधून ऐकू येतो. “या कल्पित कथांचा बोजवारा कधीच उडाला आहे,” असे सांगून गांधीजी म्हणतात, “नामांकित कायदे-पंडितांनी ही गोष्ट निदर्शनास आणून दिली आहे की, कायद्यातील नुसत्या शब्दांचाच विचार करू जाता, देशी राज्यांचा संबंध सरळ बादशहांशी निगडित असला तरी, ब्रिटिश राज्य घटना व तिच्या अंतर्गत असलेली हिंदी राज्यघटना यांची रचना अशी केली गेली आहे की, तत्त्वतः बादशहांशी असलेला संबंध हा व्यवहारात हिंदुस्थान सरकारशी संबंध अशा स्वरूपाखेरीज इतर कोणच्याही प्रकारे तो अंमलात येऊच शकत नाही. ज्याप्रमाणे इ. स. १८५८ मध्ये कंपनी सरकारकडून हिंदुस्थान सरकारकडे राज्याचा हवाला आल्याबरोबर कंपनी सरकारचें राज्य व वहिवाटीचे अधिकार हे सर्व हिंदुस्थान सरकारला प्राप्त झाले, त्याचप्रमाणे आज हिंदुस्थान सरकारच्या

हाती स्वतःचे व बादशहांकडून मिळालेले एकूण जे काही अधिकार असतील त्या झाडून सर्व अधिकारांचा वारसा भावी स्वतंत्र हिंदुस्थानच्या सरकारला मिळणे स्वाभाविक व क्रमप्राप्त आहे."

पण आजच्या जगात या जुनाट तहनाम्यांना काहीच किंमत उरलेली नाही. केवळ सैन्याच्या बळावर राज्ये मिळविणे या बाबी आता इतिहास-जमा झालेल्या आहेत. लोकेच्छेशिवाय राज्यकारभार आज चालू शकत नाही. त्याचाच अर्थ लोकशाही– लोकांची अधिसत्ता– ही आज अपरिहार्य अशी बाब झाली आहे. अमर्याद राजशाही आज असंभवनीय आहे. वास्तविक आज तिला अस्तित्त्वही नाही. राजशाहीच्या नावावर साम्राज्यशाही आज हिंदी संस्थानातून वावरताना दिसते. या आडमार्गाने तिला जगणे व जगविणे स्वतंत्र हिंदुस्थानात शक्य नाही.

त्रि-मंत्री-शिष्टमंडळ या बाबतीत अद्याप काही बोललेले नाही. त्यांची आतापर्यंतची वागणूक मात्र संशयातीत नाही. अखिल भारतीय प्रजा-परिषदेच्या प्रतिनिधींशी विचारविनिमय करण्याचे सौजन्यही त्यांनी दाखविलेले नाही. याशिवाय नरेंद्र मंडळात नसलेल्या बड्या संस्थानि-कांच्या अंधारात काय कारवाया चालू आहेत त्या प्रकाशात आलेल्या नाहीत. प्रत्यक्ष असो की अप्रत्यक्ष, ब्रिटिश सत्तेचा थोडासा अंशही संस्थानात शिल्लक राहिल्यास तडजोड होऊ शकत नाही. त्याचप्रमाणे राजसत्तेचे घटनात्मक प्रतीक म्हणूनच फार तर या संस्थानिकांना आज असलेल्या आपल्या राजेपणाच्या पदव्या कायम ठेवता येणे शक्य आहे; कारण राजसत्तेचे अंतिम अधिष्ठान प्रजाच असावयास पाहिजे. साहजिकच हिंदी घटना समितीवर जनतेचे प्रतिनिधीच गेले पाहिजेत.

हिंदुस्थानात असलेले इंग्रजी सैन्य हे योग्य अशा निश्चित मुदतीत हिंदुस्थानचा किनारा सोडून गेलेच पाहिजे. त्याबाबत तडजोडीला काही जागा नाही. इंग्रजी सैन्याचे अस्तित्त्व हे हिंदी स्वातंत्र्याला विरोधी आहे. ब्रिटिश आर्थिक हितसंबंधांचा प्रश्न, हिंदी हिताला विघातक न होईल असा सोडविला जाणे जरुरीचे आहे. त्याचा तपशील अद्याप बाहेर आलेला नाही. स्वतंत्रपणे त्याची येथे चर्चा करणे शक्य नाही.

## अभिनव प्रयोग

युद्धकालातील कटू अनुभव व घोंघावत असलेले अन्नसंकट, दीडशे वर्षांतील पारतंत्र्याचा आलेला तिटकारा व इंग्रजांनी अनेक वेळा केलेला वचनभंग इत्यादि कारणांनी ही गुलामगिरीची काळरात्र लवकर संपावी अशी तीव्र इच्छा हिंदी मनात दिसते, तर आंतरराष्ट्रीय परिस्थिती व घरची आर्थिक भीषणता यांतून सहीसलामत बाहेर पडण्यासाठी हिंदुस्थानशी लौकर समेट करणे फार जरूर आहे असे इंग्लंडला वाटत आहे. जर आपण आज सन्मान्य तडजोड न केली तर हिंदुस्थानातील असंतोषाचा भडका उडेल व घरची आर्थिक घडी अधिकच विस्कटेल अशी इंग्लंडला भीती वाटते, तर हिंदी मनालासुद्धा, शस्त्रबलाने संपन्न अशा इंग्रजी साम्राज्याच्या हातून जबरीने सत्ता घेण्यासाठी लागणारा अवधी व द्यावे लागणारे मोल याचा विचार करणे अवश्य होते. सन्मान्य तडजोडीची शक्यता ही अशी निर्माण झाली आहे. म्हणून हंगामी सरकार व स्वतंत्र हिंदुस्थानची घटना तयार करणारी समिती यांची स्थापना शक्यतो लवकर करण्याचे प्रश्न प्रामुख्याने पुढे आहेत. तडजोड व निकड म्हणून येणाऱ्या गोष्टी आदर्श अर्थातच असू शकत नाहीत. इंग्लंड जर सत्ता सामोपचाराने सोडीत असेल तर इतर बाबींसाठी अडून न बसण्याचे व इंग्लंडला आणखी एक कसोटी लावून पाहण्याचे धोरण काँग्रेस अवलंबित असलेली दिसते. हा एक अभिनव प्रयोग आहे. शास्त्रशुद्ध घटनासमिती ही देशांतील सर्व सज्ञान मतदारांनी निवडलेली असावयास पाहिजे; यासंबंधी काँग्रेसला संशयच नाही. प्रश्न आदर्श घटना समिती कोणती हा नाहीच. तातडीने खरी सत्ता हाती येत असता घटना समिती शास्त्रशुद्ध नाही म्हणून ती हातची सोडावी का हा प्रश्न आहे. काँग्रेसला सत्तेचा प्रश्न महत्त्वाचा वाटतो. ती हाती आल्यावर उणीवा दूर करण्याचा तिला विश्वास वाटतो. काँग्रेस ही जिवंत, पुरोगामी व सारखी विकास पावत असलेली संघटना आहे, ती आजवर प्रगतीच्या मार्गात अडथळा करणारांना बाजूला सारीत सारखी पुढे गेली आहे व जाईल, असा विश्वास बाळगणारांनी काँग्रेसला आज तडजोडीसाठी पाठिंबा देतांना संकोच करण्याचे कारण नाही. किसान मजदूर राज्य हे तिचे ध्येय आहे. ती त्याकडे जात आहे. गांधीजी,

पंडितजी व तरुण वर्ग तिला या मार्गापासून ढळू देणार नाहीत असा माझा विश्वास आहे.

## तरीही संघटना पाहिजेच

या सर्व गोष्टी होत असताना, आपण जनता-संघटना वाढविणे, ती बलवान करणे हे त्याबरोबरच अवश्य आहे. अनेक दृष्टींनी सर्वच बाबींसाठी संघटनेकडे अधिकाधिक लक्ष देणे जरूर आहे. तडजोड न झालीतरी अशांतता निर्माण झाली तरी व आपले किसान-मजदूर राज्याचे ध्येय संपूर्णतः व लवकर साध्य करण्याच्या दृष्टीनेही आपल्या संघटनेवर शक्ती केंद्रित करण्याची आज निकड आहे. आपली अंतिम भिस्त आपल्या संघटना-शक्तीवरच असली पाहिजे. तडजोड होईल ती आपल्या शक्तीप्रमाणेच, भविष्य-काल आपल्या इच्छेनुसार येणे हे आपल्या संघटना शक्तीवरच अवलंबून आहे. मिळेल ते पचविण्यासाठी व वाढविण्यासाठी शक्तीचीच आवश्यकता आहे. राजकीय स्वातंत्र्य आल्यानंतरही त्याला परिपूर्णता आणण्यासाठी आपल्याला संघटनेचाच आश्रय घ्यावा लागणार आहे. स्वातंत्र्य टिकविण्यासाठी संघटना अवश्य आहे. किसान-मजदूर राज्य प्रत्यक्ष अस्तित्वात येईपर्यंतच नव्हे तर आजचा वैयक्तिक दृष्टिकोण बदलून त्याऐवजी सामाजिक दृष्टिकोण प्रस्थापित होईपर्यंत संघटनेची आवश्यकता आहे. समाजातील प्रत्येक घटकाला नुसत्या सवलती मिळाल्याने काम भागणार नाही. त्याच्या विचारा-आचाराच्या संबंधीत क्रांती होणे अवश्य आहे. हे क्रांतीचे लोण इतक्या खोल व दूर न्यावयाचे आहे. त्यासाठी संघटनाच पाहिजे. पण याही पलिकडे संघटनेची गरज आहे. संघटनेखेरीज जीवनच अशक्य असल्यामुळे संघटना हा एक जीवनाचा महत्त्वाचा भाग होऊन बसला आह. म्हणून संघटना बलवान केली पाहिजे. येथे भाबडा आशावाद किंवा पूर्वग्रहदूषित निराशा यांना स्थान नाही.

## आझाद (?) हैद्राबाद

आंतरराष्ट्रीय परिस्थितीमुळे व घरच्या आर्थिक दाबामुळे इंग्रज साम्राज्य-शाही हिंदुस्थानातून जाऊ पाहात आहे; तर हैद्राबादेतील सत्ता आझा-दीच्या व निराळेपणाच्या बाता मारीत आहे, आणि त्या म्हणे इंग्रजांच्या

बळावर! पण हे शक्य कसे आहे? हैद्राबादेत प्रत्यक्षाप्रत्यक्ष इंग्रजी सत्ता राहणे याचा अर्थ हिंदी स्वातंत्र्य अर्थहीन बनविणे असाच होतो. अशा गोष्टीला कोण मान्यता देणार? हिंदुस्थानची फाळणी करणारी ही बाब ठरते. स्वतंत्र हिंदुस्थान ह्या गोष्टी सहन करू शकत नाही. इंग्रजांच्या गुलामगिरीत ज्यांना जादा व अन्याय्य सवलतींची चटक लागली आहे, त्यांचीच ही अशी मागणी असू शकते. हिंदुस्थानच्या व स्वतःच्या लोकशाही स्वातंत्र्याला धोक्यात आणणारी ही आझादी (?) हैद्राबादेतील लोक आता कदापि सहन करू शकत नाहीत. परवाच्या युद्धाने संस्थानातील मुसलमानांचाही भ्रम दूर केला आहे. काही मूठभर भोळ्या लोकांना त्या गुलामगिरीचा मोह सुटत नसेल हे निराळे! पण त्यांना उत्तेजन देणारांना आज हे स्पष्ट कळतच असले पाहिजे की, ही आपली ओरड अर्थहीन आहे. ती पुढे करणाऱ्यांचा हेतू अडवणुकीचे, धमकीचे, राजकारण खेळून अधिकात अधिक सवलती मिळविणे हाच असावा असा मला दाट संशय येतो. इंग्रजी सल्लागारांबरोबर जी आज धावपळ चाललेली दिसते तीवरून हाच संशय बळावतो. ब्रिटिश-मंत्रिमंडळाचे तडजोडीचे प्रयत्न हाणून पाडण्याचा डाव इंग्रजी नोकरशाही खेळत असल्याची दाट वदंता आहे. तिचे साहाय्य घेऊन हैद्राबादेतील नोकरशाही काही कारवाया करीत असणे अगदी संभवनीय आहे. अशा कारवायांमुळे आता कोणी फसू शकत नाही.

## सुधारणांचा डाव

'अगोदर अक्कल जाते व मग भांडवल जाते' अशी एक म्हण आहे. काळाचा ओघ ओळखून इंग्रज अक्कल शिकत असल्यासारखे दिसत आहेत पण त्यांची आजवर नक्कल करणारांना कायदेआझमची शक्कल लढविण्यात आपले हित वाटत आहे. सुधारणांची योजना वरवर बदलून ती अंमलात आणण्याचा प्रयत्न चालू आहे. राजशाहीचा धिक्कार यांवर ती आधारलेली आहे. सरंजामदार व इतर संबंधियांचे वर्चस्व कायम ठेवण्याची तीत योजना आहे. १२ टक्के मुसलमानांना कायदेमंडळापासून ते थेट ग्रामपंचायतीपर्यंत बहुसंख्य जागा देण्याची त्यात तरतूद आहे. स्वजातीयांची ४० टक्के मते मिळविण्याची अट ठेवून प्रत्यक्ष निराळ्या मतदार संघाच्या

परिणामाची सोय तीत केली आहे. एकूण सभासदांत नेमलेल्या सभासदांचेच संख्याधिक्य तीत आहे. कायदेमंडळाला काहीच अधिकार नाहीत. ते एक शिफारशीमंडळ आहे. अशा योजनेला जनतेची संमती मिळणे अशक्य आहे. ती अंमलात आणणारे हैद्राबाद, लोकशाही स्वतंत्र, हिंदुस्थानच्या चौकटीत बसू शकत नाही. 'तीत पुढे बदल करू' ही इंग्रजी चाल आहे. पण ती आता जुनी झाली आहे. ही सुधारणांची योजना म्हणजे, गेल्या ३०-४० वर्षांत सत्तेचा दुरुपयोग करून ज्या अन्याय्य गोष्टी जबरीने रूढ केल्या, त्यांना कायदेशीर स्वरूप देण्याचा एक भयंकर डाव होय. ही गोष्ट कळल्यानंतर जनता आपले हातपाय जाळ्यात अडकवून घेणे अशक्य आहे. ही योजना युद्धकालीन परिस्थितीचा फायदा घेऊन अमलात आणण्याचा अयशस्वी प्रयत्न सरकारने नॉमिनेशन्स द्वारे करून पाहिला आहे. आणि म्हणूनच आता त्यात बदल करण्याची- मूलभूत बदल करण्याची—भाषा वापरली जात आहे. एकदा या चक्रव्यूहात गेले की सरकारने घातलेली अन्याय्य वहिवाट कायदेशीरपणे रूढ होते व चौकशीचे निमित्त करून दिरंगाईच्या पाण्याने ती आणखी काही वर्षांत पक्की करता येते, हा यात हेतू आहे. पण आता हे डावपेच निरर्थक आहेत.

## पद्धतशीर बेबंदशाही

या सुधारणांचा हटवादी डाव, पद्धतशीर बेबंदशाहीच्या वास्तवतेवर खेळला जात आहे. तिचे स्वरूप भीषण व संतापजनक आहे. खेड्यापाड्यांतील बहुसंख्य लोक आपले जीवन-वित्त व आपली अब्रू सुरक्षित कशी राहील या अहर्निश काळजीत पिढ्यान्‌पिढ्या काळ कंठित आहेत. भोकरदन-पाथ्री भागातील भीषण हकीकती तर वृत्तपत्रातून आल्या आहेत. त्यांचे प्रत्यक्ष प्रमाण किती तरी पटीने अधिक असेल. लोकांच्या जीवन-वित्त-अब्रूवर हवे तेव्हा आक्रमण करणाऱ्या लोकांना सरकारची साथ आहे. त्यामागे निश्चित राजकारण आहे. काबुली, रोहिले, अरब वगैरे लोक आपली सावकारी कशी चालवितात याचे किमान चित्र मि. भरुचा यांनी आपल्या रिपोर्टात रेखाटले आहे. त्यावरून गरीब शेतकरी व मजूर या पठाणी सावकारांच्या दहशतीत कसा काळ कंठितो, ते कोर्टात सहसा कसे जात नाहीत इत्यादी बेबंदशाही निदर्शक गोष्टी तर

सिद्ध आहेतच. हा सारा प्रकार इ. स. १८८८ पासून रोहिल्यांचा कायदा असताना सरकारकडून त्यावर सक्तीने अमल केला गेला नाही व पुष्कळ काबुली, पठाण, रोहिले यांनी राजरोसपणे संस्थानात शिरकाव केला म्हणून घडलेला आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही की वरील रिपोर्ट १९३७ मध्ये प्रसिद्ध झाल्यानंतर सरकारने हे रोहिल्यावरील बंधन दुसऱ्याच वर्षी केवळ राजकीय हेतूसाठी केलेल्या पब्लिक-सेफ्टी ॲक्टाद्वारे रद्द केले. त्याच वर्षी (१९३८ मध्ये) सर अकबर हैदरी यांनी सरहद्द प्रांताचा दौरा करून हैद्राबादी-स्वर्गाची वर्णने पठाणांना ऐकविली. १९३८ साली हैद्राबादेत सत्याग्रह झाला होता ही गोष्ट विचारात घेऊन या घटनांची संगती लावली तर आपल्याला काय दिसते? सरकारने आता आता १०-५ लोकांना हद्दपार केले आहे व सावकारीपणाला मुल्कीपणाची अट लावली आहे. पण हा प्रकार, रात्री अंधारात मागच्या दाराने घुसून घर धुवून न्यावयाचे व सकाळी संभावितपणे समोरून समाचाराला येऊन साहाय्य करण्याचे सोंग आणावयाचे, असाच नाही काय? हा प्रश्न अर्थातच कोणत्याही जातीचा किंवा धर्माचा नसून वृत्तीचा आहे. या वृत्तीचे लोक इतर जातीतही आहेत. आमचा कटाक्ष वृत्तीवर आहे. त्याहून अधिक तिला उत्तेजन देण्यावर आहे.

या रोहिले प्रकरणामागे मोठा इतिहास आहे. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी एकदा हैद्राबाद सरकारला ब्रिटिश सैन्याची मदत मागावी लागली होती. ती नाकारण्यात आली. अरबांनी जिल्हेच्या जिल्हे ताब्यात ठेवल्याची उदाहरणे इतिहासात आहेत. सरकारने आपल्यापुरती व्यवस्था करून घेतली पण लोकांची दाद घेतली नाही, आणि आज तर वर सांगितल्याप्रमाणे या व्यवहाराला अवसर करून दिला आहे. बेबंदशाही याहून निराळी काय असते? जीविन, वित्त, अब्रू यांची सतत काळजी करणारे ते मध्ययुग याहून भिन्न कसे? सरकार ज्या गोष्टी निर्माण करते व कायम ठेवू इच्छिते, त्या दूर करण्यासाठी अज्ञानी प्रजेचे वैयक्तिक प्रयत्न यशस्वी होणे अशक्य आहे. भर बाजारातील आपल्या पेढीवर मार खाल्लेला व लूटमारीमुळे त्रस्त झालेला एक श्रीमंत मनुष्य वर्षापासून तालुका, जिल्हा व हैद्राबाद येथे आपली दाद लावून घेण्यासाठी अनेक अधिकाऱ्यांचे

उंबरठे झिजवून निराश व हताश झाल्याचे मला माहीत आहे. बीदर, गुलबर्गा यांसारखे व इतर वैयक्तिक अत्याचारांचे मधून मधून घडणारे प्रसंग जनतेत असुरक्षिततेची भावना तेवत ठेवण्याचे कार्यच करीत आलेले आहेत. कोहीर तालुक्यातील माचरटपल्ली गावी नुकताच असा अमानुष प्रकार घडला आहे. कसलेले युरोपियन अधिकारी असलेल्या पोलिस खात्याकडून ही परिस्थिती बदलली जात नाही याचा अर्थ, ती सहेतुक कायम ठेवण्याचे सरकारचे धोरण असले पाहिजे, याशिवाय तो निराळा करणे शक्य नाही, लोकांच्या गरजा ठरविण्याचा आमचा हक्क आहे, या सरकारच्या दाव्याचा अर्थ, वरील परिस्थिती कायम ठेवण्याचा हक्क कायदेशीर ठरविणे हाच करावा लागतो.

### हे म्हणे स्वातंत्र्य (?)

याच सरकारचे मंत्री, प्रचारक व साथीदार जगाला अगदी बेडरपणे असे सांगतात की आमच्या येथे इतर ठिकाणांसारखेच स्वातंत्र्य आहे. स्थानिक परिस्थितीप्रमाणे त्यात जो काही फरक केला असेल तो असेल. संस्थानात संघटनांचा कायदाच नाही असे सांगण्यात येते. याचा अर्थ संपूर्ण स्वातंत्र्य, बंधनाचा अभाव असा सरकारला अभिप्रेत आहे. इ. स. १९२० पासूनच्या पाव शतकात अखिल हैद्राबाद स्वरूपाची राजकीय संघटना निर्माण करण्याचे प्रयत्न सरकारने उधळले व तीन वेळा सत्याग्रह झाला तरी हैद्राबाद स्टेट काँग्रेस १९३८ पासून अद्याप बेकायदेशीरच आहे. या धादांत गोष्टींचा निष्कर्ष काय मग? संस्थानात बेबंदशाही नांदते हाच नाही का? सरकार मन-मानेल तसे वागते. स्पष्ट जातीय संस्था सरळ जगतात, वाढतात, जाति-धर्मरहित काम करणाऱ्या जातीय म्हणून बेकायदा ठरतात.

मुद्रण स्वातंत्र्याची कथा तशीच. तीस-चाळीस वर्षांपूर्वी सरकारने काही नियम- कायदा नव्हे- केलेले आहेत. सुधारणा मंत्र्यांनीच परवा स्पष्ट कबुली दिली की नियम व अंमल यात संबंधच उरलेला नाही. याचा इत्यर्थ काय? सरकार म्हणेल ती पूर्व. बेबंदशाही हा शब्द पुनःपुन्हा वापरण्याचा वीट येतो म्हणून त्याला काय नाव द्यावयाचे हे मी

तुमच्यावरच सोपवितो. एरव्ही, मराठी भाषा न येणाऱ्या उर्दू व तेलंगी पंडितांना मराठी वृत्तपत्रांचे परवाने देणे व अधिकारी असलेल्यांना ते नाकारणे सरकारला कसे शक्य झाले असते? मनाई असलेल्या वर्तमानपत्रांची नव्हे, तर परवानगी असलेल्या वृत्तपत्रांची यादी प्रसिद्ध करून नवीन निघणाऱ्यांवर परवानगी घेण्याची अट लावणारा शिरस्ता जगाच्या पाठीवर हैद्राबादशिवाय कोठे आढळतो काय?

सभास्वातंत्र्याची कुचेष्टा तर हरघडी चालू आहे. हजारो खेडी आज त्याच १५ दिवस अगोदर अर्ज देऊन परवानगी घेण्याच्या जुन्या नियमांखाली आहेत, बाहेरचा वक्ता असला की हाच नियम तालुक्याच्या व जिल्ह्याच्या गावांना लागू होतो. एरव्ही या गावांना पाच दिवस अगोदर सूचना देण्याची अट आहे. स्थानिक अधिकाऱ्यांना मनाई करण्याचे अमर्याद अधिकार देऊन ही सवलत देखील त्यांच्या मर्जीवर सोपविली आहे. एखाद्या सभेमुळे राजद्रोहात्मक परिणाम होण्याचा संभव असल्यास तिला मनाई करण्याचा अधिकार जिल्हा कलेक्टरांना दिला आहे. स्वातंत्र्याची टिंगल व न्यायाचा उपहास याहून अधिक करणे अशक्य आहे. याखेरीज अर्ज उशीरा पोचला, सभेच्या दिवशी यात्रा, उरूस, उत्सव आहे, सभेची जागा आहे इत्यादी अडवणुकीचे व्यावहारिक मार्ग तर नानाविध आहेत.

## नको ही राजवट

हैद्राबादेतील सर्वसामान्य नागरिक जीवन हे असे आहे. सरकारला व त्यांच्या साथीदारांना ते तसेच चालू ठेवण्यात धन्यता-भूषण वाटते. त्यात काही कमीपणा, दोष आहे हेच त्यांना कबूल नाही. पण जनतेला काय वाटत असेल? आपलेच नातेवाईक, इष्टमित्र शेजारच्या प्रांतांत-स्वायत्ततेचा- उपभोग घेत असल्याचे पाहून व आंध्र-महाराष्ट्र-कर्नाटक यांची भाषावार एकीकरणाची चळवळ वाढत अससेली पाहून, येथील लोकांना काय सध्याच्या राज्ययंत्राखालीच राहावे असे वाटत असेल? तोंड दाबून चाबकाचा मार देते व पुन्हा त्यावर मीठ टाकते अशी राजवट कायम रहावी अशी लोकांची इच्छा असणे कधीतरी संभवनीय आहे

काय? अशा स्थितीत, मराठवाडा हा महाराष्ट्राचा अविभाज्य भाग असल्यामुळे तो महाराष्ट्राबरोबरच असावा ही भावना, हा विचार उसळून वर येणे हे स्वाभाविक व न्याय्य आहे. तडजोडीच्या भारतीय धोरणाशी, ही स्वाभाविक प्रतिक्रिया मुळीच विरोधी नाही. गांधीजी म्हणतात "राजसत्तेचे घटनात्मक प्रतीक म्हणूनच फक्त राजेलोकांना आपल्या आज असलेल्या पदव्या कायम ठेवता येतील; कारण राजसत्तेचे अंतिम अधिष्ठान प्रजाच असावयास पाहिजे" हे मान्य न करणाऱ्या व याच्या सर्वस्वी उलट दुराग्रह धरणाऱ्या राजांना यापुढे अस्तित्व नाही असाच नाही का गांधीजींच्या सांगण्याचा भावार्थ? हैद्राबादेत नेमके हेच होत आहे. मग आम्ही कोणाचे काय होईल या चिंतेचा भार कशासाठी डोक्यावर वाहायचा—? भविष्य काळात काही होवो की न होवो, भाषा व संस्कृती सारखी असलेल्या विभागाच्या एकीकरणावर आधारलेली प्रांतिक पुनर्रचना केली जाणार याविषयी संशयच नाही. अशा प्रसंगी आम्ही आमच्या भावना, अपेक्षा उच्च स्वरात, निर्भयपणे व्यक्त करणे आमचे अत्यंत महत्त्वाचे कर्तव्य आहे वर निवेदन केलेल्या परिस्थितीत बहुसख्य जनतेच्या अंतःकरणातून एकच भावना, एकच विचार व्यक्त होण्यासाठी धडपडत असल्याचे मला स्पष्ट दिसत आहे. तो म्हणजे "नको ही राजवट".

## महाराष्ट्राचा मराठवाडा

मराठवाडा हा महाराष्ट्राबरोबर जाण्या-राहण्याची अधिक बलवत्तर, प्रभावी व नैसर्गिक कारणे आहेत. परकीय जुलमी राजवटीला दंडुके-शाहीच्या बळावर स्वार्थासाठी अनेक कृत्रिम व अनैसर्गिक गोष्टी करणे हिताचे वाटले म्हणून तिने त्या तशा केल्या आहेत. पैकी आंध्र-महाराष्ट्र-कर्नाटक यांचे विषम तुकडे जोडून इंग्रजांनी उभा केलेला हा किल्ला होय. त्यामुळे तेथील जनतेच्या संघटनांना सरकार अडथळा करू शकले. असंघटित जनता दाबणे सोपे असते. तिच्या विकासाच्या मार्गात अनेक अडचणी येतात व सहज आणता येतात. भाषा-संस्कृती यांच्या भिन्नत्वा-मुळे या भिन्न-भागात आपलेपणाचे संबंध सहज वाढू शकत नाहीत. एक प्रकारची निराळेपणाची भावना असते. अशी ही सांस्कृतिक, शैक्षणिक, भाविक इत्यादी विकासाला थांबणावरी, त्याच्या मार्गात अडथळे निर्माण

करणारी बाब इंग्रजी राजवटीत मुद्दाम कायम ठेवली गेली. इतर प्रांतिक रचनेत इंग्रजांनी हा असाच गोंधळ करून ठेवला. म्हणूनच भाषा व संस्कृतीनुसार प्रांतांची पुनर्रचना करण्याचा प्रश्न प्रामुख्याने स्वतंत्र हिंदुस्थान आधीच हाताळणार आहे. त्या दिशेने लोकांची चळवळ ठिकठिकाणी सुरू झाली आहे. याबाबीत दुमत असण्यांचे कारण नाही. ते तसे नाहीही. म्हणून तो फार लवकर सोडविला जाऊ शकेल. ही योजना अमलात येईल तेव्हा मराठवाडा हा महाराष्ट्रात गेला पाहिजे हे अगदी सरळ आहे. भाषा, संस्कृती इत्यादी दृष्टींनी मराठवाड्यातलि लोकांची महाराष्ट्राकडे नैसर्गिक ओढ असणारच. महाराष्ट्रातील लोकही आपल्या संस्कृतीचे एकेकाळी असलेले हे केंद्र दूर ठेवू इच्छिणे, त्याला विकृती येत असता दुर्लक्ष करणे शक्य नाही. इतिहास-भाषा-संस्कृतीची बंधने ही अधिक बलवत्तर, प्रभावी व नैसर्गिक असतात. आजदेखील आपले अनेकविध संबंध, जेवढे महाराष्ट्राशी आहेत तेवढे आंध्र-कर्नाटकाशी नाहीत. आणि त्यादृष्टीने मराठवाडा हा महाराष्ट्रातच समाविष्ट होणार, झाला पाहिजे. त्याचा अभ्युदय त्यातच आहे; त्याशिवाय नाही. आपण सर्वजण या बाबतीत माझ्याशी सहमत असाल याविषयी मला संशयच नाही. ही गोष्ट आपल्याला अत्यंत प्रिय व हितकर असून, सर्व बाजूंनी विचार केल्यानंतर नैसर्गिक व अपरिहार्य दिसत असून व भारतीय राजकारणांशी विसंगत तर नाहीच पण सुसंगत असून आणखी काही थोडासा काळ थांबणे, वाट पाहणे आपणांस योग्य वाटत असेल तर तो आपला व्यावहारिक अधिकारस्वातंत्र्याचा प्रश्न आहे.

## अन्न-प्रश्नाचे भीषण स्वरूप

राज्यकारभाराच्या मुळातील कीड त्याच्या सर्व पानां-फुलां-फळांतून दिसावी यात आश्चर्य नाही. कोणतीही बाब तुम्ही घ्या. मग ती हंगामी असो की कायमची. आज अन्न प्रश्न घ्या. त्याने केवढे भीषण स्वरूप धारण केले आहे! अगदी आरंभापासून हा प्रश्न काळजीपूर्वक हाताळला गेला असता तर मराठवाड्याच्या हद्दीपर्यंत तो इतका जाचक झाला नसता व बाहेरच्या लोकांना आम्ही अधिक साहाय्य करू शकलो असतो. पण बेजबाबदार नोकरशाहीला एवढा दूरचा विचार करण्याचे सुचणार-परवडणार

कोठून ? युद्धकाल म्हणजे पर्वणी वाटली. सारे सगे-सोयरे गोळा करण्यात आले. दिवाळी अनुभवली. काहींनी आयुष्याचा रंग बदलून टाकला. साहजिकच इतरत्र शिमगा सुरू झाला.

सरकारला- निदान वरिष्ठ सरकारला- आपल्या राज्य यंत्राची अचूक कल्पना आहे. असे असताही, नियम करताना त्यांनी विशेष दक्षता घेण्याऐवजी त्यात शिथिलता ठेवली नेहमीप्रमाणे. काही ढोबळ दोष दुराग्रह-पूर्वक कायम ठेवले. महाराष्ट्र परिषदेने अगदी आरंभापासून सरकारच्या हे निदर्शनास आणून दिले की तुमच्या योजनेत गरीब लुटला जाण्याची व श्रीमंत निसटण्याची शक्यता आहे. सरकारने त्यात बदल केला नाही तो नाहीच. लेव्ही घेताना ती चांगल्या जमिनीवर व मोठ्या जमीनदारावर अधिक घेतली जाईल, गरिबांवर जोर जुलूम होण्यास अवसर मिळणार नाही, काळाबाजार निर्माण होण्यास कमी अवसर मिळेल अशा अनेक गोष्टी परिषदेने सुचविल्या. सरकारशी सहकार्य करण्याची इच्छा आपण होऊन व्यक्त केली पण त्याचा काहीच उपयोग झाला नाही. लेव्ही प्रमाणबद्ध घेतली नाही. शेतकऱ्याला किमान धान्य सोडण्याचा स्पष्ट आदेश दिला नाही. नोकर– सहकारी घेतले ते निवडून स्वजातीय. स्वजातीय दोन्ही अर्थाने. लोकांवर अनन्वित जुलूम-अन्याय व्हावा, लोकांचा अविश्वास अधिक वाढावा, त्यांच्या भीतीत भर पडावी. या परिस्थितीचा पाशवीवृत्तीने पूर्ण फायदा घ्यावा हे त्यानंतर कसे टाळणार ? त्यात दुष्काळ व टंचाई दत्त म्हणून पुढे ठाकली. तरीही सरकारने आपले घोडे भरधाव हाकण्याचे कमी केले नाही. या परिस्थितीचा परिणाम जनतेवर व्हावा हे साहजिक आहे. घरात धान्य नसताना अथवा अपुरे असताना तुम्ही धान्य मागणार, घराच्या झडत्या घेऊन बेअब्रू करणार, सामान-सुमान लिलाव करणार, धान्याऐवजी पैसे घेणार, धान्य विकत घेऊन लेव्ही द्यावयास भाग पाडणार आणि लोकांनी अगदी निमूटपणे हे सहन करावे म्हणणार ! खासा न्याय. आणेवारी बरोबर लावण्यासाठी पैसे द्या, लेव्ही घेऊन गोदामावर तिष्ठत बसा, पुन्हा वजनाचा-भावाचा घोटाळा आहेच. शेवटी पैसा नगदी नाहीच. त्याच्या वसुलीसाठी पुन्हा पैरवी व चिरीमिरी हवीच. धान्य गोळा करून ते नीट सांभाळण्याची तरी

अक्कल ! हजारो पल्ले घुशी-म्हशींनी-किड्यांनी खाल्ले, पाण्याने सडले. सरकारने त्यावर नफा मिळविला. का? तर म्हणे रसदच्या सैन्याच्या खर्चासाठी ! लोकांना धान्य मिळण्याची सोय नाही. सोय आहे तेथे धान्य नाही. असेल तेथे गरिबांना मिळत नाही. मिळालेच तर जनावर खाणार नाही असे सडलेले ! रय्यतचे संपादक व आंध्रपरिषदेचे अध्यक्ष श्री. नरसिंगराव यांनी सुभेदारसाहेबांच्या बरोबर केलेल्या दौऱ्यात आढळलेले विकल्या जाणाऱ्या धान्याचे नमुने मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले आहेत. खेडीपाडी वर्षानुवर्षे अंधारात आहेत. त्यांना साखर तर दिसतच नाही. अशा परिस्थितीत सरकार जागेवर लोकांनी ठेवले हेच आश्चर्य ! गरीब बिचारे लोक ! अर्ज घेऊन गेले, मोर्चा नेला, सभेत बोलले तर लागलीच अधिकाऱ्यांची मर्जी जाते. मांजर नेहमीच चार पायांवर पडते. अधिकारी कधीच चुकत नसतात. त्यांच्या अनागोंदी व्यवहाराचाही प्रत्यक्ष परिणाम ! पण ते चटकन घालतील परिषदेच्या डोक्यावर. आपला सारा काळा बाजार लपविण्याची ही नामी संधी व त्याच्या मार्गातील अडथळे दूर करण्याची ही पर्वणी, हातची गमावण्याइतके ते काही कमी हुशार नाहीत. इंग्रज सरकार तिकडे याद्या करून ठेवीत असल्याचे कळल्यावर परिषदेच्या कार्यकर्त्यांच्या फायली रंगाव्या, त्याचा प्रचार वर्तमानपत्रातून केला जावा यात आश्चर्य नाही. कम्युनिझमशी तोंडओळख नसताना सरकारने मला Determined Communist of dangerous Type ठरवून बावीस महिने जेलमध्ये नजरबंद करून ठेवले होते हे मी विसरू म्हटले तरी कसे शक्य आहे ? गेल्या काही दिवसांपासून सरकारने, एकीकडे परिषदेच्या काही कार्यकर्त्यांना अन्न-कमिट्यांवर घेऊन दुसरीकडे परिषदेविरुद्ध जाहिरातवजा प्रचार चालविला आहे. जनता-संघटनाविरुद्ध केलेला दुटप्पी धोरणाचा आरोप वस्तुतः लागू होतो सरकारच्या धोरणालाच. लाचलुचपतीला आळा घालण्याची योजना परिषदेने गतवर्षी सुचविली होती. सरकारची योजना परिणामकारक होऊ शकत नाही. त्याही बाबतीत सरकारने परिषदेचे सहकार्य घेतलेले नाही. अशा या प्रचारामागे राजकीय संघटनांवर हात टाकण्याचा राजकीय हेतू प्रामुख्याने असावा असा दाट संशय येतो.

## लोकांचे प्राण वाचवा

लोकांनी गरजेपुरते धान्य ठेवून मगच सरकारला ते द्यावे, धान्य नसेल तर त्याची सतत व एकजुटीने मागणी करावी इत्यादींबाबत परिषदेने वेळोवेळी सूचना दिल्या आहेतच. त्या व वरील सर्व गोष्टी योग्य आणि खऱ्या असूनसुद्धा लोकांनी मी आरंभी सांगितलेली भयानक अन्न परिस्थिती सतत समोर बाळगून वागले पाहिजे. सरकारचे काय? ते आज आहे आणि उद्या जाईल. आपण येथेच राहाणार आहो. आपल्याला राज्यकारभार हाती घ्यावयाचा आहे. जबाबदारी ओळखून वागण्याची, शिस्त साभाळण्याची आम्हांला आवश्यकता आहे. शेजारी लोक उपाशी मरत असताना आम्ही जादा धान्य लपविणे, न देणे हे पाप आहे– राष्ट्रीय पाप आहे, ही अमानुषता आहे, ती क्रूरता आहे. म्हणून स्वतःची अत्यंत निकडीची गरज भागल्यानंतर उरलेले धान्य देण्यास लोकांनी कसलाही संकोच करता कामा नये. अन्यायाबद्दल जरूर भांडावे पण त्याबरोबरच आपली कर्तव्ये चोखपणे बजावलीच पाहिजेत. साठे ठेवण्याचा व अधिक पैसे कमावण्याचा मोह लोकांना होऊ न दिला पाहिजे. सध्याच्या राजवटीत अधिकाऱ्याचे तोंड बंद केले की सारा त्रास कमी होऊन उलट फायदा होतो हे खरे; पण त्याचा परिणाम तुमचे लोक मरण्यात होणार आहे हे विसरून चालणार नाही. होणारा त्रास टळावा, कमी व्हावा यासाठी जरूर प्रयत्न करावे पण त्यात यश येत नाही म्हणून वाम मार्ग स्वीकारणे धोक्याचे आहे. त्यामुळे अधिकाऱ्यांची दहशत नेहमी राहते, मनाची सतत टोचणी लागते आणि अमानुषता पदरी येते. परिस्थितीची तीव्रता ओळखून आपण सर्वजण न्यायाने सरळ वागाल, इतरांना तसे वागण्यास सांगाल अशी मी आशा करतो.

## शिक्षणातही राजकारण

अन्नानंतर शिक्षणाचा प्रश्न घ्या. आजच्या बुद्धिप्रधान युगात त्याचे केवढे महत्त्व! पण हैद्राबादच्या राजवटीत त्याची कोण केविलवाणी स्थिती! एखाद्या विद्वान पंडिताला स्वैपाकी-पाणेरी बनवावे तसे शाळा खात्याला हैद्राबादेत राजकारणाचे प्रचारक बनविले गेले आहे. प्रत्येक प्राथमिक शाळेतून उर्दू व मराठी भाषेतून शिक्षणाची सोय असलीच

पाहिजे हा सरकारचा अलिखित नियम आहे. असे का ? तर म्हणे समानतेसाठी. पुढे पाचव्या इयत्तेपासून उर्दूच माध्यम. म्हणून मराठी दुसरीपासूनच ते आवश्यक. असे का ? तर ती राजभाषा म्हणून. उर्दू मातृभाषा असणारांचे व इतरांचे लोक-संख्येतील प्रमाण अनुक्रमे १२ व ८५ आहे हे आपण जाणताच. हैद्राबादच्या राजकीय-सुधारणा-योजनेतील कागदी समानता व प्रत्यक्ष वर्चस्व, शाळाखात्यात कित्येक वर्षांपूर्वीपासून सरकारने वरीलप्रमाणे रूढ करून ठेवले आहे. सरकार याला राजकारण समजत नाही. ते याला दाक्षिणी संस्कृती हे नाव देते. हा अर्थातच अपघात नाही. खर्च खूप दिसावा, पण शिक्षणप्रसार कमी व्हावा व जो होईल त्यामुळे समाजात विषमता वाढावी या हेतूने तयार केलेली ती योजना आहे. अगदी शाळा खात्याच्या आरंभापासून सर सालारजंग यांनी एक पर्शियन व एक मराठी शाळा प्रत्येक तालुक्याच्या गावी सुरू केली. सर साहेबांचा व इंग्रजांचा कसा संबंध होता हे सांगण्याचे कारण नाही. जनरल बेरूंच्या शिफारशीने हैद्राबादत आलेल्या नबाब इमादुलमुल्क यांनी पौर्वात्य परीक्षा सुरू करून तिला पाणी घातले. पौर्वात्य-परीक्षा म्हणजे मुन्शी-मौलवींच्या परीक्षा, बरे ! नाही तर काही निराळे समजाल ? पुढे लाडक्यांची केलेली खास सोय पुरेशी वाटली नाही. मग सर सय्यद यांच्या नातवाला निमंत्रिले. मि. मेह्यूनी योजना तयार ठेवली होतीच. सर्वांच्या डोक्यावर उर्दू लादले माध्यम म्हणून. इतर सारी दारे बंद केली गेली. भावनांच्या संघर्षाला मैदान खुले केले गेले. हा सारा पाताळयंत्री व्यवहार; काल व व्यक्तीच्या प्रकाशात पाहून परिणामाशी पडताळला म्हणजेच मातृभाषा माध्यमाचे जगन्मान्य तत्त्व, निदान सर्व दुय्यम शिक्षणापुरतेही सरकार इतर भाषांना का लागू करू इच्छित नाही, उर्दूचाच दुराग्रह का धरते याचे कारण लक्षात येते. सध्याच्या राजवटीत हे क्रूर धोरण सहज बदलेल अशी मला आशा वाटत नाही. फारच दाब आला तर प्रथम व्याख्यान झोडतील गोड गोड, पण करतील तेच पूर्वीचे. त्याहून अधिक दाब आला तर समोरून अर्धवट काही देतील व मागच्या दाराने ते निष्परिणामी होईल अशी व्यवस्था करतील. मुलींच्या बाबतीतला रोकडा अनुभव आहेच की ! राजकीय संघटना स्थापन

करण्याचा हक्क मिळाला सत्याग्रहानंतर. शैक्षणिक धोरणातही सहज बदल होईल अशी निदान राजकीय संस्थांनी अपेक्षा बाळगणे चूक आहे. .

## हैद्राबादी संघटना

मित्रहो ! नमुना म्हणून पाच चार गोष्टी मी आपणापुढे ठेवल्या. जीर्ण झालेल्या हैद्राबादेत प्रत्येक अवयव हा असाच विकारी झालेला आपल्याला आढळेल. काही प्रश्न विशेष आहेत. उदाहरणार्थ, जहागिरी-जातीयता. ४२ टक्के भूभाग या सरंजामशाहीने व्यापला आहे. ही मोगलाईतील मोगलाई किती भीषण असेल याची कल्पनाच केलेली बरी. संस्थानातील जातीयता ही या सरंजामशाहीसारखीच भयानक आहे. १० टक्के इतकी अल्पसंख्या असताना ज्या जातीला सरकार कायदेशीर वर्चस्व देते तिच्या भावना-अपेक्षादी गोष्टी अतिरेकी व आक्रमक बनल्यास त्यात नवल कसले ? या परिस्थितीच्या स्वाभाविक प्रतिक्रियेची जबाबदारी बाहेरच्या लोकांवर टाकणे हे निव्वळ राजकारण आहे. त्यानिमित्ताने प्रतिक्रियेलाच फक्त आवरण्याचा-दाबण्याचा प्रयत्न करणे ही शुद्ध क्रूरता आहे. या साऱ्या परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी बलवान संघटना हा एकच मार्ग आहे. आपल्याला आपली महाराष्ट्रातील संघटना तर सबल बनविलीच पाहिजे; पण सध्याचे गुलामगिरीचे जू भिरकावण्यासाठी आपल्याला अखिल हैद्राबाद स्वरूपाची संघटना तांतडीने निर्मिली पाहिजे. त्या बाबतीत आपण बराच मार्ग आक्रमण केला आहे. अगोदरच वेळ फार झाला आहे. विलंब घातक ठरणार आहे, म्हणून आपण त्या बाबतीत स्थायी समितीला अंतिम निर्णयाचे अधिकार देणे जरूर आहे.

## संस्थानी प्रजापरिषद

संघटनेच्या दृष्टीने दुसरा महत्त्वाचा प्रश्न आपणांपुढे आहे; तो अखिल भारतीय संस्थांनी प्रजापरिषदेशी संलग्न होण्याचा. आपला दृष्टिकोण संयुक्त स्वतंत्र हिंदुस्थानचे स्वायत्त व अवयवी घटक असल्यामुळे भारतीय जनता-संघटनांशी आपल्याला संलग्न होणे जरूरच आहे. हिंदी राजशाहीला परिणामकारक विरोध करणे हा त्यातील मुख्य उद्देश आहे. तेव्हा आपण भारतीय संस्थानी प्रजा परिषदेचे घटक तर बनले पाहिजेच.

त्या बाबतीत एक घटनात्मक व दुसरी कम्युनिस्टांबाबत अशा अडचणी निर्माण झालेल्या आहेत. अ. भा. सं. प्रजापरिषदेच्या घटनेतील तिसऱ्या कलमाने आमचे अंतर्गत व्यवहारही तिच्या नियंत्रणाखाली येतात. प्रजा-परिषदेची रचना विचारात घेता ती संयुक्त संघटनाच असू शकते हे उघड आहे. तेव्हा घटकांना अंतर्गत स्वातंत्र्य हे असावयास पाहिजे. ते तिच्या घटनेत आज नाही. दुसरी अडचण ही की भारतीय काँग्रेसने जो कम्युनिस्टांविरुद्ध निर्णय घेऊन त्यांना संघटनेतील पदाधिकारांवरून काढले, तसाच ठराव संस्थानी प्रजापरिषदेने केला आहे. आपण तिच्याशी संलग्न व्हावयाचे म्हणजे त्या ठरावाचा अमल आपणांवर बंधनकारक होणार. आपल्या संघटनेत कम्युनिस्ट आहेत, व आपले आजवरचे धोरण एकत्र काम करण्याचे राहिले आहे. अशा स्थितीत काय करावे हा प्रश्न आहे. या दोन्ही बाबतीत भारतीय संस्थानी परिषदेपुढे आपण आपली कैफियत मांडून येथील परिस्थितीत सर्व पुरोगामी विचारांच्या लोकांनी एकत्र राहण्याची गरज कशी आहे हे पटवून दिल्यास या अडचणीतून काही मार्ग ते काढून देतील असा मला विश्वास वाटतो. अर्थात त्याचे यश आमच्या होणाऱ्या प्रयत्नांवर बरेच अवलंबून असणार हे उघड आहे. कम्युनिस्टांनी जनता संघटनेविषयी प्रथम निष्ठा बाळगण्याचे व शिस्तीचे बंधन पाळण्याचे स्पष्ट शब्दात मान्य केल्यास हा प्रयत्न अयशस्वी होण्याचे काही कारण आहे असे मला वाटत नाही.

## संघटनात्मक विचार

आपल्या जनसंघटनेच्या वाढीच्या दृष्टीने आपल्याला मजूर, महिला, विद्यार्थी, विणकर इत्यादी सहकारी संस्थांकडे विशेष लक्ष पुरवावयास पाहिजे. या संस्था, साहाय्यक-संस्था असल्यामुळे त्यांना आपण आपुलकीने शक्य ती मदत करणे जरूरच आहे. आपल्या कार्यक्रमात अद्याप यावा तसा भरीवपणा व जोम येत नाही. त्यासाठी कार्यक्रम ठरविताना काही किमान आवश्यक बाबी निश्चित करून त्यावर सर्व ठिकाणी शक्ती केंद्रित केली गेली पाहिजे. या किमान आवश्यक बाबी अर्थातच वेळप्रसंग पाहून निवडल्या जातील. असे झाले तरच आपल्या कार्यक्रमाला ठसठशीतपणा व परिणामकारकता प्राप्त होईल. ठिकठिकाणी भिन्नभिन्न गोष्टी हाताळल्या

गेल्यास त्यात परिणामकारकता येऊ शकत नाही; व शक्तीचा निरर्थक अपव्यय होतो. संघटनेचे बल अशा संघटित कार्यक्रमावरच असते.

आपल्या संघटनेचा व्याप सारखा वाढत आहे. वरच्या दर्जाची अनेक नवीनवी माणसे तिला येऊन मिळाल्याशिवाय हा व्याप सांभाळला जाणे अशक्य आहे. मध्यवर्ती कार्यालयात कार्यकर्ते, विद्यार्थी, शेतकरी, मजूर, हरिजन, महिला, प्रकाशन व प्रचार या महत्त्वाच्या बाबी जबाबदारीने सांभाळणारी माणसे घेतली जाणे जरूर आहे. त्याशिवाय कारकून, टकलेखक व इतर साधने हवीत. प्रत्येक तालुक्याला दोन दोन संघटक देऊन त्यांनी दहा दहा गावांच्या गटांवर लक्ष केंद्रित करावे. इतर कामे सवडीने काम करणारांवर सोपविली पाहिजेत. संघटनेत व्यापकता भरपूर आली आहे व ती आपोआप वाढत जाणार आहे. आता सखोलता निर्माण करण्याकडे लक्ष दिले पाहिजे. कार्यकर्त्यांच्या वाढीसाठी विशेष प्रयत्न संघटनेने व त्यांनी स्वतः केले पाहिजेत. त्यांच्यावरच सारी संघटनेची दारमदार आहे. त्यांच्या दिनचर्येत समतोलपणा पाहिजे. अभ्यासासाठी-स्वतःच्या वाढीसाढी त्यात अवसर असलाच पाहिजे. प्रत्येक गावी नियमितपणे-निश्चितपणे वेळ देऊ शकणारांची ठिकठिकाणी फार उणीव आहे. ती दूर झाल्याशिवाय कामाची गती वाढणार नाही.

## तरुणांना निमंत्रण

आणखी अनेक गोष्टी सांगता येतील, पण गोष्टी सांगणे हा हेतू नाही. त्याप्रमाणे काम करावयाचे आहे. वरील थोड्याशा गोष्टी करावयाच्या झाल्या तरी त्यासाठी निष्ठेने काम करणारे बुद्धिमान तरुण व बराचसा पैसा पाहिजे. आपल्या येथे अनेक बुद्धिमान व तडफदार तरुण आहेत. त्यांची तात्त्विक मते व भविष्याविषयीच्या कल्पना काही असल्या तरी संघटनेविषयी निष्ठा व तिची शिस्त पाळण्याच्या तयारीने त्यांनी संघटनेत यावे; काम करावे, असे मी त्यांना आग्रहपूर्वक निमंत्रण देतो. जीवनाकडे खेळाडूवृत्तीने पाहणे जरूर आहे. केवळ माझ्या विचारसरणीप्रमाणे काम होत असेल तरच आम्ही काम करू नाहीतर सवतासुभा निर्माण करू किंवा निराळे राहू, ही विचारसरणी आज हैद्राराबादेतील जनता-जीवन काळाच्या वेगाने जाण्यास अडथळा करीत आहे. लोकशाही

स्वातंत्र्य संपादन करणे हे आज आपणां सर्वांचे ध्येय आहे. त्याच्याशिवाय जनतेचे प्रश्न सुटू शकत नाहीत. यासंबंधी मला वाटते मतभेद नाहीत. जनसंघटना वाढविणे, बलवान करणे, हाच त्याचा मार्ग आहे, याविषयीही दुमत असू शकत नाही. या स्थितीत लोकशाही पद्धतीने आम्ही एकत्र कार्य करणे का अशक्य व्हावे हे मला कळत नाही. आपल्या मतांचा अभिमान बाळगावा, ती लोकांना पटविण्याचा प्रयत्न करावा, पण तो जनता-संघटना बलवान राहील, वाढेल या मर्यादेतच. मी कोणच्याही विशिष्ट तत्त्वज्ञानाचा किंवा पार्टीचा अनुयायी नाही, आणि म्हणून मी तरुणांना संघटनेत येण्याची, तिला आपली समजून बलवान करण्याची पुन्हा एकवेळ आग्रहाची विनंती करतो.

## हीच वेळ आहे

वर जे मी संघटनेच्या गरजांचे संक्षिप्त चित्र रेखाटले आहे ते वास्तवतेत आणण्यासाठी पैशाची फार मोठ्या प्रमाणात गरज आहे. गेल्या तीन वर्षात संघटनेला वाढते साह्य मिळाले आहे. पण आपली संघटना आजच्या परिस्थितीचा पूर्ण फायदा करून घेण्यास समर्थ होण्याच्या दृष्टीने ते फारच अपुरे होते. काळ झपाट्याने बदलत आहे. हीच वेळ आहे. आम्ही आमचा वेग वाढविला पाहिजे. आपल्याजवळ जादा पैसा असणा-रांनी तो आजच्या प्रसंगी आपण होऊन संघटनेच्या वाढीसाठी देण्यास तयार झाले पाहिजे. राष्ट्राची गरज अर्थातच मोठी आहे. माझ्या थोड्याशा पैशाने काय होणार असे म्हणणे चूक आहे. थेंबाथेंबाने तळे साचू शकते. प्रत्येकाने आपल्या त्यागाची पराकाष्ठा आपण होऊन केली तर संघटनेला पैशाची उणीव भासणार नाही. दुसऱ्याने काय केले हा विचार गौण आहे; आणि अनुकरण वाईटाचे करणे हे तर चूकच आहे. संघटनेच्या हाकेला जनता-गरीब-श्रीमंत सर्वजण-आपल्या ऐपतीप्रमाणे ओ देतील असा मी विश्वास बाळगतो.

## किसान-मजूर राज्य

संघटनेच्या संबंधात आणखी बऱ्याच गोष्टींचा विचार आपणांस करावा लागेल. वेळेचा विचारही त्याबरोबर सोडता येत नाही. फक्त एका

महत्त्वाच्या गोष्टीकडे मी आपले लक्ष वेधवू इच्छितो. ती म्हणजे शेतकऱ्यांचे संघटनेतील स्थान, त्यांची आजची परिस्थिती व तिच्यात घडवून आणावयाच्या निश्चित परिवर्तनाची दिशा, ही होय. जनता संघटनेत-म्हणजेच महाराष्ट्र परिषदेत-शेतकऱ्यांचे स्थान हे अतुल आहे. महात्माजींनी आमच्या भावी स्वराज्याचे वर्णन ' किसान-मजदूर-प्रजा-राज्य ' असे जे यथार्थतेने केले ते आपण ऐकलेच असेल. केवळ महात्माजी म्हणतात म्हणून आपण ते मान्य केलेले नाही. लोकशाहीची स्थापना-धारणा ही बहुसंख्य शेतकऱ्यांच्या व मजुरांच्या साहाय्या-सहकार्याशिवाय अशक्य आहे. अशा स्थितीत त्यांना आजच्या संघटनेत व उद्याच्या राज्यकारभारात वाढता-चढता मान मिळणे हे स्वाभाविक आहे. मराठवाड्यातील जनतेची सर्वांगीण उन्नती म्हणजे विशेषतः शेतकरी कामकऱ्यांची उन्नती असे जे स्पष्ट ध्येय आपण आपल्यापुढे ठेवले आहे, त्याचा अगदी सरळ अर्थ हाच आहे की, मराठवाड्यातील जनतेत बहुसंख्या ही शेतकरी-कामकरी यांची असल्यामुळे त्यांची उन्नती हीच जनतेची उन्नती होय. शेतकरी-कामकरी दारिद्र्यात, दुःखात, अज्ञानात आहे तोपर्यंत सर्व समाज दरिद्री, दुःखी व अज्ञानी असेच म्हणणे भाग आहे.

शेकडो वर्षे हे असंख्य लोक हे असेच राहिले तेव्हा आताच त्यांना एवढे महत्त्व कशासाठी असे काही लोकांना वाटते. त्यांनाच काय पण असंख्य शेतकऱ्यांनाही ते खरे वाटत नसेल. कालाचे स्वरूप बदलले आहे. याची त्यांना खात्री पटली नाही किंवा स्पष्ट कल्पना आलेली नाही. म्हणूनच त्यांना असे वाटते. आजच्या काळाची कल्पना ज्यांना स्पष्टपणे आलेली आहे त्यांना एका माणसाने, गटाने किंवा वर्गाने राज्य करण्याचे, समाजावर सत्ता गाजविण्याचे दिवस फार मागे पडले व आता लोकशाही हाच युगधर्म आहे ही गोष्ट स्वच्छ दिसते. लोकशाहीचा अभाव हेच आमच्या सर्व दुःखांचे मूळ आहे. यांत्रिक संशोधनामुळे जगाचे व त्याच्या व्यवहार पद्धतीचे स्वरूप पार बदलून गेले आहे. साहजिकच राज्यकारभाराच्या पद्धतीत बदल होऊन तो आता लोकांच्या म्हणजेच शेतकरी-कामकरी यांच्या हितासाठी व त्यांनी स्वतः तो चालविला पाहिजे.

मी म्हणतो याचा प्रत्यक्ष पडताळा पाहण्याची कोणाची इच्छा असल्यास त्याने या आपल्या जिल्ह्याची हद्द ओलांडून पलीकडे चालू असलेल्या लोकशाहीचा कारभार प्रत्यक्ष पाहावा. एक महिन्यापूर्वीच तेथे निवडणुका झाल्या. शेतकऱ्यांनी-मजुरांनी व इतरांनी मिळून निवडून दिलेल्या लोकांचे सरकार तेथे काम करू लागले आहे. असे सरकार लोकांच्या हुकमतीत वागणारे असते. लोकांच्या सुख-दुःखांची त्याला काळजी घ्यावी लागते.

. . .

शेजारच्या सोलापूर—नगरादि जिल्ह्यांतून जी लोकशाही आली ती अर्थातच शेतकऱ्यांनी-कामकऱ्यांनी कॉंग्रेसच्या झेंड्याखाली आपले संघटन केले, लढे दिले म्हणून. ती काही कोणी बक्षीस दिलेली नाही. शेतकऱ्यांची ती कमाई आहे. आज तिच्यात पुष्कळच दोष आहेत हे खरे. पण ते हळूहळू दूर होतील. अर्थातच त्यासाठीही शेतकऱ्यांना-मजुरांना जागरुकपणे प्रयत्न करावे लागतीलच. आमच्या येथील शेतकरी-कामकरी महाराष्ट्र परिषदेच्या झेंड्याखाली हळूहळू जमा होऊ लागला आहे. त्याचा हा वाढता पाठिंबा हेच परिषदेचे खरे बळ आहे. सारा शेतकरी-कामकरी परिषदेच्या मागे उभा राहिल्यानंतर त्याची सर्व दुःखे हरण करणारी लोकशाही ही मूर्तीमंत अवतरल्याशिवाय राहू शकत नाही. या लोकशाहीत शेतकरी-कामकऱ्यांना मेहनत करून भरपूर उत्पन्न मिळेल, कर्ज काढावे लागणार नाही, तुमचे असलेले सारे कर्ज सरकार देऊन टाकील, रोहिले-अरब किंवा इतर सावकारांचे तुम्हांला कामच पडणार नाही; मेहनतीसाठी जमीन मिळेल, कारखाने उघडतील, तुमच्या गावातून पाण्याची, शिक्षणाची, औषधांची इत्यादी सोयी तुमचे सरकार करील. अधिकारी तुम्हांला सरकार समजून वागतील. असे सरकार लवकर येण्यासाठी तुम्ही सर्वांनी परिषदेच्या झेंड्याखाली समजून-उमजून एकत्र होण्याचाच काय तो अवधी आहे. ते तुमचीच वाट पाहात असलेले मला दिसत आहे. परिषद ही तुमची आहे, तुमच्यासाठी आहे. तुमचे आजचे दारिद्र्य, तुमचे अज्ञान, तुमचा कर्जबाजारीपणा, तुमच्याभोवती गराडा घालून असलेली भीती इत्यादी दुःखे दूर होऊन तुम्ही राज्याचे खरे मालक-सिंहासनाधिष्ठित-व्हावे हीच तिची उत्कट इच्छा आहे.

# निजाम सरकारची ही तयारी कशासाठी?

## तो सावध, हे गाफील

हैद्राबाद अद्याप हिंदी संघराज्यात दाखल झाले नाही. त्याला दिलेली खास मुदत १५ ऑक्टोबर ४७ ला संपली. पण तडजोडीची बोलणी अद्याप चालूच आहेत. त्यांचा शेवट कसा व केव्हा होणार हा प्रश्नच आहे. तथापि हैद्राबादचा एकंदर इतिहास व निजामाच्या सांप्रतच्या राजकीय हालचाली यावरून त्यासंबंधी आपणास काही कल्पना करणे शक्य आहे. भूत व वर्तमानकाळाला सर्वस्वी विसगत असा भविष्यकाळ निर्माण होणे जवळ जवळ अशक्य असते. पण, असा काहीतरी चमत्कार घडेल अशा अपेक्षेत आज हिंदी मुत्सद्दी व जनता आहे. याच्या उलट, निजाम व त्यांचे साथीदार हे 'आपण स्वतंत्रच राहणार, राहू शकतो,' या कल्पनेत चूर आहेत; व आपल्याला हिंदी संघराज्यात जाण्यास भाग पाडले गेले, तर त्याला आपण कसे तोंड द्यावयाचे, याच्या आगाऊ योजनाही त्यांनी करून ठेवल्या आहेत. हिंदी जनतेच्या नेत्यांच्या वृत्तींत आणि या निजामी वृत्तींत केवढा फरक आहे! राजकारणाच्या दृष्टीने कोणाची दूरदृष्टी आहे, हे भविष्यकाळच ठरवील. खुद्द निजाम, त्यांचे सरकार आणि सल्लागार आज कोणत्या उद्योगात गढलेले आहेत, याची आपण जर माहिती मिळविली व त्यांच्या आतापर्यंतच्या धोरणानुसार जर त्या उद्योगांचा अर्थ लावला, तर आपल्याला एकंदरित वारा कोणत्या दिशेने वाहात आहे, याची सहज कल्पना करता येईल.

## पाकिस्तानचे स्फूर्तिस्थान

हिंदी मुसलमानात निर्माण झालेली वर्चस्वाची कल्पना इतिहासाच्या आणि अनुभवाच्या दृढ पायावर आधारलेली आहे. हिंदुस्थानाच्या नेमक्या नाभिस्थानी असलेल्या हैद्राबादेत मुसलमानांची लोकसंख्या अत्यत थोडी असूनही, त्यांना जीवनाच्या प्रत्येक अंगप्रत्यंगांत अतिरेकी वर्चस्व तपेच्या तपे राजरोस व कायदेशीरपणे अनुभविता आले, तर मग त्याहून अधिक लोकसंख्या असलेल्या भागात वर्चस्व मिळविणे व टिकविणे मुसलमानांना अशक्य नाही, ही ती मूळ कल्पना होय. इ. स. १९४० च्या जानेवारीत जन्म पावलेली पाकिस्तानची कल्पना श्री. जिना यांना सुचली कशी? १९३९ च्या जुलैमध्ये निजामाने जाहीर केलेल्या राजकीय सुधारणांच्या योजनेत समानतेची भाषा वापरीत, दहा टक्के मुसलमानांचे वर्चस्व नव्वद टक्के हिंदूवर कायदेशीरपणे प्रस्थापित करण्यात आले. व्यवहारात तर ते केव्हाच दृढमूल झाले होते. शेफारलेल्या मुसलमानांनी व्यवहारातील वर्चस्व निर्विवादपणे कायद्याने मान्य करण्याचा आग्रह त्या-वेळी धरून आपल्या सवयीप्रमाणे आकाश-पाताळ एक केले. त्यावेळच्या पंतप्रधानांनी (सर अकबर हैदरी यांनी) जिनांना हैद्राबादेस बोलावून आपल्या योजनेचे खरे स्वरूप समजावून देऊन या हैद्राबादेतील दुराग्रही व अदूरदर्शी मुसलमानांची समजूत त्यांच्याकरवी काढली. पाकिस्तानची कल्पना जुनी असली तरी ती व्यवहार्य असल्याची अनुभूती जिनांना हैद्रा-बादेतील परिस्थितीवरूनच आली. नंतर ४-५ महिन्यांनी त्यांनी पाकि-स्तानच्या मागणीचा जाहीर ठराव केला. त्याप्रमाणे ते मिळविलेही. सारांश, पाकिस्तानचे स्फूर्तिस्थान हैद्राबाद संस्थान हे होय. असे हे हैद्राबाद सहज व सामोपचाराने हिंदी संघराज्यात दाखल होईल, अशी अद्याप आशा बाळगली जात आहे. एवढेच नव्हे, तर त्यासंबंधी खात्री मानून सारे व्यवहार बेदरकारपणे चालू आहेत. हिंदुस्थान सरकार, प्रांतिक सरकारे आणि प्रांतिक काँग्रेस कमिट्या ही सर्व सारखीच गाफील दिसतात.

## लोकमताचा कौल घेण्याचा पेच

या ना त्या कारणाने गोष्टी लांबणीवर टाकाव्या, कोणताही निर्णय न घेता सर्व बाबी अधांतरी लोंबकळत ठेवाव्या, हे हैद्राबादच्या निजामाचे

पहिले नीतिसूत्र आहे. तडजोडीची बोलणी ही अशीच रेंगाळत ठेवण्याचा अनेक प्रकारे प्रयत्न चालू आहे. सरदार पटेल यांनाच ती थांबवावी लागतील; व त्याबद्दल शेवटी निजामाकडून हिंदी संघराज्यालाच दोष देण्यात येईल. सरदार पटेल आता निजामाला अधिक वेळ देणार नाहीत, असे आपण मानून चालू. अशा परिस्थितीत, लोकमताचा कौल घेण्याचा हिंदुस्थान सरकार आग्रह धरील, हे अगदी उघड आहे. असा कौल घेण्याची टाळाटाळ निजामाकडून अगदी नाइलाज होईपर्यंत केली जाणार, हेही निश्चित. त्याचे कारण असे की, त्यामुळे लोकांची अधिसत्ता मान्य केल्यासारखे होते. आज लोकमताने काहीही निर्णय दिला, तरी लोकमताचा कौल घेण्यास मान्यता देणे म्हणजेच निजामाने आपली अधिसत्ता सोडणे होय. तेव्हा प्रथम तत्त्वच अमान्य करून व शेवटी त्याच्या तपशिलाबाबत घोळ घालून हा प्रश्न दिरंगाईवर घालण्याचा शक्य तो प्रयत्न केला जाईल. हैद्राबादेतील लोकमताचा कौल घ्यावयाचा म्हणजे आज याद्या तयार करण्यापासून आरंभ करावा लागणार आहे. सारांश, या बाबतीतही निश्चित असे काहीच उत्तर निजामाकडून मिळणार नाही. दिवस, आठवडे व महिने उडवाउडवीच्या प्रयत्नात जाणार व त्या अवधीत येईल त्या प्रसंगाला तोंड देण्याच्या दृष्टीने निजामाची तयारी चालू राहणार. सर्व सज्ञान लोकमताचा कौल घ्यावयाचा म्हणजे याद्या करण्यात काही वर्षे घालावी लागणार. प्रचलित मतदारांच्या याद्या मान्य करता येणार नाहीत. कारण त्यांत मताधिकार अशाच प्रकारे देण्यात आला आहे की, हिंदूंची प्रचंड बहुसंख्या आपोआप बाद व्हावी. एकूण संस्थानात मुसलमान व मुसलमानेतर यांचे प्रमाण सरकारच्या आकड्याप्रमाणेही १२ व ८८ असे आहे. पण केवळ शहरातील रहिवाशांचे प्रमाण घेतल्यास ते जवळ जवळ अर्धे अर्धे आहे. वतनदार व अन्य सरकाराश्रित लोकांच्या साहाय्याने शहरातून मुसलमानांना बहुमत मिळविण्याची आज शक्यता आहे. त्यांतच गेल्या दोन तीन महिन्यापासून लाखो हिंदु संस्थानाबाहेर गेले व लाखो मुसलमान संस्थानात आले आहेत. अशा परिस्थितीत केवळ शहरी व वरच्या वर्गाचे लोक यांचा कौल घेऊन निर्णय देता येणार नाही. सार्वमताचा कौल घ्यावयाचा म्हणजे दीर्घ कालावधी आलाच असा हा

पेच आहे. निजाम संस्थान लोकशाहीच्या साचात बसणे हे ते खालसा करण्याइतकेच कठीण आहे. सैनिकी सामर्थ्याच्या उपयोगाशिवाय हैद्राबादचा प्रश्न सुटूच शकत नाही. ह्यादृष्टीने हैद्राबाद सरकारच्या विविध राजकीय हालचालींचा विचार करणे अगत्याचे आहे.

## निजाम सरकारच्या हालचाली

हैद्राबादेतील सरकारला आपली शक्ती व भौगोलिक परिस्थिती, तसेच त्याला मिळणारे पाकिस्तान व मुसलमान जनता यांचे साहाय्य याविषयी अचूक कल्पना आहे. त्याबरोबरच त्याना कोणकोणत्या विरोधी शक्तीशी झुंजावे लागणार आहे, याचीही उत्तम माहिती आहे. या सर्व गोष्टीचा विचार करूनच त्यांच्या हालचाली चालू आहेत. संक्षेपाने त्या पुढील-प्रमाणे आहेत :

(१) वेळोवेळी जिनांशी विचार-विनिमय करून स्वतःची अंतर्गत शक्ती वाढवण्यासाठी व आपल्याला साहाय्य होऊ शकेल अशी पाकि-स्तानची परिस्थिती बळकट होण्यासाठी, ते आज या ना त्या कारणाने, वेळ घालवीत आहे.

(२) आपण स्वतंत्र झाल्याची द्वाही निजामाने फर्मान काढून फिरविली. बिनसरकारीरीत्या साजरा करण्यात आलेल्या स्वातंत्र्योत्सवात निजामाने स्वतः भाग घेतला. वऱ्हाडवरील आपल्या स्वामित्वाची कायदेशीर घोषणा केली. ब्रिटिश साम्राज्यात राहण्याची आणि 'पाकिस्तानविरुद्ध हिंदुस्थान' या युद्धांत आपण तटस्थ राहणार असल्याचीही त्याने गर्जना केली आहे.

## जनतेत फूट पाडण्यासाठी कारवाई

(३) हिंदी संघराज्यात दाखल होण्याचा प्रश्न अनिर्णित ठेवून सुधारणेचे आमिष दाखवीत संस्थानी जनतेत फूट पाडण्याचा पद्धतशीर प्रयत्न चालू आहे. एका शिखंडीला त्यांनी हाताशी धरले असून, नेमस्त गटाची मंडळी आज 'जबाबदार राज्यपद्धति-दिन' साजरा करण्यावर भर देत आहेत. तसेच स्टेट काँग्रेसला बदनाम व अप्रिय करण्याचेही त्यांचे अनेक प्रयत्न चालू आहेत. सरकारने संस्थानातील शेकडों लोकांना

नजरबंद केले असले तरी त्या यादीत नेमस्त गटाच्या प्रमुखांचे नाव आलेले नाही. त्यांनी झेंडा सत्याग्रह केला असताही सरकारने त्यांना सोडून दिले. काँग्रेसच्या विरुद्ध लोकमत बनवण्याच्या उद्योगात ते आज गुंतलेले आहेत. विद्यमान कायदेमंडळाला अधिक अधिकार देण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी एका कमिटीची नेमणूक करण्यात आली आहे. मंत्रिमंडळात काही 'जी-हुजूर' हिंदूंची नेमणूक करून तेथे समानता निर्माण करण्याचा विचार चालू आहे.

## राष्ट्रसंघापर्यंत लोण पोचविले

(४) हैद्राबादेत रिझर्व बँक सुरू करण्यात आली. डॉलर एक्सचेंज-साठी काही व्यवस्था करणे चालू आहे. निजामी शिक्काच संस्थानात प्रचलित असावा यासाठी कायदा तयार केला जात आहे. परराष्ट्रांशी संबंध जोडण्याचे अनेकविध प्रयत्न चालू आहेत. राष्ट्रसंघात हैद्राबादला स्थान देवविण्यासाठी पाकिस्तानच्या मध्यस्थीने प्रयत्न चालू आहेत.

## मुसलमानी फौजेची उभारणी

(५) पोलिस खात्याची जवळ जवळ दुप्पट वाढ करण्यात आली. पोलिसांची एकूण संख्या चाळीस हजारावर गेली आहे. या खात्यात बहुतेक अशिक्षित व क्रूर वृत्तीच्या अरब, पठाण वगैरे लोकांचा भरणा असून मुसलमानांचे प्रमाण शेकडा ८०-८५ वर आहे.

## ही लष्करी तयारी पाहा

(६) संस्थानी सैन्याचा तपशील खालीलप्रमाणे आहे. या खात्यात हिंदू औषधालाही मिळणे कठीण आहे.

| प्रकार | संख्या | |
|---|---|---|
| रेग्युलर्स | १०३,००० | आधुनिक शस्त्रास्त्रांनी सुसज्ज |
| इरेग्युलर्स | १०,००० | बऱ्याच अंशी सुसज्ज |
| अरब ब्रिगेड | १०,००० | जुन्या प्रकारची हत्यारे |
| सर्फेखास पलटण | २,००० | ,, ,, ,, |
| पायगा | १,२०० | ,, ,, ,, |

नियमित अशा छावण्या, हैद्राबाद व मोमिनाबाद येथे असून निर-निराळ्या निमित्तांनी हे सैन्य संस्थानभर विखुरलेले आहे. सैन्यात सारखी वाढ व सुधारणा चालू आहे. एत्तेहादुल मुसलमीनच्या नॅशनल गार्ड्सना आधुनिक हत्यारे दिली जात असून इतर मुसलमानांना शक्य तेवढी साधी हत्यारे पुरविली जात आहेत. काही हिंदूंच्या जवळ जी हत्यारे आहेत, ती अपवादात्मक व जुनी आणि तीही लूट, चोरी, संशय इत्यादी आरोपावरून काढून घेण्याचा पद्धतशीर प्रयत्न चालू आहे.

(७) अल्विन मेटल वर्क्स नामक कारखान्याने गेल्या दोन महिन्यात सुमारे पन्नास विजेच्या मोटारी व 'Do All' (हरकामी) यंत्रे मिळविली आहेत. विध्वंसक शस्त्रास्त्रे व त्यासाठी लागणारी द्रव्ये मोठ्या प्रमाणात, युद्धकालीन परिस्थितीचा फायदा घेऊन, जमा केली आहेत. निरुपयोगी ठरवून काढलेली शस्त्रास्त्रे, मोटारी व इतर युद्धसाहित्य शक्य त्या ठिकाणा-हून मिळवून संग्रही ठेवले गेले आहे. उस्मानिया विद्यापीठ, हुसेनी आलम, गन फॅक्टरी व अल्विन मेटल वर्क्स, वरील वस्तूंना कार्यक्षम करण्यासाठी प्रयत्न करीत आहेत. शिवाय व्यक्तिगत प्रयत्न गुप्तपणे चालू आहेत, ते निराळेच !

## आंग्ल अधिकाऱ्यांची फंदफितुरी

(८) सिकंदराबाद येथील कर्नल गॉर्ड या अधिकाऱ्याच्या मूक संमतीने अगणित शस्त्रास्त्रे व तदनुषंगिक साहित्य 'निकामी' या सबबी-वर शब्दशः लुटण्यात आले. कर्नल नैली व मेजर बर्ड या आंग्ल सेनानायकां-कडून वेळोवेळी सैनिक हालचालींची गुप्त माहिती निजाम सरकारला पुरविण्यात येत असल्याबद्दल बोलवा आहे.

हैद्राबादेतील सैन्याचे कमांडर मि. इद्रिस हे स्वित्सर्लंडला गेले असून ते तेथून 'निरुपयोगी लोखंड' या सदराखाली अनेक प्रकारची शस्त्रास्त्रे व यंत्रे पाठवत असल्याचे वृत्त आहे. श्री. लायकअलीखाँ हेही याच उद्योगासाठी परदेशांत गेले आहेत, असे कळते.

## सैन्यासंबंधी काही तपशील

कमांडर-इन्-चीफ :- विदर्भ युवराज ( प्रिन्स ऑफ बेरार )

कमांडर हैद्राबाद आर्मी :- सय्यद अहमद ( अरब )

## कॅव्हेलरी

फर्स्ट अँड सेकंड लान्सर्सः- इंग्रजांच्या तैनातीतील सैन्य, अद्ययावत यंत्रसुसज्ज. मागील दोन महायुद्धांत काम केलेले-संख्या प्रत्येकी ७००.

थर्ड लान्सर्सः- फर्स्ट हॉर्स रेजिमेंट संख्या ५००. चोरून जाणाऱ्या येणाऱ्या धान्यादी पदर्थांवर नियंत्रण घालण्याच्या कामासाठी उपयोजिले जात आहे.

## फर्स्ट इन्फण्टरी ब्रिगेड

संख्या ६००, पुनर्रचित. मागलि युद्धात सिगापूर येथे अटकेत होते.

## सेकंडरी इन्फण्टरी

संख्या ६००. अद्ययावत शस्त्रसंपन्न. मागील युद्धात इराणात काम केले.

## थर्ड इन्फण्टरी

संख्या ६००. अद्ययावत. नाविकांच्या मुंबई येथील बंडाविरुद्ध काम केले.

## सेकंड इन्फण्टरी ब्रिगेड

फिफ्थ इन्फण्टरी, संख्या ६००. कर्नाटकाच्या सीमेवर करोडगिरीच्या कामावर संस्थानात उपयुक्त.

सिक्स्थ इन्फण्टरी-रणांगणावर जाण्याला योग्य-संख्या ६००. पूर्वी औरंगाबाद येथे. जुलै ४७ पासून हैद्राबादेत.

सेव्हंथ इन्फण्टरी-फिफ्थ इन्फण्टरी प्रमाणेच. संख्या ६००. नुकतीच वरंगळ विमानतळाकडे रवाना.

## हैद्राबाद ब्रिगेड

तीन तुकड्या. संख्या प्रत्येकी ८००. अर्धे तरबेज. सर्वसाधारणपणे राजवाड्यावर पहारा-संरक्षण यासाठी उपयोग.

## निजाम ब्रिगेड

संख्या योग्यता व उपयोग वरील प्रमाणेच [ ३×८००=२४०० ].

## निजाम इन्फण्टरी

इर्रेग्युलर. बहुतेक संस्थानभर विखुरलेली. अंजुमन एत्तेहादचे माजी अध्यक्ष बहादुर यार जंग हे या पलटणीचे एक अधिकारी असत.

## अरब ब्रिगेड

संख्या दहा हजारावर, संस्थानभर पसरलेली, जुनी हत्यारे. पुनर्घटना चालू आहे.

याखेरीज सर्फेखास व पायगा या पोट संस्थानांचीही सैन्ये आहेत. पहिल्यामध्ये दोन हजार व दुसऱ्यामध्ये प्रत्येकी चारशेच्या तीन तुकड्या आहेत. पैकी तीन चतुर्थांश सैनिकांजवळ अद्यावत् हत्यारे आहेत.

सहाशे नियमित रेग्युलर सैनिकांच्या तुकड्या औरंगाबाद, मोमिनाबाद, बीदर व वरंगळ येथे असून इतर करीमनगर, नलगोंडा, उस्मानाबाद, नांदेड इत्यादी ठिकाणी रवाना करण्यात आल्या आहेत. हैद्राबादचा इतिहास व व्यवहार हा असा आहे त्याबद्दल निजाम सरकारच्या भविष्य-कालीन राजकारणाची काही कल्पना करता येणार नाही काय ?

**तरुण भारत,** नागपूर : दि. २६ ऑक्टोबर १९४७

## परिशिष्ट :

**पहिल्या महायुद्धाच्या समाप्तीपासून निजामाच्या शरणागतीपर्यंत हैद्राबाद संस्थानात व संस्थानाशी संबंधित घडलेल्या ठळक घटनांचे टिपण.**

१९१८ : ऑक्टोबर ५ : उस्मानिया विद्यापीठाची स्थापना.

१९१९ : मॉंटेग्यु-चेम्सफोर्ड सुधारणांचा कायदा. राज्यकारभारात हिंदी लोकांना क्रमशः सहभागी करून घेण्याची तरतूद व अशाप्रकारे ब्रिटिश हिदुस्थानात जबाबदार राज्यपद्धतीचा विकास करण्याची इंग्रज सरकारची तयारी.

१९१९ : निजामाने बाबे हुकूमतची ( Executive Council ) नेमणूक केली. कोणतीही योजना मंजूर वा नामंजूर करण्याचे 'व्हेटो' चे अंतिम अधिकार स्वतःकडे ठेवून निजामाने राज्यकारभार बाबे हुकूमतकडे सोपविला. त्यापूर्वी निजाम स्वतःच सर्व कारभार पाहात असे.

१९१९ : कायदे कौन्सीलच्या सुधारणेसाठी आवश्यक ती माहिती मिळवून सरकारकडे योजना पाठविण्याच्या संदर्भात निजामाचे फर्मान. अशी माहिती जमविण्यासाठी सेवानिवृत्त न्यायाधीश राय बालमुकुंद यांची विशेष अधिकारी म्हणून नेमणूक.

१९२० : वरील घटनेने संस्थानातील सुशिक्षितांच्या राजकीय विचारांना चालना. त्यातूनच 'हैद्राबाद रिफॉर्मस् असोसिएशन' या संस्थानातील पहिल्याच राजकीय संस्थेची स्थापना. अध्यक्ष : श्री. वामन रामचंद्र नाईक. संस्थेत हिंदू व मुसलमान जमातींचे प्रमुख पुढारी.

१९२१ : असोसिएशनने प्रजापरिषद भरविण्याचे ठरविले. त्यावर बंदी.

१९२१ : सप्टेंबर ८ : सभाबंदीचे फर्मान. प्रजापरिषद स्थगित. 'असोसिएशन' मधून मुसलमान सभासदांची गळती. जातीय भावनांची वाढ. राजकीय चर्चा करणारे एकही स्थानिक वर्तमानपत्र नसल्यामुळे सरकारच्या जातीय धोरणाचा एकांगी प्रचार.

१९२२ : आंध्रजन संघ स्थापना.

१९२४ : 'असोसिएशन' ने राजकीय सुधारणांची एक योजना निजाम सरकारकडे पाठविली.

१९२४ : डिसेंबर : राजकीय परिषद भरविण्याचा अर्ज. अर्ज नामंजूर.

१९२६ : मुंबई येथे हैद्राबाद संस्थानच्या प्रमुख कार्यकर्त्यांची परिषद.

१९२८ : पुणे येथे हैद्राबाद संस्थानच्या प्रमुख कार्यकर्त्यांची परिषद. दोन्ही परिषदांत संस्थानांतील राजकीय प्रश्नांची चर्चा व ठराव.

या परिषदांमागे मुख्यतः श्री. राघवेंद्रराव शर्मा यांचे प्रयत्न. त्यामुळे हैद्राबादच्या प्रश्नाला संस्थानात व बाहेर मोठ्या प्रमाणात वाच्यता.

१९२९: सभाबंदीचा सर्वव्यापी कडक कायदा. 'काळा कायदा' म्हणून संस्थानात कुप्रसिद्ध. या कायद्याने सर्व प्रकारच्या सभांवर कडक नियंत्रणे. त्याबरोबरच, खाजगी शाळा, व्यायाम शाळा, सार्वजनिक उत्सव, समारंभ, मिरवणुका, वाचनालये या सर्वांवर नियंत्रणे. संस्थानात वर्तमानपत्रांना कधीच स्वातंत्र्य नव्हते.

सभा, संस्था, संघटना, वृत्तपत्र या सर्व साधनांवर नियंत्रणे.

१९३०: हैद्राबाद आंध्र परिषदेचे पहिले अधिवेशन.

१९३१: मराठी साहित्य संमेलन. अध्यक्ष : डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर.

१९३१: अकोला येथे बॅ. रामचंद्र नाईक यांच्या अध्यक्षतेखाली प्रजापरिषदेचे अधिवेशन.

मुख्य ठराव: जबाबदार राज्यपद्धती हे अंतिम ध्येय मान्य करून त्या अनुरोधाने राजकीय सुधारणा अमलात आणाव्या.

परिषदेचे काम करण्यासाठी स्टॅंडिंग कमिटीची निवड.

१९३२: हिंदु स्टॅडिग कमिटीची स्थापना.

१९३४: ऑक्टोबर: निजाम प्रांतीय मराठी साहित्य संमेलन.

१९३४: 'हैद्राबाद सब्जेक्टस् लीग' ची स्थापना. अनेक राजकीय प्रवाहांना एकत्र आणण्याचा प्रयत्न. अध्यक्ष: हायकोर्टाचे माजी मुख्य न्यायाधीश नबाब सर निजामत जंग. इतर सभासदात श्री. वामन नाईक, एम्. नरसिंगराव, बी. रामकिशनराव, नबाब बहादुर यार जंग, बॅ. अकबर अली खॉं, अबुल हसन सय्यद अली, आर. एस. नाईक, एस. बी. शर्मा इत्यादींचा समावेश.

राजकीय हक्कांची मागणी, पण मुख्य भर मुलकी चळवळीवर. (मुलकी चळवळीची गरज स्थानिक मुसलमानांना अधिक वाटत असे. उत्तर प्रदेशीय मुसलमानांची आयात वाढत असल्याबद्दल स्थानिक मुसलमानांची तक्रार.)

या लीगच्या घटनेला निजाम सरकारने विरोध दर्शविला. पुन्हा या संस्थेतून बहादुर यार जंग वगैरे मुसलमान पुढारी बाहेर पडले.

१९३५: 'हैद्राबाद सब्जेक्टस लीग' तर्फे जबाबदार राज्यपद्धतीचा पुरस्कार.

भारतात १९३५ च्या कायद्याची चर्चा. इंग्रज सरकार व कॉंग्रेस नेते यांच्या वाटाघाटी.

१९३६: महाराष्ट्र संघ स्थापना : संस्थापक, आ. कृ. वाघमारे व अनंतराव कुलकर्णी (हिप्परगा)

१९३६ : धर्मवीर वामन नाईक यांचे निधन.

१९३७ : ब्रिटिश हिंदुस्थानात १९३५ च्या कायद्यान्वये प्रांतिक कायदे मंडळाच्या निवडणुका. देशातील राजकीय वारे झपाट्याने बदलू लागले.

१९३७ : हैद्राबाद कर्नाटक परिषदेचे पहिले अधिवेशन.

१९३७, जून १ : हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषदेचे परतूड येथे पहिले अधिवेशन. अध्यक्ष : श्री. गोविंदराव नानल.

१९३७ : हैद्राबाद संस्थानात राजकीय सुधारणा योजना तयार करण्याकरिता अय्यंगार कमिटीची स्थापना. या कमिटीकडे एक योजना तयार करून पाठविण्यासाठी सर्व पक्षांची सभा. सभेने उपसमिती नेमली. ही उपसमिती 'पीपल्स कन्व्हेन्शन कमिटी' या नावाने प्रसिद्ध. कायदे कौन्सिलात मुसलमानांना ५० टक्के जागा मिळाव्यात अशी मुसलमान सभासदांची मागणी.

पीपल्स कन्व्हेन्शन कमिटीने जबाबदार राज्यपद्धतीची मागणी केली.

१९३७ : ब्रिटिश हिंदुस्थानात प्रांतिक मंत्रिमंडळाचा कारभार सुरू. ७ प्रांतांत कॉंग्रेसची मंत्रिमंडळे. मुंबई, मध्यप्रदेश व मद्रास या तिन्ही प्रांतात कॉंग्रेसचा कारभार. त्यामुळे संस्थानी प्रजाचळवळीला अनुकूल परिस्थिती.

१९३८ : फेब्रुवारी १० : 'मराठवाडा' साप्ताहिकाचे पुण्याहून प्रकाशन, संपादक : आनंद कृष्ण वाघमारे.

१९३८ : "अंजुमन एत्तेहादुल मुसलमीन" या संस्थेला राजकीय रंग. अध्यक्ष : बहादुर यार जंग.

१९३८ : संस्थानात जातीय दंग्याची लाट.

१९३८ : जून : हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषदेचे लातूर येथे दुसरे अधिवेशन. अध्यक्ष : श्रीनिवासराव शर्मा.

१९३८ : ऑगस्ट : हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसची स्थापना. रीतसर स्थापना होण्यापूर्वीच ही संस्था निजाम सरकारने बेकायदेशीर ठरविली.

१९३८ : ऑक्टोबर २१ : हिंदु नागरिक हक्क संरक्षक मंडळाच्या वतीने निजाम राज्य विरोधी लढा.

१९३८ : ऑक्टोबर २४ : हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसच्या कार्यकारी मंडळाचे प्रथमाध्यक्ष श्री. गोविंदराव नानल यांनी स्टेट कॉंग्रेसच्या स्थापनेला बंदी करणारा सरकारी हुकूम मोडून सत्याग्रहाची चळवळ सुरू केली.

१९३८ : ऑक्टोबर २७ : आर्यसमाज संस्थेच्या वतीने निजाम राज्य विरोधी लढा.

१९३८: डिसेंबर : 'वंदेमातरम्' राष्ट्रगीताला बंदी.

१९३८: डिसेंबर २३ : हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसने सत्याग्रहाचा लढा तात्पुरता थांबविला असल्याचे जाहीर केले.

१९३९: सप्टेंबर १ : दुसरे महायुद्ध सुरू.

१९४१: मे : उमरी येथे महाराष्ट्र परिषदेचे ३ रे अधिवेशन, अध्यक्ष : काशीनाथराव वैद्य.

१९४२: ऑगस्ट ८ : भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचा 'छोडो भारत' चा ठराव.

१९४३: हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषद : औरंगाबाद येथे ४ थे अधिवेशन. अध्यक्ष : बॅ. श्रीधर नाईक. स्वागताध्यक्ष आ. कृ. वाघमारे.

१९४४: तिन्ही परिषदांची संयुक्त सूत्रचालक समिती.

१९४५: ऑगस्ट ११ : जपानची शरणागती. दुसऱ्या महायुद्धाची समाप्ती.

१९४५: सेलू येथे महाराष्ट्र परिषदेचे ५ वे अधिवेशन, अध्यक्ष : दिगंबरराव बिंदु.

१९४६: हैद्राबाद संस्थान महाराष्ट्र परिषद : लातूर येथे ६ वे अधिवेशन. अध्यक्ष : आ. कृ. वाघमारे.

१९४६: जुलै ३ : स्टेट कॉंग्रेसवरील बंदी उठली.

१९४६: सप्टेंबर २ : जवाहरलाल नेहरू यांचे केंद्रीय हंगामी मंत्रिमंडळ.

१९४७: जून : हैद्राबाद स्टेट कॉंग्रेसचे पहिले अधिवेशन. अध्यक्ष : स्वामी रामानंद तीर्थ. तीन प्रमुख मागण्या (१) नागरिक स्वातंत्र्य, (२) मध्यंतरीचे मंत्रिमंडळ, (३) स्वतंत्र भारतात सामील होणे.

१९४७: ऑगस्ट ७ : हैद्राबाद स्टेट काँग्रेसचा लढा सुरू.

१९४७: ऑगस्ट १५ : भारत स्वतंत्र झाला.

१९४७: डिसेंबर २ : भारत व निजाम यांचा 'जैसे थे' करार. त्याच दिवशी स्टेट काँग्रेसच्या कार्यकारिणीच्या सभासदांची मुक्तता.

१९४८: सप्टेंबर १३ : हैद्राबाद संस्थानविरुद्ध भारत सरकारच्या पोलीस कारवाईचा आरंभ.

१९४८: सप्टेंबर १७ : निजामाची शरणागती.